भारत-गौरव-ग्रंथमाला, पुष्प ११९ वें.

# भंगलेलें देऊळ

(स्वतंत्र सामाजिक कादंबरी)



नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भगवान् श्रीकृष्ण

लेखक

गजानन त्र्यंबक माडखोलकर.

---

किंमत साधी बाधणी रु १ ]   १९३४   [ कापडी बाधणी रु १।



चिरंजीव
रामनारायण पंडित
यांच्या प्रेमळ स्मृतीस
समर्पण



# माडखोलकरांचीं पुस्तकें

## प्रबंध

(१) आधुनिक कविपंचक
(२) विष्णु कृष्ण चिपळूणकर
(३) विलापिका
(४) आधुनिक मराठी कविता

## कादंबऱ्या

(१) मुक्तात्मा
(२) भंगलेलें देऊळ
(३) कांता

# भंगलेलें देऊळ

## एका मानिनीची आत्मकथा

मृत्युशय्येवर पडून स्वत च्या गतायुष्याचे चिंतन करणें, याच्यासारखा शिणलेल्या मनाला दुसरा कोणता विरंगुळा असू शकेल ? गोविंदाग्रजानी म्हटले आहे, "सुकले फूल न उमले जरि ते अश्रूनी भिजलें" पण ते खरे नाही, निदान माझा स्वत चा अनुभव तरी तसा नाही आयुष्यातील महत्त्वाच्या प्रसंगाच्या आठवणीची फुलें,—ती कधीही कोमेजत नाहीत, कधीही सुकत नाहीत जणु काही ती नदनवनातलीच फुले असतात ! त्याचे चिंतन करीत असता डोळ्यात अश्रु आले, म्हणजे ते पुनरुज्जीवित प्रसग, दव पडून उमललेल्या पहाटच्या फुलाप्रमाणें, मनाला आल्हाद देतात,—विषादानें व्यापलेला अत करणाचा प्रत्येक कोपरा न् कोपरा त्याच्या मद गधाने दरवळून जातो आयुष्यातले दु खद प्रसग—त्याच्यासुद्धा चिंतनाने मनाला गोड ग्लानि येते एक प्रकारची त्या प्रसगातल्या दु खाची सारी तीव्रता, सारी दाहकता कालातरानें लोपून जाऊन त्यातले मार्दव तेवढे शिल्लक रहातें मागे. आणि त्यामुळें त्याच्या चिंतनानें इतक्या कोमल भावनाचे कल्लोळ मनात उठतात

की, पोळलेल्या जिवाला तो विसावाच वाटतो एक—म्हणून म्हणते की, अखेरच्या आजारात गतायुष्याच्या चिंतनासारखे सुख नाही दुसरें जणु काही, वर्तमानकाळात वावरण्याची मनाची उमेद नाहीशी झाल्यावर, त्याला भूतकाळात रमणे जास्त सुखावह वाटते विशेषत, मृत्यूची चाहूल कानावर पडत असताना, त्याचे आगमन क्षणाक्षणाने जाणवत असताना गेलेले आयुष्य कल्पनेने पुन्हा जगणे, त्यातील नानाविध प्रसग, त्याच्या तीव्रतेचा काटा मनाला न बोचता, पुन्हा उपभोगणे, याच्याइतका आनद दुसरा कोणता असू शकेल ?

— २ —

त्या आनदासाठीच मी हें लिहीत आहे त्यापासून कोणी बोध घ्यावा, अशी इच्छा नाही माझी आणि बोध घेणार तरी कोण ? माझा मनस्ताप, माझ्या जीविताची पायमल्ली पाहून ज्यानें सुस्कारे सोडावेत, ज्याच्या डोळ्यात अश्रु यावेत असे मला अजूनही वाटते, तो कदाचित् ही माझी कहाणी वाचणारही नाही, व यदा-कदाचित् त्यानें वाचलीच, तरी माझ्या वेदना, माझ्या जिवाची तळमळ, माझ्या डोळ्यातील आसवाचा पूर पाहून ज्याच्या हृदयाला त्या वेळी कणव आली नाही, त्याला आता काय वाटावयाचे आहे त्याबद्दल ? त्याला बोध घ्यावयाचा असता, तर तो त्या दिवशीच—आमच्या ताटातुटीच्या त्या क्षणीच—त्याने घेतला असता शिवाय कवि म्हणून, तत्त्वज्ञ म्हणून तो आज कीर्तीच्या शिखरावर आरूढ झालेला आहे माझ्या भग्न हृदयाचे हे एकातातील आक्रदन त्याच्या कानापर्यंत जाऊन पोचतेच कशाला ?—माझी मीना मात्र वाचील ही कहाणी पण तिला त्यापासून बोध घेण्याची गरज नाही काही सायन्सची विद्यार्थिनी ती ! तिचा प्रेमावरला विश्वास साफ उडाला आहे हृदय ही चीजच मुळी ओळखीत नाहीं ती आणि पुन्हा, माझा कोडमारा ज्या परिस्थितीमुळें झाला, ती परिस्थितीही आता उरलेली नाही मला घटस्फोटाचा मार्ग मोकळा असूनही मी केला नाही त्याचा अवलब,—तिला मुळी गरजच वाटणार नाही त्याची निसर्गाच्या हाकेला 'ओ' देण्यापुरते, सृष्टीची परंपरा कायम राखण्यापुरते स्त्रीपुरुषाचें साहचर्य !—याच्या पलीकडे ती तयार नाही त्याला अधिक किंमत द्यावयाला. तिच्या हातांत विज्ञानाचा प्रखर विद्युद्दीप आहे. त्याच्या शोधक—विदा-

रक प्रकाशात ती प्रत्येक घटना, प्रत्येक कल्पना, प्रत्येक भावना तपासून पाहाणार, त्याचे पृथक्करण करणार लिहिता लिहिता आसवे पडून डागळलेले या आत्मकथेचे प्रत्येक पान म्हणजे तिला स्त्रीजातीच्या मानसिक गुलामगिरीच्या इतिहासाचे पान वाटेल आणि ती साम्यवादिनी कदाचित् हे चरित्र तिरस्काराने भिरकावून देईल तिला वाटेल, ही आपली आई कसली? दैन्याची, दौर्बल्याची मूर्तीच ही! तिचा असा ग्रह होण्यापेक्षा तिने ही कहाणी न वाचलेली पुरवली

- ३ -

आणि त्याना?—त्याना ही आत्मकथा वाचून काय वाटेल? दुसरे काय वाटावयाचे आहे? मनसोक्त वास घेतल्यावर, मनमुराद हाताळल्यावर कोमेजल्यामुळे फेकून दिलेल्या फुलाच्या पाकळ्या पाहून भोगलोलुपाच्या मनाला कधी तरी द्रव आला आहे का? बोलून चालून नवपुष्पावरले भ्रमर ते! शकुतलेला नाही दुष्यताने अपमान करून परत घालविली? दमयतीला नाहीं नलराजाने गाढ झोंपेत दगा दिला? सीतेला नाही रामचद्रानें न कळवता रानात सोडून दिली?—या साऱ्या पुण्यश्लोकाचेच वारसदार ते! त्याना फार तर एवढेच वाटेल की, या चाडाळणीने आपल्या लग्नापूर्वीच्या प्रणयचेष्टा लिहून काढून सूड घेतला माझा! पण हे सारें लिहिण्यात माझी बुद्धि खरोखरीच सूड घेण्याची आहे का? माझी बुद्धि असो नसो, ही आत्मकथा जर कधी काळी प्रसिद्ध झाली, तर माझा मीच सूड घेतला असे मात्र खास होईल! त्यानी मला टाकली, म्हणून आज लोक त्याना थोडी तरी नावे ठेवताहेत पण, माझे हे चरित्र, त्याच्याशी लग्न होण्यापूर्वीचे माझे प्रेमजीवन,—त्याची ही सारी कथा कळल्यावर आज लोकाना माझ्याविषयी वाटत असलेली सहानुभूति कायम राहील का?—शका आहे नव्हे, शका नकोच मुळी!—लोक म्हणतील, हिच्या या चटोर पूर्वचरित्राचा काही तरी सुगावा लागला—एकादें प्रेमपत्र, एकादा फोटो,—पूर्वीच्या प्रणयचेष्टाचे काही तरी स्मारक सापडलें, म्हणूनच त्यांनी टाकली हिला नाही तर, एवढा नामांकित सुधारक, विलायतेहून बॅरिस्टर होऊन आलेला—त्याला काय वेड लागले आहे असल्या सुशिक्षित बायकोला टाकून लोकापवादाचे धनी व्हावयाला? जणु काही, त्यानी विलाय-

तेला जाण्यापूर्वी, विलायतेत असताना किंवा विलायतेहून परत आल्यावर काही थेर कधी केलेच नाहीत! पण किती झाले तरी ते पुरुष! आणि मी?—मी स्त्री!—माझे लग्नापूर्वीचे प्रेमजीवन—किती निरागस किती रमणीय होते ते!—आणि त्याचे विलायतेतले ढग!—ते निस्तरताना मामजी भिकेला लागले, बाबा टेकीला आले—पण किती झाले तरी ते पुरुष! धडधडीत माझ्या बहिणीशीं!—आणि त्यामुळे मला घरातून बाहेर पडावे लागले!—नको, नको! त्यानी मला केलेला अन्याय इतका भयकर आहे की, आसवानी भिजलेली ही निर्जीव अक्षरे त्याचा काय वचपा काढणार!

— ❦ —

म्हणून म्हणते की, हें मी केवळ स्वत ला विरगुळा वाटावा एवढ्यासाठी लिहिते आहे आणि विरगुळा का वाटणार नाही? दु खाचे आणि अपमानाचे प्रसग,—केशवसुतानी म्हटलेच आहे ना, "अमुचा पेला दु खाचा, डोळे मिटुनी प्यायाचा!"—होय, असल्या प्रसगानी काठोकाठ भरलेले आहे माझे आयुष्य! पण हा पेला मी आता डोळे उघडे ठेवून पिणार आहें कारण प्रत्यक्ष अनुभूतीच्या तीव्रतेचा त्यातला सारा गाळ खाली बसला आहे आता आणि, बाकी दु खद गोष्टी त्यात कितीही असल्या,—तरी लग्नापूर्वीचे ते दिवस! त्याच्या आठवणीनी माझे जळजळणारे डोळे निवतात, पोळलेल्या हृदयाला कसे गार गार वाटते खरेच, ते दिवस!—केव्हा केव्हा मला असें वाटतें की, त्याच्या पूर्वीच्या आणि त्याच्या नतरच्या साऱ्या दिवसाचा विसर पडून, त्या मधल्या काळाच्या मधुर स्मृतीतच मन सदैव डुबत रहावे —जिकडे तिकडे पाणीच पाणी पसरलेले वर निळे आकाश, भोंवती निळें पाणी, आणि मध्ये पाचूसारखे हिरवेचार बेट जणु काही, त्या अथाग पाण्यावर तरंगत आयुष्य घालविणाऱ्या पक्ष्याना घरकुले बाधण्यासाठीच ते बेट सृष्टीनें निर्मिलेले असते!—तसा विस्मृतीच्या समुद्रात माझ्या आयुष्यातला हा एवढाच कालखड जर तगून राहिला असता तर?—तर माझे सारे विचार, माझ्या साऱ्या कल्पना, त्या समुद्रपक्ष्याप्रमाणें, त्या रम्य कालखडावर विसावल्या असत्या —पण स्मरणशक्ति ही रस्त्यातून भटकत जें सापडेल तें आपल्या पोतडींत भरून घेणाऱ्या भिकारणीसारखी आहे तिला इतका विवेक कुठला?

सुष्ट दुष्ट सारे प्रसग, बरे वाईट मगळे दिवस तिला सारखेच पण तिला तरी मी का दोष देऊ ? दु खद प्रसगाची आठवण जर मनात धगधगत नसती, तर सुखद प्रसगाची शीतलता मनाला कधी तरी जाणवली असती का ? शिवाय, आयुष्यातील दु खदायक गोष्टीचे चिंतन करता करता डोळ्यातून अश्रु वाहून गेल्यावर मनाला किती हलके वाटते ! —मला आठवते, लहानपणी माझा हात एकदा आधणाचे पाणी साडून भाजला असता, आईने त्याच्यावर तेजाब शिंपडले त्याबरोवर हाताची आग होण्याचे थाबून मला एकदम किती तरी गार वाटले अश्रुमोचनानतर मनाला वाटणारा विरगुळा हा थोडासा तशाच प्रकारचा नाही काय ?

— २ —

ते दिवस !—होय, त्या दिवसाच्या आठवणीना घट्ट बिलगूनच आता आयुष्याचे हे उरलेले दिवस मला कठावयाचे आहेत आजारीपणात मनुष्याची स्मरणशक्ति फार तल्लख होते, म्हणतात जणु काही, शरीराच्या शक्ति जसजशा क्षीण होत जातात, तसतशी मनाच्या शक्तीना तीव्रता येते एक प्रकारची मला तरी असा अनुभव सध्या येत आहे खरा अगदी लहान सहान प्रसग !—पण ते सुद्धा कसे अगदी काल घडल्यासारखे आठवतात माझी आणि अरूची ओळख झाली, तो प्रसग किती क्षुल्लक ! पण, जों जो जास्त काळ लोटत आहे, तो तो त्या प्रसगाचे स्मृतिचित्र अधुक न होता उलट त्यातील प्रत्येक रेषा न् रेषा उज्ज्वल होत चालली आहे त्या दिवशी आमच्याकडे भातुकली असल्यामुळे शेजारची सारी मुले जमली होती. आधी बाहुला बाहुलीचे लग्न आणि मग ?—मग टोलेजग मेजवानी ! शिट्या, पिंपाण्या, बेडबाजे सारी वाजत्री जोरजोराने वाजत होती आणि, अनरशाचे स्वच्छ धुतलेले तादूळ आगणात वाळत घातले असता चिमण्या जशा त्याच्या भोवती चिंवचिंवत उडत असतात, तशा आम्ही मुली बागडत होतो माजघरात. लग्नाची सारी तयारी झाली, केळीच्या पानाच्या इवल्याशा चिरटोळ्यावर रुखवत सुद्धा वाढले —अन् एकाएकी आमचा बॅडवाला दिनू कशावरूनसा रुसून निघून गेला आम्ही किती मनवरणी केली त्याची ! सनूने तर आपल्या गळ्याची शपथसुद्धा घातली आपल्या भावाला.—त्याच्या त्या जाण्यानें

आमचा इतका विरस झाला,—मला वाटलें, लग्न काही होत नाही आता, —माझे डोळे भरून आले —इतक्यात एक मुलगा हळूच माझ्याजवळ येऊन म्हणाला, "मी बँडवाला झालों तुमचा तर चालेल का, अनू ?" त्याच्या त्या प्रश्नाबरोबर माझें त्याच्याकडे लक्ष गेले अन् मी मनूला विचारले, "कोण ग हा ?"—"अग माझा आतेभाऊ अरुण आमच्या आत्याबाई वारल्या ना नुकत्या—त्याचा मुलगा —आता इथच राहणार आहे आमच्याकडे"— पण तिचे ते बोलणें ऐकावयाला माझे मन थाऱ्यावर होते कुठे ? मला तो मुलगा इतका आवडला !—त्याचा तो पाढुरक्या गुलाबासारखा रग, प्राजक्ताच्या देठासारखे लाल ओंठ, भुरक्या केसानी झाकलेले उच कपाळ, स्फटिकासारखे लुकलुकणारे टपोरे डोळे !—ते डोळे या वेळी माझ्याकडे इतक्या उत्कठेनें पहात होते व त्यात इतका कोमलपणा भरलेला होता की, त्यानी वेधून घेतलेल्या माझ्या मनाला मनू काय बोलत होती ते ऐकण्याचे भानच मुळी उरलें नाहीं त्यानतर मी अनेकदा पाहिला अरूला —नाही, माझ्या स्मृतिसपुटात त्याचे अनत फोटो साठविलेले आहेत पण आमच्या ओळखीच्या त्या पहिल्या दिवशीचें त्याचें तें बालरूप !—तितका तो मोहक नतर मला कधीच वाटला नाही

\- ❦ -

आमच्या ओळखीचा तो पहिला दिवस आज मागें वळून त्या दिवसाकडे बघितलें, म्हणजे मला नतर घडलेल्या एक एक गोष्टीचा चमत्कार वाटतो आयुष्यांत अनेक माणसाशी आपल्या ओळखी होतात, व पुष्कळदा दुसऱ्याच क्षणीं आपण त्याना विसरून जातों पण, अरूची आणि माझी दृष्टभेट ज्या क्षणीं झाली, तो क्षण काहीं विलक्षण होता युगानुयुगे चालत आलेल्या सौहार्दानेंच जणु त्याच्या त्या डोळ्यातून माझ्याकडे पाहिलें,—जन्मातरीच्या साहचर्यानेंच जणु त्याच्या त्या दृष्टिक्षेपातून मला आपली ओळख दिली आणि माझ्या साऱ्या वृत्ति, माझ्या साऱ्या भावना आपल्याकडे आकर्षून घेतल्या अरूचे डोळे घारे होते, व मला तर घारे डोळे अगदीं आवडत नसत माझी आई नेहमीं म्हणत असे कीं, घाऱ्या डोळ्याची माणसे मतलबी असतात पण तो घारेपणा निराळा आणि अरूच्या डोळ्याचा हा घारेपणा निराळा त्याच्या डोळ्यात एक प्रकारची सौम्य, शुभ्र लकाकी होती. झऱ्याच्या स्वच्छ

पाण्यावर मावळत्या सूर्याचे तिरपे किरण पडले असता जी चमक त्याच्यावर खेळते, तशा तऱ्हेची लकाकी होती ती एकमेकाच्या दृष्टींत दृष्टि मिसळून परस्पराकडे पहात आम्ही कितीदा तरी तास न् तास घालविले आहेत त्या वेळी पुष्कळदा मला असें वाटत असे की, त्याच्या डोळ्याचे रग वारवार बदलतात तो बोलका नव्हता माझ्यासारखा परतु कोणताही विचार उत्कटतेनें मनात आला, म्हणजे त्याच्या डोळ्याचा रग इतक्या झपाट्याने बदले कीं, आपले विचारच जणु तो तशा रीतीने बोलून दाखवीत आहे, असे वाटत असे मला एकादी मनाला लागण्यासारखी गोष्ट घडली किंवा एकाद्या आठवणीनें हृदय व्यथित झाले, म्हणजे तो माझ्याजवळ नुसता येऊन बसावयाचा. कितीही खोदखोदून विचारले, तरी तो बोलावयाचा म्हणून नाही —फारच झालें तर एकादा उसासा किंवा " अनू , काय सागू तुला ? " असें एकादें तुटक वाक्य कानावर पडले तर पडावयाचे !—पण त्याच्या त्या सतेज डोळ्यात मात्र एक प्रकारची चमत्कारिक, आर्ततापूर्ण लकाकी खेळत असे जणु काहीं घनतमातून पडणारे शुक्राचे चादणे !—ते दिशा तर फारशा उजळीत नाहीं; पण त्याचा प्रकाश मात्र जाणवतो त्याप्रमाणे अरूचे ते डोळे काही तरी बोलून दाखवीत आहेत असे वाटे, पण काय बोलून दाखवीत आहेत ते मात्र कळत नसे मला मात्र अशा प्रसगी असे वाटत असे की, त्याच्या त्या भावपूर्ण दृष्टींत दृष्टि मिसळून त्याच्या हृदयाचा ठाव घेत सारे जीवन घालवावे

– ❦ –

माझी आणि अरूची गट्टी जमली लवकरच त्याच्या शिवाय मला खेळ सुचेनासा झाला, खाणे रुचेनासे झाले, अभ्यासात गोडी लागेनाशी झाली. आमच्या या प्रेमाचे साऱ्यानाच मोठे नवल वाटे, व दिनूला तर तें कधींच आवडले नाही मी श्रीमत आईबापाची एकुलती एक मुलगी माझ्या मैत्रीपासून नाही म्हटले तरी पुष्कळच फायदे होण्यासारखे होते,—नव्हे, होतच असत ते फायदे नवीन आलेल्या अरूला मिळावे व त्याच्यामुळे आपल्यावर त्याना मुकण्याची पाळी यावी, ही गोष्ट त्याच्या मामेभावडाना सहन नाही झाली. मला वाटते, लहानपणी मुले थोडी क्रूर असतात. कदाचित् समजूत आलेली नसल्यामुळेंही त्याच्या हातून क्रूरपणाचे चाळे घडत असतील. एरवीं बिचाऱ्या

फुलपाखराच्या पायाला दोरा बांधून त्याची तडफड पहाण्यात किंवा गोगल-गाईच्या अंगाला काडी टोचून तिचे हाल करण्यात त्यांना मौज का वाटावी ? पण वाटते खरी विशेषत, त्याच्या नात्यातल्या किंवा खेळातल्या मुलांपैकी जो गरीब किंवा लहान असेल, त्याला त्याच्या त्या स्वभावाचा उपद्रव फार होतो अरु लहान नव्हता, पण पोरका होता, व त्याचे हे पोरकेपण त्याच्या स्वत च्या मनापेक्षाही त्याच्या मामेभावडांच्या मनावर अधिक तीव्रतेने बिंबलेलें होते त्याच्या मामी तशा फार प्रेमळ होत्या पण, आभाळातून पडणारे दव जसे भोवतालच्या पानांनी कळीच्या वाट्याला येऊ देऊ नये, तसा मामीच्या प्रेमाचा उबारा त्या भावंडांनी अरूला फारसा लाभू दिला नाही त्यामुळे उन्हाची झळ फार लागावी व पाणी मात्र त्या मानानें अगदीच कमी मिळावे,—आणि कोवळा रोपा मग जसा करपत खुरटत वाढत जातो, तशी झाली त्याची अवस्था माझ्या लक्षात आली नाही त्याची ही स्थिति पण आईच्या ध्यानात मात्र हा प्रकार तेव्हाच आला —बायकांची नजर अशा बाबतीत नेहमीच बारीक असते फार —शिवाय तिची स्वत ची मुलाची हौस अपुरी राहिलेली त्यामुळें तिला लवकरच लळा लागला त्याचा तो इतका की, शाळेतून आल्यावर मी जर एकादे वेळी त्याला हाक मारावयाला विसरलें, तर आईने स्वत च हाक मारावी त्याला तिचे मातृप्रेम जसे काही वाटलें गेलें आम्हा दोघामध्ये —केव्हा केव्हा तर ती म्हणावयाची सुद्धा, “ आमच्या अनूच्या पाठीवर काही झाल नाही अरूमुळ तिची निदान भावाची हौस तरी फिटेल ! ” आणि, त्यानंतर जी पहिलीच भाऊबीज आली, त्या दिवशी तिने माझ्याकडून त्याला ओंवाळवलाही ! तिला बिचारीला काय कल्पना की, बाळपणच्या त्या अनोळखी भावनांची परिणति पुढे निराळ्याच विकारात होईल म्हणून !



अरूच्या स्वभावात खेळकरपणा कसा तो मुळी नव्हताच मी खेळावयाला लागलें, म्हणजे तो माझ्याबरोबर काय खेळेल तेवढाच त्याने स्वत होऊन कधी काही खेळाची कल्पना काढली आहे, असे घडलेलें नाही सहसा त्याचा आवडता खेळ एकच तो म्हणजे चौपाटीवर ज्या वेळी आम्ही गड्यांबरोबर फिरावयाला जात असू, त्या वेळी ओल्या वाळूत बसून घरकुलें करावयाचा.

चौपाटीवर गेल्याबरोबर तो मला म्हणावयाचा, " अनू, आज तुझ्यासाठी की नाही मी एक छानदार राजवाडा बांधणार आहे " आणि, शंख, शिंपले, वाळू वगैरे चौपाटीवर सापडणाऱ्या निरनिराळ्या वस्तूंचा उपयोग करून तो खरोखरच इतकी सुंदर घरकुले बांधावयाचा की, आपण चिमकुली मत्स्यकन्या होऊन त्याच्या त्या राजवाड्यात रहावे, असे वाटत असे मला पुष्कळदा तो केव्हा केव्हा मला म्हणत सुद्धा असे की, " त्या मरमेडप्रमाणे आपल्याला जर समुद्रात रहाता आल असत, तर किती मजेत गेला असता ग आपला वेळ ! " आणि, जणु काही, ते सुख कल्पनेने अनुभवण्यासाठीच तो वाळूची घरकुले रोज नेमाने बांधावयाचा त्याला घरकुले बांधणे जितके आवडत असे, तितकेच ती वाहून गेलेली पहाणेही आवडत असे जवळ येणाऱ्या लाटाच्या फुटून पसरणाऱ्या फेसाळ पाण्याने घरकुले वाहून जात असता तो अगदी निश्चल नजरेने ते दृश्य पहात उभा राहावयाचा छातीवर दोन्ही हात ठेवून सभय उत्कंठेने आपण रचलेल्या घरकुलाचा विध्वंस पहात उभी असलेली त्याची ती चिमकुली गंभीर मूर्ति आजही मला दिसत आहे आपल्या डोळ्या-पुढे त्या वेळी त्याच्या उदास डोळ्यात अशी काही चमत्कारिक लकाकी उत्पन्न व्हावयाची की, उसळत्या लाटाचा चांदण्यात चमकणारा फेसमुद्धा मला तिच्यापुढे फिका वाटत असे ! एकदा लाटाचा हा खेळ तो टक लावून पहात असता त्याच्या खांद्यावर हात ठेवून मी त्याला विचारले, " अरू, त्यात एवढ न्याहा-ळून पहाण्यासारख काय आहे रे ! " त्याबरोबर माझ्या दृष्टीला दृष्टि भिडवून त्याने मला म्हटले, " का नाही ? आपल्या आशाची सुद्धा नाही का पुष्कळदा अशीच अवस्था होत, अनू ? " मला राहून राहून नवल वाटे की, इतक्या लहान वयात याच्या मनात इतके मोठमोठे विचार येतात तरी कसे ? तो सदोदित कसला ना कसला तरी विचार करण्यात चूर असावयाचा मी कितीदा तरी त्याला विचारले असेन, " अरू, तू उदास कसा असतोस असा एकसारखा ? " त्यावर तो हसून म्हणावयाचा, " ते कळायच नाही कधी तुला अनू ! माझ्यासारख पोरक व्हाव लागत त्याच्यासाठी ! "—एकटी आई गेल्यामुळें खरोखरच इतका फरक पडतो का मुलात ? अरूची ती उदास वृत्ति म्हणजे मला गूढच वाटे ते एक

– ॾ –

आणि मला तसें वाटणें स्वाभाविक होते अगदी अरूला कमतरता अशी खरोखरी कोणत्याच गोष्टीची नव्हती त्याच्या वडिलाकडून दर महिन्याला नेमाने खर्चासाठी पैसे येत असत, व पधरवड्यातून एकदा त्याचे पत्रही येत असे त्याला मग अरूने इतके उदास का असावे ? सुख म्हणजे काही केवळ गरजेचा अभाव नव्हे, तर ती एक मनाने उपभोगावयाची चीज असते, याची जाणीव झालेली नव्हती मला अद्याप लहानपणी फूल सुवासापेक्षा भडक रंगामुळेंच जास्त आवडते. तसेच थोडेसे बाळपणच्या सुखाचेही नसते का ? मनाच्या नाजूक, सूक्ष्मग्राही शक्ति जणु काही सुप्तावस्थेत असल्यामुळेंच सुखाला काही मानसिक बाजू असेल, असे मुळी वाटतच नाही त्या वयात शिवाय, लहानपणी आपल्या सर्व सुखाचा उगम जेव्हा एका विशिष्ट व्यक्तीच्या प्रेमांतून झालेला असतो, तेव्हा त्या व्यक्तीचा थोडासा सुद्धा विरह हा मनातल्या नाजूक भावना जागृत करावयाला कधी ना कधी तरी कारण होतो पण माझी स्थिति तशी नव्हती आई आणि आप्पा या दोघांचेंही माझ्यावर इतके प्रेम होतें कीं, त्यापैकीं कुणाकडे माझा ओढा अधिक होता हेंच सागणें कठीण. त्यामुळें प्रेमाची उणीव म्हणून जिला म्हणतात, ती काय चीज असते याची मुळीं कल्पनासुद्धां नव्हती मला माझ्या वर्तनातला स्वच्छंदीपणा पाहून आई पुष्कळदा मला म्हणत असे की, "अनू, तू जर अरूसारखी आईवेगळी असतीस तर कळल असत तुला या वागण्याच सुख !" पण तिच्या या बोलण्याचा उमज मला कधीच पडला नाहीं उलट, मला वाटे, पोरकेपणात असें काय मोठे आहे कीं, ज्यामुळ अरूचें जीवित कडवट्न—काळवडून जावें ? पण एक दिवस अचानक उकललें हें गूढ मला आठवतें, दिवाळीची सुटी नुकतीच सुरू झाली होती त्या दिवशी दुपारीं आमच्याकडे करज्या करण्याची गडबड होती, व स्वयपाकघरात जमलेल्या बायकाच्या घोळक्यात मीही माझें खेळांतलें पोळपाट लाटणें घेऊन काही तरी चाळे करीत बसलें होते इतक्यात माझ्या कानावर हाक आली—"अनू अनू !" त्याबरोबर तशीच उठून धांवत बाहेर आलें मी आणि पहाते तो दारात अरू उभा ! तोंड अगदीं उतरून गेलेलें, ओंठ थरथरत होते, डोळ्याच्या कडावर आसवे तरारत होतीं; व मुठींत कांहीं तरी लपविलेले होते. त्याची ती स्थिति पाहून मला कसेंसेंच झालें,

व त्याच्या खांद्यावर हात ठेवून मी त्याला विचारले, "काय झाल रे अरू!" माझ्या तोंडून ते शब्द बाहेर पडले मात्र, त्याच्या डोळ्यातून लगेच आसवे ओघळली



मी हळूच त्याचा हात आपल्या हातात धरला, व त्याच्या मुठींतलें पत्र काढून घेतले ते पत्र अगदी टपोऱ्या अन् तुटक अक्षरात लिहिलेलें होते मी भरदिशी वाचले ते पण मला कळेना की, अरूला इतके वाईट वाटण्यासारखें त्यात काय आहे? दसरा झाल्यापासून तो मला सारखा म्हणत असे, "अनू, घरून परत येताना की नाही मी तुझ्यासाठी खूप खूप गमती आणीन बरं का?" मामाकडे रहावयाला येऊन त्याला दीड वर्ष होऊन गेले होते आता. या मधल्या काळात त्याच्या घरी नवी आई आली होती व त्याला नवा भाऊही पण झाला होता त्याना पाहण्यासाठी अरूचे मन कधीपासून अधीर होऊन गेले होते विशेषत, भाऊ झाल्याबद्दलचे वडिलाचे पत्र ज्या दिवशीं त्याला आले, त्या दिवसापासून तर त्याच्या मनाची अवस्था वारा प्याल्या-सारखी झाली अगदी वास्तविक किती झाले तरी ते सावत्र भावंड आणि, पत्र आल्याबरोबर दुपारी जेव्हा मामींना त्यानें आनंदाच्या भरात ते वाचून दाखविले, तेव्हा त्या उद्गारल्या सुद्धा, "आता घर कशाला दृष्टीस पडत पुन्हा तुझ्या!—हाच धनी होणार उद्या सगळ्याचा!" त्याच्या त्या बोलण्याने अरूचें मन चरकले, पण क्षणभरच आपल्याला भाऊ म्हणावयाला एक हक्काचे माणूस झाले, याचाच त्याला केवढा तरी आनंद झाला मला वाटते, लहानपणीं मुलाच्या मनात दुजा भाव स्वत होऊन फारसा कधी डोकावत नाहीं. घरातली उणी दुणी बोलणी ऐकून आणि वागण्यातले डावे उजवे प्रकार पाहून त्याच्या मनाची ऋजुता नाहींशी होत जाते हळुहळू शिवाय अरूला सावत्रपणाची कल्पना कशी यावी? आई वारल्यापासून गेल्या दीड वर्षांत ज्या घराचें त्याला दर्शन घडलेलें नव्हते, त्याच्या वत्सल स्मृतींनी त्याच्या हृदयाचा प्रत्येक कोपरा न् कोपरा भरून गेलेला होता त्यामुळें घरात नवी आई आल्याबरोबर तेथले वातावरण बदलून गेलें असेल, अशी शंकाही त्याच्या मनाला शिवली नाहीं. आणि, दिवाळी जसजशी जवळ येत चालली, तसतसा घराचा अगदीं

ध्यास घेतला त्याने नवीन धरून पिंजऱ्यात घातलेले पाखरू जसे सारखें फडफड करीत असते, तशी त्याच्या मनाची चुळबूळ चाललेली होती अलीकडे पण आज—आज त्या पत्राने त्याची सारी मनोराज्ये उध्वस्त केली त्या पत्रातील ती तुटक तुटक वाक्ये—त्यानी त्याचे हृदय कसे तोडून टाकले त्यात फक्त एवढेच लिहिलेले होते की, अरूचा धाकटा भाऊ फार आजारी असल्यामुळे त्याने दिवाळीत घरी येणे सोईचे होणार नाही आणि मला त्या वेळी तरी बरोबर वाटले ते माझ्या मनात अशी कल्पना आली की, भाऊ आजारी असताना हा दिवाळीत तिथे जाऊन काय करणार ? त्यापेक्षा इथेच त्याची दिवाळी मजेत जाणार नाही का ? पण, मी त्याला तसे काही तरी बोलणार, तोच तो मला म्हणाला, "अनू, खरच का ग दादा मला आता घरी नेणार नाहीत कधी ? मामी मघाशी म्हणत होत्या—" आणि त्याला एकदम जोराचा हुदका आला ✓



त्या दिवसापासून त्याच्या वृत्तीत अगदी विलक्षण बदल झाला त्या पूर्वी त्याच्या बोलण्यात किती वेळा तरी आई, घर अन् दादा यावयाचे पण त्या दिवसानतर जणु काही त्या तिघाचाही त्याला कायमचा विसर पडला पूर्वी तो स्वत च्या घराविषयी बोलत असला, म्हणजे मी केव्हा केव्हा त्याला म्हणत असें, "तुला जर तुझ्या दादानी इथून पुण्याला कायमचा रहावयाला नेला, तर तुला माझी आठवण होईल का रे कधी ?" त्यावर तो म्हणत असे, "हो हो, न व्हायला काय झाल ? मी दर सुटीला तुला पुण्याला बोलावीत जाईन, अनू !" परतु आता ते घर गेले आणि त्याबरोबरच ती गमतीची भाषणेंही पण गेली. मी कधी चुकून त्याच्या घरी जाण्याबद्दलचा विषय काढला, म्हणजे तो चटकन् गभीर होऊन मला म्हणावयाचा, "इथ काय मी कुणा परक्याच्या का घरी आहे अनू ? अन् तुला खरंच वाटत का ग मी तुला सोडून इथून जाव अस ?" आणि, बोलता बोलता त्याचे डोळे भरून येऊन असे काही लकाकावयाचे की, मला कुठून तो विषय काढला असें होऊन जात असे अगदी खरोखरी, त्या दिवशीच्या त्याच्या वडिलाच्या पत्राने जो फरक त्याच्या जीवनात घडवून आणला, तो प्रत्यक्ष त्याच्या आईच्या मृत्यूचा प्रसगही घडवून आणू शकला नव्हता आई

वारल्यामुळे जे मायेचे धागे तुटले, त्याची ती ताटातूट त्या वेळी जाणवली नव्हती त्याच्या मनाला वेलीपासून तोडलेले फूल किती तरी वेळ टवटवीत रहाते,—ती ताटातूट किती तरी वेळ जाणवत नाही त्याला त्यातही ते तोडल्या-बरोबर जर लगेच पाण्याने काठोकाठ भरलेल्या पुष्पपात्रात ठेवलें, तर ज्या जीवनरसावर त्याची टवटवी अवलबून असते, त्या रसाला आपण मुकल्याचे त्याला लवकर मुळीच कळत नाही तसेच अरूचे झाले आई मरण पावल्यावर महिन्याने तो मामाकडे रहावयाला आला मामाची चौकस आस्था, मामीचे प्रेमळ कौतुक, बरोबरीच्या मुलाचा आनददायक सहवास आणि आपल्याला स्वत चे घर असल्याची नेमाने आठवण देणारे वडिलाचे पत्र—त्याला कधीच वाटले नाहीं की, आई वारल्यामुळे आपल्या जीवनात काही विशेष फरक पडला म्हणून पण, त्या पत्राने साऱ्या साऱ्या गोष्टी जणु त्याच्यापुढे उघड्या वाघड्या करून माडल्या, त्याच्या जीवितात घडून आलेल्या परिवर्तनाची प्रत्येक रेषा न् रेषा जणु त्याला दाखवून दिली वस्तुत त्याच्या परिस्थितीत तसा फरक काहीच पडला नव्हता वडिलाचे पत्र आणि मनिआर्डर दोनीही कशीं अगदी वेळच्या वेळी येत असत पूर्वी त्याच्या दादाचे पत्र आले, म्हणजे त्याचा तो दिवस मोठ्या आनदात जावयाचा, त्याला त्या पत्राशिवाय सुचा-वयाचे नाही दुसरे काही तो स्वत ते कितीदा तरी वाचावयाचा अन् सारा दिवस त्याच्याचविषयी मजजवळ बोलावयाचा मी त्याला म्हणतसुद्धा असें, “तुझ्या दादाच नुसत पत्र आल्यान जर तू इतका वेडावून जातोस, तर ते स्वत च जर तुला न्यायला इथ आले, तर तुझ कस होईल रे अरू?” माझ्या या कल्पनेने इतका आनद होत असे त्याला की, तो एरवीचा आपला सारा गभीरपणा टाकून खूप खूप हसावयाचा पण आता ते पत्र आलेले सुद्धा कळत नसे मला जणु काही मनिआर्डरीचे कूपन आणि ते पत्र त्याला सारखेंच वाटे !



त्या दिवसापासून त्याचे मन मला अगदी घट्ट घट्ट बिलगलें त्या पूर्वी त्याचें माझ्यावर प्रेम होते खरें, पण ते वाटलेलें होतें मजवर प्रेम करित अस-ताना सुद्धा आणखीही माणसे आपल्याला प्रेम करावयाला आहेत, अशी जाणीव होती त्याला पण ते पत्र वाचल्यापासून त्याचें मन त्या इतर साऱ्या

आधाराना मुकले व सर्वस्वाने मला येऊन बिलगले तसे पाहिले तर माझ्यापेक्षा मनू त्याला अधिक जवळ नव्हती का ? एका परीने समदु खी होती ती दोघे तो आईच्या मृत्यूमुळे स्वत च्या घराला आचवला होता, तर ती अदृष्टाच्या दुष्टाव्यामुळें आपल्या घराला कटाळली होती झाडाची मुळे पाण्याचा ओलावा ज्या बाजूला मिळेल, त्या बाजूला पसरत जातात आपोआप मनुष्याच्या भावनाचेही तसेच नाही का ? प्रेमाचा जिव्हाळा जिकडे म्हणून लाभेल असे त्याला वाटते, तिकडे धाव घेते त्याचे मन स्वत च्या भावडाना पाठमोरें झालेले मनूचे सारें सौहार्द पोरक्या अरूच्या वाट्याला आले वस्तुत ती अत्यत प्रेमळ, पराकाष्ठेची लाघवी होती पण, कोवळ्या वयात आईच्या ससाराचा अर्धामुर्धा भार तिच्यावर पडल्याकारणाने तिचे मन गुदमरल्यासारखे, आकाक्षा खचल्यासारख्या होऊन गेल्या लहान मुलाना वाढविणे हें फुलाना हातात खेळविण्यासारखे आहे, असे कवीनी म्हणावे पाहिजे तर कारण, फुलाना खेळविण्याचा आनद जरी कदाचित् त्याना नेहमी लाभत असला, तरी मुलाना खेळविण्याचा प्रसग मात्र त्याच्यावर येत नाही सहसा तेव्हा, पाठची भावडे एकामागून एक कडेवर येऊन बसू लागली, म्हणजे त्याच्यापेक्षा तीन चार पावसाळेच अधिक पाहिलेल्या मुलीच्या आयुष्याचा कसा उन्हाळा होतो, याची त्याना काय कल्पना असणार ! मनूला आपल्या भावडाचा अतिशय लळा होता पण त्याच्या अवखळ चाळ्याना तिच्या अल्लड प्रेमाचा सोशिकपणा अपुरा पडत असे त्यामुळे, आपल्या भावडाकडून कळत न कळत होणारी अरूची गाजणूक बघून, त्याच्या खस्ता खाऊन उबगलेल्या तिच्या प्रेमाचा ओघ त्याच्याकडे वळला तिच्या कोणत्याही खाऊतला अर्धा वाटा हटकून त्याला मिळावयाचा, अन् त्याचा कैवार घेऊन ती नेहमी दिनूशी भाडावयाची आणि ती स्वभावाने जशी गोड तशीच दिसावयाला तरी किती सुरेख होती ! आई पुष्कळदा म्हणावयाची, " मनूच्या अगावर काहींही घातल, तरी ते खुलून दिसत काय रूप दिलय देवान पोरीला ! कुणा भाग्यवताच घर शोभवणार आहे कुणाला ठाऊक !" अरूला तर तिच्या रूपाचे मनस्वी कौतुक होते मला अगदी पक्के आठवते की, आम्ही इग्रजी सातवीत गेल्यावर त्याने जी आपली पहिलीच कविता मला दाखविली, ती जरी केशवसुताच्या ' मनोहारिणी ' वरून सुचली होती त्याला,

तरी तीत केलेलें वर्णन मात्र मनूचें होते सारें आणि निदान माझ्यापासून तरी तिच्या रूपाविषयीचे हे आपलें कौतुक त्याने लपवून ठेवण्याचा प्रयत्न केला नाही कधी तो मला एकदा बोलता बोलता सहज म्हणाला, "आपली मनू किती सुदर दिसते नाही ग ! मला केव्हा केव्हा वाटत की, सध्याकाळी समुद्रावर फिरायला न जाता तिच्याकडे पहातच घालवावा वेळ तिच्या गालावर सध्येची लाली आहे, डोळ्यात तारकाच तेज आहे, केसात क्षितिजाचा नीलिमा आहे, भुवयात लाटाची वक्रता आहे अन् हसऱ्या ओठावर त्याच्या फेसाचा शुभ्रपणा आहे ! " मला गमत वाटली त्याच्या त्या बोलण्याची, व मी त्याला म्हणाले, " मग तू फिरायला कशाला येतोस माझ्याबरोबर अरू ?—त्या पेक्षा सध्या-काळच्या वेळी मनूकडे पहात बसलेल बर नाही का ! " त्यावर तो किंचित् ओशाळून मला म्हणाला, " तस नव्हे ग —मला तिच्याकडे पहात रहावस न् तुझ्याशी बोलत रहावस वाटत आणि, मी फिरायला येतो, तो केवळ तुझ्याशी मनसोक्त बोलायला मिळाव म्हणून ! "



आणि, मनूचे शिक्षण जर निर्वेध चालू राहिले असते, तर, मला वाटते, त्याच्या प्रेमाचा ओघ नि सशय तिच्याकडेच वळला असता पण, ती इग्रजी चौथीत गेली नाही, तोच तिचे शिक्षण बद पडून घरात लग्नाच्या गोष्टी सुरू झाल्या ती जर वेगळ्या परिस्थितीत वाढलेली असती, तर तिला कदाचित् या गोष्टीचे वैषम्य वाटले नसते एवढे पण लहानपणापासून बरोबर शाळेत जाणाऱ्या मुली आम्ही आणि, एकाच ठिकाणी उगम पावलेल्या नद्यापैकी एकीचा प्रवाह अप्रतिबध वहात रहावा व दुसरीला मात्र उगमापासून थोड्या अतरावर धरण बाधले जावे, तशी झाली आता आमच्या आयुष्याची अवस्था मी मनूच्या आईला पुष्कळ सागितले की, तिचे शिक्षण तुम्ही इतक्यात बद करू नका पण त्या हसून मला एवढच म्हणाल्या, " अग, तिला तुझ्यासारखी बेगम वाढवून घरात बाळगायला ऐपत आहे का आम्हाला ? " त्यावर मी त्याना म्हटलें, " माझ्यासारखी बेगम कशाला ? शिकली सवरली तर चागली राणी होऊन बसेल हो ती आपल्या रूपागुणानी ! तुम्हाला उगाच वाटते काळजी तिच्या लग्नाची ! " तेव्हा त्या म्हणाल्या, " नाहीं ग बाई ! तुम्हा शिाळकरीं

मुलींना व्यवहार कळत नाहीं म्हणतात तो असा ! रूपाला जर किंमत असती एवढी, तर हुज्ज्यासाठी अडवून कशाला धरल असत लोकानी आम्हाला ? त्यातून हिच्या राशीला तर आणखी मगळ आहे बसलेला !" त्याच्या त्या उत्तराने मी कशाला हे बोलणें काढले असे होऊन गेले मला पण त्याचा तरी निरुपायच नव्हता का ? आज मुली अविवाहित राहिल्या, तरी कुणालाच त्याचे फारसें काही वाटत नाही पण आमच्या वेळी तशी स्थिति नव्हती स्वत ला सुधारक म्हणविणारे चागले सपन्न लोकसुद्धा एका विशिष्ट वयापलीकडे मुली वाढवीत नसत त्या वेळी शिवाय मुलीच्या शिक्षणासाठी पैसा खर्च करावयाचा व पुन्हा लग्नाच्या वेळी वरदक्षिणा द्यावयाची, एवढे सामर्थ्य मध्यम स्थितीतल्या माणसाना कोठून असणार ? पण, मला वाईट वाटले, ते मनूचे शिक्षण बद पडल्याबद्दल नव्हे, तर ती मनानें सुद्धा आम्हाला दुरावल्याबद्दल ती केव्हाही आमच्या घरीं आली, तरी तिच्या हातात भाडे किंवा कडेवर भावड हें असावयाचेच, व बोलावयाला वेळ असला, तरी ती स्वयपाकघरात आईशीच गप्पा मारीत बसावयाची माझ्या अभ्यासाच्या खोलीत येऊन काय बोलणार बिचारी माझ्याशी ? मला तिचा आवाज ऐकू आला, म्हणजे मी धावत धावत खाली जाऊन तिला वर येण्याचा आग्रह करीत असे त्यावर ती म्हणावयाची, " नको बाई ! याला घेऊन कुठ येऊ तुझ्या खोलीत ? तो तुझ्या टेबलावरल्या साऱ्या वस्तु विस्कटून टाकील नू आवरायला लागलें तर वरती आणखी भोकाड पसरील ! कशाला तुला त्रास उगाच ?" अशा वेळी अरू माझ्याबरोबर असला, म्हणजे तो तिला म्हणत असे, "मी खेळवतों त्याला —पण तू जरा वर तर चल मनू !" त्यावर ती म्हणावयाची, " नको रे बाबा ! तू खूप खेळवशील पण तो खेळला पाहिजे ना ? तिथ टेबलावर माडलेली गौर पाहिल्यावर ते सारं उडवण्यासाठी थैमान करील तो अगदी ! उगाच कशाला तुमच्या अभ्यासात आमची अडचण ?" अरू नसला, म्हणजे एकादे वेळीं तरी ती येत असे वर पण, तो असला, म्हणजे असे काही तरी उत्तर अगदी ठेवलेले



त्याच्या मनूविषयीच्या आसक्तीची प्रतीति लवकरच आली मला त्या दिवशीं आमच्याकडे चैत्रगौर असल्यामुळें मनू सकाळपासूनच रहावयाला

आली होती दुपारी आईने तिलाही सजविली माझ्याबरोबर, व आम्ही दोघीनीच बहुतेक हळदीकुकू दिले मनूची मनोवृत्ति आज प्रफुल्लित होती अगदी तिच्या मागें घरच्या कामाचा काच नव्हता, भावडाची भुणभुण नव्हती आणि, ज्या एका गोष्टीविषयी तिचे मन अलिकडे अगदी विटून गेले होते, त्याही गोष्टीचा तिच्यामागचा ससेमिरा सुटला होता आज तिचे रूप पाहून पुष्कळदा सहज जुळणारे लग्न तिची पत्रिका पाहिल्यावर हटकून मोडत असे त्यामुळें ती स्वत ला अलिकडे अगदी कटाळल्यासारखी झाली होती घरी तिच्या लग्नाचा काथ्याकूट सदोदित चाललेला असे, व तिला जरी कोणी अधिक उणें बोलत नसे काही, तरी मगळाचा उद्धार मात्र दिवसातून केव्हा तरी एकदा व्हावयाचाच ! आज तिच्या मागचा तोही त्रास चुकला होता त्यामुळे आनदात होती ती अगदी त्या दिवशी सध्याकाळी काही अरूची न् माझी गाठ पडली नाही नेहमीप्रमाणे फिरून परत आल्यावर तो रात्री गौर पहावयाला आला आम्ही दोघी गालिचावर बसलो होतों आत आल्यावर त्याने एकदा आमच्याकडे व एकदा गौरीकडे पाहून हसत हसत म्हटले, “ आमच्या मनूताईला जर बसवली असती की नाही हिंदोळ्यावर आज अनू, तर एवढ सार माडण्याची यातायात न पडताच तुमचा वसतोत्सव शोभून दिसला असता ! ” त्यावर मनूने किंचित् लाजून त्याला म्हटले, “ ही काय रे भलतीच थट्टा तुझी अरू ! ” “ थट्टा नाही ग —अगदी खर खर बोललों मला वाटल ते मामाची स्थिति यापेक्षा जरा चागली असती, तर तुझ्या गुणाच चीज झाल असत मनुताई ! ”—त्यानें एकदम गभीर होऊन म्हटले आणि तेवढ बोलून ती दोघेही अगदी स्तब्ध राहिलीं मला काय बोलावे हे सुचेना अखेर, त्या दु सह होत चाललेल्या स्तब्धतेचा भग करण्याच्या हेतूनें मी मनूला म्हटले, “ अग, याला डाळ न् पन्ह नाही का द्यायच मनू ? ” त्याबरोबर ती उठली, तिने उसासा टाकला अन् ती आत गेली तेव्हा मी अरूला म्हटले, “ भलत्याच वेळी भलताच विषय कशाला काढलास तू हा ?—सारा दिवस कसा आनदात गेला होता आज आमचा ! ” पण त्याचे माझ्या बोलण्याकडे मुळी लक्षच नव्हते तो अर्धवट आपल्याशीच बोलत मला म्हणाला, “ आज तुम्हा दोघीना पाहिल्यावर की नाहीं मला वाटल रजनी आणि उषाच बसल्या आहेत मूर्तिमत माझ्यापुढ ! ”

" अन् तू कोण शुक्रतारा का रे ?—तुम्ही कवि कुणाला काय उपमा द्याल याचा काही नेम आहे का अरू ? " मी त्याला गमतीने म्हटले " कुणाला ठाऊक मी कोण आहे ते !-पण अनू, आज मनूताई किती सुदर दिसतेय नाहीं ग ? अगदी उषा, उषा! वसत आणि प्रभात याच सार सोदर्य जस एकवटून तिच्या ठिकाणी अवतरलय!—" All things else about her drawn—From May-time and the cheerful dawn!" तो कसल्या तरी तद्गीत असल्याप्रमाणे स्वत शीच पुटपुटला मी त्याला आणखी काहीं विचारणार, तोच मनू पन्हे घेऊन आली व आमचे बोलणे तितक्यावरच राहिले

– ❦ –

पण मला मात्र त्या दिवशी रात्री किती वेळ तरी झोप आली नाही वस्तुत त्याच्या त्या बोलण्यात नवीन असें काहीच नव्हते अलिकडे त्याला मधून मधून लहरच येत असे मनूविषयी असें काही तरी बोलण्याची अभ्यासाच्या अगदी ऐन भरात किंवा गप्पाच्या अगदी ऐन गर्दीत तो विमनस्कतेने मध्येंच मनूविषयी काही तरी बोलावयाचा—काही तरी विचारावयाचा त्याच्या त्या बोलण्याला काहीं कारण नसे, विचारण्याला काही सगति नसे विशेषत:, तिच्या लग्नाची वाटाघाट जोरानें सुरू झाल्यापासून तर त्याची ही विमनस्कता वाढतच गेली, तिच्याविषयीचे हे काही तरी बोलणे नित्याचे होत चालले झोपेंत माणसाने जसें विचूक बोलावें ना, तसें त्याचे ते बोलणे भासत असे मला पण, मनुष्याला जें आपले मनोगत जागेपणी उघड उघड बोलून दाखविण्याचा धीर होत नाहीं, तेच पुष्कळदा त्याच्या झोपेंतल्या बरळण्यातून बाहेर पडत नाही का ?—मला केव्हा केव्हा वाटत असे, हा जें हें मधून मधून बोलतो, तें त्याच्या मनात सतत घोळत असलेल्या विचाराचे तर निदर्शक नसेल ना ?—प्रवाहाच्या अतरंगात पोहणारे मासे ज्याप्रमाणें मधून मधून वर उसळी मारतात न् पुन्हा नाहींसे होऊन जातात, तसे त्याच्या अतःकरणातील मनूविषयींचे विचार असे अवचित वर उसळत नसतील ना ? तिच्याविषयी बोलताना माझा उल्लेख मात्र कधीही करीत नसे तो आजच पहिल्यादा आमची दोघीची तुलना करणारें ते वाक्य त्याच्या तोडून ऐकले मी, व मला अगदी कसेंसेंच झालें. मनूच्या रूपावर तो लुब्ध आहे हें पहातच होते मी इतके

दिवस पण आज त्याची ती लुब्धता त्या तुलनेमुळे माझ्या मनाला अगदी तीव्रतेने जाणवली —कोणत्या अर्थाने मधूने रजनी म्हटलें मला ?—मी काळी आहे—मला केस पुष्कळ आहेत—माझ्या वृत्तीत गभीरपणा आहे म्हणून ?— हा विचार सारखा घोळत होता माझ्या मनात मला रजनीची उपमा देऊन मी मनूइतकी त्याला प्रिय नसल्याचे तर त्याने पर्यायाने सुचविले नसेल ना ? —ही कल्पना सारखी सतावीत होती माझ्या मनाला तुम्ही दोघी मला निर-निराळ्या परीनी पण सारख्याच आवडता, असे तो जें मागे एकदा मला म्हणाला होता, ते सारे खोटेच तर मग !—अशी शका त्या कल्पनेच्या पाठो-पाठ माझ्या मनात आली आणि मला मनूच्या रूपाचा हेवा—अगदी पहि-ल्यादाच हेवा वाटला मनाच्या त्या सत्रस्त स्थितीतच अखेर डोळा लागला माझा पहाटच्या सुमारास मला अगदी चमत्कारिक स्वप्न पडलें अधार नुकताच झाला होता मी गॅलरीत एकटीच उभी राहून समोर तळपत असलेल्या शुक्राच्या ताऱ्याकडे टक लावून बघत होते पहाता पहाता तो तारा मोठा होत गेला, व त्याच्या जागी हळुहळू अरूची आकृति मला दिसू लागली काही वेळाने तो माझ्या अगदी जवळ येत आहे, असे वाटले मला आणि, मी त्याला काही बोलणार, तोच तो म्हणाला, “ माझी ओळख पटली का तुला अनू ? तूच नाही का मघाशी मला शुक्रतारा व्हायला सागितलस ? हा पहा, मी या वेळी तुझ्यासाठी उगवलो आहे अन् पुन्हा पहाटे मनूसाठी उगवेन रजनी न् उषा ! मला तुम्ही दोघी सारख्याच प्रिय आहा, अनू ! ” इतके बोलून तो मोठ्याने हसला त्याबरोबर हजाऱ्यातून जशा पाण्याच्या धारा अगावर पडाव्या, तसा त्याच्या त्या हास्यातून तेजाच्या मधुर तुषाराचा वर्षाव माझ्यावर होऊन, त्याचे किरण माझ्या शरीराला चोहो बाजूनी लपेटताहेत, असा भास मला झाला आणि मी दचकून उठलें

- २ -

मनूच्या आयुष्याला वेगळी वाट फुटली लवकरच आम्हीं परीक्षेच्या अगदीं गडबडींत होतों, व एक दिवस अचानक तिचे लग्न जमल्याचे कळलें आमचा संस्कृतचा पेपर ज्या दिवशी होता, त्या दिवशीच लग्न झालें तिचें अर्थात् मला न् अरूला लग्नात जवळ जवळ मुळींच भाग घेतां आला नाहीं मी

लग्नाच्या वेळी तरी हजर होतें पण अरूनें तर तेवढाही शिष्टाचार पाळला नाही नवरा मुलगा मला नीटसा पहावयाला मिळाला नाही पण, मला एवढे कळले होते की, घरचा जरी तो गरीब असला, तरी दिसावयाला मात्र बरा आहे लाजाहोम झाल्यावर मी मुद्दाम रात्री वेळ काढून भेटावयाला गेले मनूला ती बायकाच्या घोळक्यात अगदी गुरगटून बसलेली होती मी तिला उठवून एकीकडे नेले, व सहज थट्टेने म्हटले, " आयुष्यातली सगळ्यात मोठी परीक्षा उतरलीस नाही तू आज मनू ?" तेव्हा ती अगदी खिन्नपणाने उद्गारली, " कर बाई थट्टा गरिबाची !—तू जर अस बोलायची नाहीस, तर दुसर कोण बोलणार आहे ? इतकी का मी लग्नासाठी हपापलेली होते अनू ?—हे घर एकदाच सुटल एवढच काय ते जिवाला समाधान ! " तिचे ते बोलणे ऐकून मला अगदी ओशाळल्यासारख झाले आजपर्यंत मला असें कधीही वाटले नव्हतें की, शिक्षण थांबून आपल्या आयुष्याला वेगळे वळण लागल्याबद्दल तिच्या मनाला इतक्या वेदना होत असतील पण ऐन लग्नाच्या आनदात तिनें आपल्या हृदयाची ती जखम उघडी करून दाखविली मला आज, व ज्या विनोदाच्या अपेक्षेने मी तिथे आले होते, त्याचा अगदी विरस झाला एका ठिकाणी वाढलेल्या आम्ही पण मी आणखी काही वर्षे तरी स्वतत्र रहाणार आणि मनू ?–तिने मात्र एव्हापासून दुसऱ्याच्या घरी नांदावयाला, राबावयाला जावयाचे ! आमच्या भवितव्यातला हा फरक तीव्रतेने जाणवून का नाही तिला वाईट वाटू ? पण या फरकाबद्दल दोष तरी कुणाला द्यावा ? आता मला हें कळते की, समान अभिरुचीच्या मुलाच्या जीवितात अशा तऱ्हेचा फरक पडावयाला केवळ समाजाची विषम रचना, माणसामाणसातील आर्थिक परिस्थितीचा कृत्रिम भेदच कारण होत असतो पण त्या वेळीं ही कल्पना कोठून असणार ? तिच्या त्या उद्गाराबद्दल मला वाईट तर वाटलेच, पण आश्चर्य त्याहीपेक्षा जास्त वाटले आमच्या बरोबरीच्या किती तरी मुलीची लग्ने होऊन त्याचे ससारही एव्हाना सुरू झाले होते मग मनूनेच एवढे कष्टी का व्हावे या बाबतीत ?—हा विचार पुन पुन्हा येत होता माझ्या मनात आणि, लग्नमडपातून मी जी घरी आले, ती अगदी नाउमेद होऊन अरू माझी वाटच पहात बसलेला होता मी त्याला जरा रागानेंच म्हटले, " आपली स्वारी

होती कुठ इतका वेळ ? घरी लग्न आहे याची शुद्ध तरी होती का तुला अरू ?" "मला फक्त परीक्षेची शुद्ध आहे, अनू" त्याने हसून म्हटले पण त्याचा चेहरा उतरलेला होता अगदी तो थोडा वेळ घोटाळला न् मला हळूच म्हणाला, "त्या लग्नात आनद मानण्यासारख एवढ काय आहे अनू ? आपण दोघ आणखी दोन महिन्यानी कॉलेजात जाऊ अन् आपली एक बाळमैत्रीण मात्र आजपासून ससाराच्या गाड्याला जुपली जाणार, याबद्दल आनद मानायचा का खेद ? तुला तरी एवढा विचार खास सुचायला हवा होता पण, तुम्ही बायका कितीही शिकला सवरलात, तरी लग्न म्हणजे तुम्हाला आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यता वाटते, नाही ग ? मला सकाळपासून सारख वाटतय की, मनू आपल्याला मुकली—अगदी कायमची मुकली अन् तू विचारतेस मी लग्नाला का हजर राहिलो नाही ? काय सागू तुला अनू ?—आज पेपर लिहिताना सारख ते बोहल माझ्या डोळ्यापुट दिसत होत !" बोलता बोलता त्याने एकदम घट्ट धरला माझा हात, व तो आपल्या कपाळावर दाबला किती कढत होते त्याचे ते कपाळ ! मला कळेना, मनूचं लग्न झाल्याबद्दल याला वाईट वाटते आहे की तिच्या सहवासाला मुकल्याबद्दल वाईट वाटते आहे ?

– ❦ –

आम्ही प्रथम ज्या दिवशी कॉलेजात गेलो, त्या दिवसाचे चित्र आज हुबेहूब उभे आहे माझ्या डोळ्यापुढे आमच्या शेजारच्या बगल्यातली कीर्तिकराची कालिदी या वेळी बी ए च्या वर्गात होती तिने माझी सारी तयारी करून दिली अबाड्यातल्या गजऱ्यापासून तो साडीच्या गार्टरपर्यंत साऱ्या वस्तु तिने स्वत च्या पसतीने घेतल्या मला सायलीची फुले आवडत असत, पण तिने माझ्यासाठी अबोलीच्या फुलाची वेणी घेतली मला गर्द काळा रग आवडत असे, पण तिने माझ्यासाठी आभाळी रगाचे पातळ निवडले मला चपला आवडत असत, पण तिने माझ्यासाठी उच टाचेचा बूट घेतला तो घेत असतानाच मी तिला म्हटले, "असले हे बूट घालून मला काही धड चालता येणार नाही, कालिदी !" तेव्हा ती हसून मला म्हणाली, "बायकाच्या जातीला चालताना अडखळण शोभूनच दिसत हो अनू ! एकावलीच् गुतण उर्वशीच्या किती उपयोगी पडल माहीत नाही तुला ! माझ्यासारख सस्कृत घे तू—म्हणजे

कळेल तुला सार!" माझ्या केसावर तिने इतके कचकड्याचे आकडे न् पोषाखावर इतक्या पिना बसविल्या को, मला जखडल्यासारखे होऊन गेलें अगदी तो सारा शृगार आटोपल्यावर मला आपल्या समोर उभी करून ती हसत हसत उद्गारली, "शकुतलेला जशी तिच्या सख्यानी दुष्यताकडे जाताना सजविली की नाही, तशीच मी आज तुला सजविली आहे बर का अनू!" त्यावर मी तिला म्हटले, "हे काय भलतच बोलतेस कालिंदी? शकुतला सासरी जायला निघाली होती न् मी आज कॉलेजात जाणार आहे!" "अग, कॉलेज हा सासरच्या वाटेवरला एक टप्पा आहे, असच समज तू अनू!" तिने अगदी मनापासून हसून म्हटलें "मुलाच शिकण हे चागली नोकरी मिळविण्यासाठी न् मुलीच शिकण हे चागला नवरा मिळविण्यासाठी असत हो!— तू आज कोणत्या नव्या जगात प्रवेश करण।र आहेस याची काही कल्पना आहे का तुला! नाही तर म्हणाली नसतीस तू अस!" तिच्या त्या बोलण्यात तिच्या दृष्टीने तरी तथ्य होते खरोखरच कारण, तिच्या एका सहाध्यायी तरुणाशीं तिचा प्रेमसबध जुळला असल्याची व त्याचे पर्यवसान परीक्षेनतर लग्नात होणार असल्याची बोलवा कॉलेजात फार पसरली होती त्या वेळी तरीसुद्धा तिचा तो सारा विनोद कमासाच वाटला मला आणि, कॉलेजात जाण्याच्या वेळी अरू जेव्हा आमच्याकडे आला, तेव्हा माझा तो थाट पाहून तो सुद्धा म्हणाला, "ही कसली तयारी आहे आज अनू? कॉलेज म्हणजे काही स्वयवराचा मडप नव्हे बर का!" पण तितक्यात कालिंदी आल्यामुळें त्याचे बोलणें तेवढ्यावरच सपले, व आम्ही तिघेंही कॉलेजात गेलो घरून निघताना माझे मन अगदी अवघडल्यासारखे झालें होते पण, कॉलेजच्या आवारात पाऊल टाकल्यानतर ओळखीच्या समवयस्क मुलीचे खिदळणे कानावर पडताच माझ्या मनावरले सारें दडपण दूर झाले त्या वेळीं कॉलेजात मुली मोजक्याच असत त्यामुळें प्रोफेसरापासून तो विद्यार्थ्यापर्यंत साऱ्यानाच त्याच्याविषयीं एक प्रकारचे सादर कौतुक वाटत असे नक्षत्राच्या गर्दीत कृत्तिकाचा पुज जसा आपल्या मृदु तेजानें वेगळा दिसावा, तसा मुलाच्या घोळक्यात शालीनतेनें एका बाजूला बोलत उभ्या असलेल्या मुलीचा गट शोभत होता. त्याचे ते चित्रविचित्र पोषाख, बोलण्यातली ती चचळ धिटाई

आणि वृत्तीतला तो अवखळ उल्हास—मला खरोखरीच वाटले कीं, मी आज नव्या जगात पाऊल टाकते आहे !

- ❦ -

आणि, तो दिवस माझ्या आयुष्यात सर्वच दृष्टींनी क्रांतिकारक ठरला, असें आता मला वाटते गेली सात आठ वर्षे शाळेत जात होते मी पण जाता येताना आमची म्हातारी जनाबाई माझ्याबरोबर असावयाची, व शाळेंतली शिस्त ही घरच्या पेक्षाही जास्त कडक असल्यामुळें मला घरीच खरोखरी अधिक मोकळेपणा वाटत असे परतु शाळा आणि कॉलेज याच्यातल्या वातावरणात किती विलक्षण फरक ! नदीच्या सथ पाण्यातून दर्यात आलेली होडी जशी त्याच्या लाटावर हेलकावे खाते, तसे माझे मन त्या नव्या वातावरणात उत्फुल्ल होऊन गेले ! वस्तुत शाळेत मुलीना काही कमी का स्वातत्र्य असते ? पण किती झाले तरी ती मुलीमुलीतली स्वतत्रता खरें स्वातत्र्य तेच की, जें कोणाच्याही समोर अनिर्बंध उपभोगिता येते समवयस्क तरुणाच्या समोर निस्सकोच वागण्याचा आनद मी त्याच दिवशी अनुभवला पहिल्यादा मुलाचे ते मोठमोठ्याने बोलणें, मधून मधून त्याच्यात पिकणारा हशा व गप्पाच्या गडबडीतही हळूच मुलींकडे दृष्टिक्षेप करण्याची त्याची प्रवृत्ति—प्रथम तो सारा प्रकार पाहून मला बावरल्यासारखे झाले —पण त्याच्या अस्तित्वाची परवा न करता मनसोक्त कुजबुजणाऱ्या न् खिदळणाऱ्या माझ्या मैत्रिणीची धिटाई पाहून माझी मलाच लाज वाटली, व माझ्या वृत्तीतला सकोच कमी होऊन मी त्याच्या गप्पात उल्हासानें भाग घेतला प्रिन्सिपॉलसाहेबाचें भाषण वगैरे झाल्यावर आम्ही बाहेर आलो कालिंदीला घरी ताबडतोब जाण्याची उत्सुकता नव्हती फारशी कारण, ज्या व्यक्तीच्या शोधात तिचे डोळे मघाचपासून गुतलेले होते, त्या व्यक्तीचे दर्शन तिला अजूनही घडलें नव्हते म्हणून हॉलमधून व्हराड्यात आल्यावर तिने एकवार चौफेर दृष्टि टाकली, व एक प्रकारच्या विमनस्कतेने पायऱ्या उतरावयाला प्रारभ केला आम्ही दोन पायऱ्या उतरलो असू नसू, तोच आपलें नाव कोणी तरी घेतल्याचा भास तिला होऊन, तिने मोठ्या उत्कठेने मागे पाहिले इतक्यात नखशिखात इग्रजी पोषाख केलेला एक तरुण पुढे येऊन इग्रजीत तिला म्हणाला, “ तू पहात होतीस दुसऱ्याच माणसाला न् तुला गाठल भलत्याच माणसान !—त्यामुळ

तुझी निराशा झाली असेल नाही ताई ! माफ कर हा त्याबद्दल" इतके बोलून तो मोठ्याने हसला, व माझ्याकडे पाहून त्याने तिला विचारले, "या कोण आज नवीन तुझ्याबरोबर ? कॉलेजात पहिल्यादाच येताहेत का ?" मी कालिंदीच्या मागे उभी राहून त्याचे बोलणे ऐकत होते त्याने तो प्रश्न विचारताच तिने मला हात धरून पुढे ओढली, व माझा त्याच्याशी इग्रजी पद्धतीने परिचयही करून दिला तेव्हा तो तरुण इग्रजीत मला म्हणाला, "तुमच कॉलेजातल आयुष्य फार मजेत जाईल, अशी आशा आहे मला —आपल्या सहवासाचा फायदा घ्यायला मी इथ राहणार नाही, याबद्दल मला फार वाईट वाटते पण ही ओळख विसरायची नाही बर का !"—बोलता बोलता त्याने सिगारेटचा एक झुरका घेऊन धूर नाकातून बाहेर सोडला, व बहुधा उत्तराच्या अपेक्षेने माझ्याकडे हसत हसत पाहिले त्याचे ते टपोरे घारे डोळे माझ्या डोळ्याना भिडताच मला कसेसेच वाटले,—का कोणाला ठाऊक,—माझ्या अगाला एकदम कप सुटला तो ममोर उभा असेपर्यंत मला पुन्हा त्याच्याकडे पाहण्याचा हिय्या झाला नाही नतर बाहेर आल्यावर मी कालिदीला थोडेसे रागानेच म्हटले, "ही काय ग तुझी रीत ? तू माझी ओळख करून दिलीस त्याच्याशी अन् त्याच मात्र मला नावही सागितल नाहीस !" "चुकल खरच बाई माझ —अग, तो माझा मावसभाऊ अनिरुद्ध प्रभाकर किती उमदा तरुण आहे नाही ग ? कुणालाही आवडावा असा स्वभाव न् रूप आहे त्याच !" तिने मराठीत आरभिलेले भाषण इग्रजीत पुरे केले तो तरुण खरोखरीच दिसावयाला फार चागला होता पण त्याच्या घाऱ्या डोळ्यातली ती चमक !—तिच्यात कसला तरी विलक्षण उन्माद भरलेला होता ✓



मी घरी परत आले पण त्या तरुणाची ऐटबाज मूर्ति हलेना माझ्या डोळ्यापुढून म्हणून आल्याबरोबर पटदिशी कपडे बदलून मी स्वयपाकघरात आईशी कॉलेजबद्दल गप्पा मारित बसले. पण, मन ज्या विषयाचा एकदा ध्यास घेते, त्याचा कधी तरी विसर पडतो का त्याला ? वाद्यातून एक मुख्य सूर सतत निघत असावा व त्याच्या अनुरोधाने इतर सुराची खुलावट व्हावी, तसे चालले होते माझ्या मनाचे माझ्या ओठाशी कितीदा तरी त्या तरुणाचे

नाव आले,—कितीदा तरी वाटले की, आईला कालिंदीचा मावसभाऊ भेटल्याची ती गोष्ट सागून टाकावी पण त्या गोष्टीत लपविण्यासारखे काही नसून सुद्धा माझ्या ओठाशी आलेले शब्द मागे परतले काही प्रसग असे असतात की, त्यान्याविषयी इतराजवळ बोलण्यापेक्षा एकांतात बसून त्याची आठवण करण्यात व त्या आठवणीमुळे मनात उद्भूत होणाऱ्या भावनाचे अवलोकन करण्यात आनद वाटतो मनाला स्वत ला त्या प्रसगाचे महत्त्व ज्या कारणामुळे वाटते, ती इतराना ममजण्यासारखी नसल्यामुळे तर ते प्रसग लपवावेसे वाटत नसतील ना ? कोणाला ठाऊक ! पण अरूला सुद्धा ती गोष्ट सागावीशी वाटली नाही मला वास्तविक त्याच्या समोरच तो घडावयाचा प्रसग पण, आमच्याबरोबर इतर मुली असल्यामुळे, त्याने नतर आम्हाला अजिबात गुगारा दिला बोलता बोलता आईने मला विचारले सुद्धा, “ अरू कसा नाही आला ग तुझ्याबरोबर ? जाताना तर बरोबर गेलात तुम्ही दोघे !” पण, मी तिला काही सागणार, तोच आत येता येता त्याने उत्तर दिले, “ आज तिच्याबरोबर इतक्या मैत्रिणी होत्या की, माझी आठवणही झाली नसेल तिला निघताना, आई !” त्याने ते वाक्य अगदी सहज म्हणून हसत हसत उच्चारले पण मी किती वरमले ते ऐकून ! खरोखरीच आज त्या घटकेपर्यंत त्याची आठवण नव्हती झाली मला पण त्याच्या त्या बोलण्यावर काहीं तरी उत्तर द्यावे एवढ्याच हेतूने मी म्हटले, “ माझ्या मैत्रिणीची सबब कशाला सागतोस उगाच ? तुलाच कोणी तरी भेटली असतील मडळी न् तू वाहवला असशील त्याच्याबरोबर !” आणि मी खालच्या मानेने चहा घ्यावयाला सुरवात केली त्याने जर त्या वेळी आपल्या नेहमीच्या सवईप्रमाणे माझ्या दृष्टीला दृष्टि भिडवून माझ्याकडे पाहिले असते, तर माझ्या मनाची ती ओशाळगत न् ती चलबिचल त्याला कळल्याशिवाय रहाती ना पण त्याचे लक्ष नव्हते माझ्याकडे चहाचा कप खाली ठेवीत तो मला एकदम इग्रजीत म्हणाला, “ आपण वर जाऊ या ! मला काही तरी सागायच आहे तुला, अनू !” माझ्याशी तो कधी इग्रजीत बोलत नसे, असे नाही पण स्वयपाकघरात आणि आईच्या समक्ष इग्रजींत बोलण्याचा मात्र तो पहिलाच प्रसग त्यामुळें मी अगदीं घाबरून जाऊन आईशीं एक शब्दही न बोलता तशीच उठले तडक वर गेल्याबरोबर

तो मला म्हणाला, "अनू, मी मामाच घर सोडणार आजपासून!" मला ती बातमी ऐकून नवल वाटले नाही दिनू आता बी ए च्या वर्गात होता, व घरात त्याची अर्धीमुर्धी सत्ता सुरू झालेली असल्यामुळे अरूला तिथे रहाणे दु सह होत चालले होते दिवसेदिवस तरीसुद्धा मी त्याला म्हटले, "पण तू मामाना विचारलस का?" "मामाना विचारून काय होणार? ते कधी तरी मला जा म्हणतील का आपल्या तोंडान? पण या उप्पर मी तिथ राहून बाप-लेकात वितुष्ट आणाव हे बरं नाही वाटत मला परतु आता रहायच कुठ? दादापासून जास्त पैसे मागवून रेसिडेन्सीत रहाण्याची इच्छा नाही माझी," तो बोलता बोलता घुटमळला पण मी त्याला लगेच म्हटले, "तुला आमच्याकडे रहायला काय हरकत आहे अरू? आईला न् आप्पाना फार बरं वाटेल तू इथ रहायला आलास तर!"—मी न् अरूने एकत्र अभ्यास करावयाचा, एकत्र रहावयाचे, एकमेकाच्या सान्निध्यात आयुष्याचा प्रत्येक क्षण घालवावयाचा—किती किती आनद झाला मला त्या कल्पनेने! त्या आनदाच्या ऊर्मीत मघाचपासून माझ्या डोळ्यापुढे उभी असलेली त्या तरुणाची मूर्ति अदृश्य झाली



त्या दिवसापासून सुरू झाले आमचे सहजीवन मला माहीत आहे की, मी वापरलेला हा शब्द पुष्कळाना चमत्कारिक वाटेल, ते त्याचा विपर्यास सुद्धा करतील पण, कॉलेजातलीं हीं चार वर्षे आम्ही ज्या रीतीनें घालविली, तिचें वैशिष्ट्य व्यक्त करावयाला सहजीवनाइतका समर्पक शब्द मला दुसरा सापडतच नाहीं, त्याला मी काय करू? नुसते सहशिक्षण असे नाव जर आमच्या आयुष्यक्रमाला दिलें, तर ते अपुरे पडेल किती तरी कारण आम्ही परस्पराचे जीवन हर एक बाबतीत व्यापून टाकले होते,—आमच्या जीवनाचे ओघ एकमेकात अगदी समरसून गेले होते त्याला दुसरा मित्र नव्हता, मला दुसरी मैत्रीण नव्हती, व एकमेकाच्या सान्निध्यात आम्ही इतकी सुखावून गेलों होतो की, जग आमच्याविषयी काय बोलत असेल, याची शकाही शिवली नाही कधीं आमच्या मनाला मला ठाऊक आहे, अरूचे आमच्या घरीं रहावयाला येणें त्याच्या मामीना मुळींच आवडलें नाही त्यामुळें आम्हा दोन्ही कुटुबाच्या स्नेहसबधावर बिब्बा

घातला गेला आणि दिनूने तर माझ्या न् अरूच्या एकत्र रहाण्याबद्दल नाहीं नाही त्या कड्या उठविल्या कॉलेजात. लहानपणी अरूला मी आमच्यात खेळावयाला घेतला, म्हणजे तो रागारागाने सारा खेळ विसकटून निघून जावयाचा,— प्रसगी त्याच्या अगावरही हात टाकावयाला चुकावयाचा नाही लहानपणी जसा आमच्या खेळाचा विचका तो करीत असे, तसाच आता या साहचर्याचाही करण्याचा प्रयत्न केला त्याने आणि तो थोडासा साधलाही आमचा घरोबा एरवी कितीही असला, तरी लोकाच्या दृष्टीने आम्ही खरोखरी परकीच नव्हतों का ? झाडावर बाधलेले कलम कितीही पोसले फुलले, त्याच्या जीवनरसावर त्या कलमाची वाढ होताना जरी प्रत्यक्ष डोळ्याना दिसली, तरी लोक काही त्याला त्या झाडाची फादी मानावयाला तयार होत नाहीत त्यातून अरू धडधडीत मामाचे घर सोडून आमच्याकडे रहावयाला आलेला —आम्ही दोघे समवयस्क कॉलेजात जाताना काय किंवा फिरावयाला जाताना काय, नेहमी एकमेकाच्या बरोबर असावयाची —आज काळ इतका बदललेला आहे, तरीसुद्धा समवयस्क मुलामुलीना एकत्र फिरावयाला जाताना किती सकोच वाटतो ! मग स्त्रीशिक्षणाच्या सुरवातीच्या त्या दिवसात आम्हाला एकत्र जातायेताना पाहून लोकाना काय वाटले असेल ? माझ्या मैत्रिणीना सुद्धा आमचा स्नेह—आमचे सहजीवन चमत्कारिक वाटत असे पण आमचे मुळीं लक्षच गेलें नाही तिकडे कधी आणि का जावे ? स्वत च्या जीवनापलीकडे आम्हाला दुसरे काहीं रम्य किंवा गम्य नव्हते बाहेरच्या जगाशी आमचा थोडा जरी सबध असता, त्याच्या मताची पर्वा करण्याचे आम्हाला यत्किंचितही कारण पडले असते, तर आमच्याकडे जग कोणत्या दृष्टीने पहात आहे, याचा विचार केला असता आम्ही पण मी रावबहादूराची एकुलती एक मुलगी ! जगाला तुच्छ मानण्याचें, लोकाना कस्पटासमान लेखण्याचे शिक्षण मला जन्मल्यापासून मिळत होतें शिवाय, जमिनीवर पाऊल पडले, तर ते मळणार ना ? जनसमर्दातून चालण्याचा प्रसग आला, तर जनापवाद कळणार ना ? मी कॉलेजात गेल्यावर आप्पानीं हौसेने माझ्यासाठी मोटार घेतल्यामुळे जमिनीवर पाय टेकण्याचा प्रसगच येत नसे मला कधी डोगरकड्याच्या कपारीत बाधलेल्या घरट्यांत रहाणारी गरुड पक्ष्याचीं पिलें असतात ना, तशी स्थिति होती आमची

बाहेर कितीही वादळ घोघावले न् कसाही पाऊस कोसळला, तरी त्याना जशी त्याची फिकीर नसते, तशा प्रकारच्या स्वास्थ्यात आमचे आयुष्य चालले होते आणि त्यातच पुन्हा सहजीवनाचा उन्माद डोळयावर !

होय, मी उन्मादच म्हणते त्याला जिथे प्रेम, जिथे मीलन, तिथे उन्माद हा असावयाचाच मग तुम्हा त्याला अष्ट सात्त्विक भाव म्हणा किंवा दुष्ट तामस विकार म्हणा त्या उन्मादाचा अनुभव ज्याने घेतला नाही, त्याने प्रेमच कधी केलें नाही, त्याला मीलनाचा आनदच कधी लाभला नाही, असे मी म्हणेन उगाच नाही रामचद्राने मीलनाच्या आनदाला प्रमोह म्हटलेले ! प्रमोह, खरो-खरीच प्रमोह ! प्रणयाइतका उन्मादकारा मोह मानवी जीवनात दुसरा कोणता असू शकेल ? इतर मोह असे असतात की, त्याची धुदी उपभोगामुळे येणाऱ्या श्राततेनें नंतर तरी उतरते डोळयावरून पण प्रणयाच्या धुदीला ना अत ना उसत मीलनाच्या पूर्वी मन उत्कठेचे, मीलनाच्या वेळी अद्वैताचे आणि मीलनाच्या नतर चितनाचे सुख उपभोगीत असते आणि त्या प्रत्येक सुखाची गोडी तरी किती निराळी अन् किती अवीट ! मला केव्हा केव्हा वाटते की, हलाहल, अमृत आणि मदिरा या तिघा भावडाचे परस्परविरोधी गुणधर्म मिसळून विधात्याने प्रणय ही चीज निर्माण केली असावी विषाची दाहकता, सुधेचे माधुर्य आणि सुरेची मादकता या तिहीचा मिलाफ झालेला आहे प्रीतीत प्रीतीच्या दाहकतेची झळ लागून जो आयुष्यात केव्हा ना केव्हा तरी एकदा होरपळून निघालेला नाही, असा प्रेमिक जगात एक तरी सापडेल का ? सीतेने रामचद्रावर इतके प्रेम केले, पण स्वत ला जिवतपणी जाळून आणि गाडून घेण्याचेच सोहाळे तिला करावे लागले ना ? देवयानीने कचाचा इतका ध्यास घेतला, पण शापित आणि वचित जीवन कठण्याचाच भोग तिच्या कपाळी आला ना ! डेस्डिमोनेने अथेल्लोसाठी इतके अपवाद सोसले, पण स्वत च्या आसवानी आणि रक्ताने न्हाण्याचाच प्रसग तिच्यावर ओढवला ना ! जानकीच्या स्पर्शसुखाचा आनद अनुभवित असताना, प्रेमसमाधीच्या त्या ऐन भरात, प्रीतीला जी विषाराची उपमा रामचद्रानें दिली आहे, ती याच भावनेने तर नसेल ? पण म्हणून काय कुणी त्या उन्मा-

दाचा उपभोग घेण्याची संधि घालवली आहे का? त्या उन्मादात इतके अनिर्वचनीय सुख साठविलेले असते की, त्याचा एकवार तरी आस्वाद घेण्यासाठी मनुष्य उभे आयुष्य दुःखाच्या खाईत पिचत काढावयाला तयार होईल टेनिसनने म्हटले आहे, " It is better to have loved and lost—Than never to have loved at all " वाझ रहाण्यापेक्षा एकवार मूल होऊन गेलेले पुरवले, असे आम्ही बायकाही नेहमी म्हणत असतों अपत्यप्राप्तीचा आनद दुर्दैवाने क्षणिक ठरला, तरी साफल्याचा तो क्षण जी पूर्णता स्त्रीच्या जीवनाला आणतो, ती दुसऱ्या कशानेही येत नाही त्याला तसेंच प्रीतीच्याही उन्मादाचे आहे मला माहीत आहे, माझे हे प्रणयाच्या उन्मादाचे पुराण वाचून माझी मीना खदखदा हसेल ती म्हणेल, कसली प्रीति आणि कसला उन्माद ! निसर्ग आपला कार्यभाग साधण्यासाठी स्त्रीपुरुषाना एकत्र आणण्याकरिता ज्या आकर्षणाचा उपयोग करतो, त्याला कवीनी प्रीति हे फसवे नाव दिले आहे. आणि भावनाप्रधान माणसे या जुनाट कविकल्पनावर विसबून फसवणूक करून घेतात स्वतःची असेल कदाचित् पण तुम्ही नवी ज्ञानी माणसे तरी काय करता? जुन्या कल्पनाना नवीन नावे देऊन त्याची गोडी अनुभविता हेच की नाही? प्रेमाला आकर्षण म्हटल्याने त्याचे स्वारस्य, त्याचा उन्माद कमी होतो का? चद्रावर डोंगर अन् दलदली आहेत असा शोध लागल्याने त्याच्या चादण्याची शोभा न् सुख अणुमात्र तरी कमी झाले आहे का? स्त्रीपुरुषामधले आकर्षण कोणीही उत्पन्न केलेले असले, तरी त्याच्यामुळे मनाला आल्हाद होतो ना? ससाराला सौंदर्य चढते ना? जीविताला पूर्णता येते ना? मग त्या आकर्षणाविषयी तुच्छतेने बोलण्यात काय अर्थ?

पण हे काय भरकटत सुटले मी? परतु मी तरी काय करू? लग्नापूर्वीच्या त्या कॉलेजातील आयुष्यक्रमाची मला जेव्हा जेव्हा आठवण होते, त्या दिवसाविषयी मी ज्या ज्या वेळी विचार करिते, त्या त्या वेळी माझे सारें भान हरपते, मनाला जडलेल्या साऱ्या उपाधि गळून पडतात पक्ष्याने खूप श्रम घेऊन घरटे बाधावे, जीविताचा अर्धा वसत त्यात प्रणयकूजन करण्यामध्ये घालवावा आणि एक दिवस अचानक ते मोडून पडलेले त्याला आढळावें,

अन् मग जसा तो पुन पुन्हा त्या जागेकडे चिंवचिंवत वेड्यासारखा धाव घेत रहातो, तशी होते माझ्या मनाची अवस्था त्या वेळच्या आठवणींनीं त्या नुसत्या आठवणी नाहीत, त्या आठवणीत नुसती भोगलेल्या सुखाचीच गोडी साठविलेली नाही तर जी सुखे भोगावयाची म्हणून मनाने योजून ठेवलेले होते, त्याचीही मधुर स्वप्ने बिलगलेली आहेत त्या स्मृतीना काही फुले अशी असतात की, ती ताजी आहेत तोवरच त्याचा सुवास उलट काही फुलाचे असे असते की, ती सुकून कोळ झाली तरी देखील त्याचा परिमळ दरवळत रहातो,—ज्या वस्तूत ती ठेवावी त्या सुवासित होऊन जातात त्याच्या गधानें तसेंच काही काही प्रसगाचेही असते ते प्रसग तर मनात घोळत रहातातच पण त्याच्या चितनाने अनेक स्वप्नाच्या स्मृति जागृत होऊन मनाला वर्तमानाचा विसर पडतो अरूला विसरून जाण्याचा निश्चय मी किती तरी वेळा केला असेल, पण त्याची आठवण झाली नाही असा एक दिवस तरी गेला का ? मानीव ससारसुखाच्या मदिरेत आणि उत्कट वात्सल्याच्या अमृतात त्याची स्मृति बुडवून टाकण्याचा प्रयत्न मी कितीदा तरी केला पण, त्याच्या सहवासात घालविलेल्या दिवसातील माझ्या आकाक्षाची प्रेतें पुन पुन्हा वर येऊन तरगतात, त्याला मी काय करू ? खरोखरी आमच्या त्या आयुष्यातील एक एक दिवस म्हणजे आठवणीचे एक एक चित्र आहे तो ज्या दिवशी आमच्याकडे रहावयाला आला, त्या दिवसाचीच गोष्ट आम्ही फिरून परत आल्यावर त्याच्या खोलीत गप्पा मारीत बसलो होतो मामाच्या घरून आणलेले त्याचे सामान अस्ताव्यस्त पडलें होते तिथे त्यातून त्याची पुस्तकें वेगळीं काढीत असता माझ्या हाती एकदम एक फोटो आला मी जिज्ञासेने तो उघडून पाहिला न् चमकून गेलें अगदीं थोडा वेळ तो निरखून बघून मी त्याला विचारलें, “कुणाचा रे फोटो हा ? आईचा का तुझ्या अरू ? आजपर्यंत कधीं दाखवला सुद्धा नाहींस मला ?” त्याने उत्तर दिलें, “बरोबर ओळखलंस तू. आजपर्यंत ट्रंकेंतच पडून होता तो पण माझ्या मनात फ्रेम करून घ्यायचाय तो आता.” “किती सुरेख होती आई तुझी अरू ? मनूचा तोंडवळा हुबेहूब असाच आहे नाहीं का रे ?” मी त्या फोटोकडे पहात त्याला विचारले “हो — अन् म्हणूनच ती इतकी आवडते मला अनू ? ती जोपर्यंत होती, तोंपर्यंत

आईचा फोटो उघडून पहाण्याची गरज नाही भासली कधी मला पण ती सासरी गेल्यापासून किती तरी वेळा हा फोटो फ्रेम करायच मनात आल माझ्या !"—तो बोलता बोलता एकदम थाबला त्याचे ते उद्गार ऐकून माझ्या मनात चमत्कारिक शका आली, व हातातला फोटो खाली ठेवून मी त्याला विचारले, " मनू गेल्यामुळे तर नाही ना मामाच घर तुला सोडावस वाटल ? "
" नाही —पण ती गेल्यापासून त्या घरी रहायच जिवावर आल होत माझ्या अगदी, " तो म्हणाला थोडा वेळ कोणीच काही बोलले नाही नतर मी त्याला विचारले, " मनू, तुझ्या आईसारखी दिसते म्हणून तुला आवडते न् मी रे ? "
" तू अगदी निराळ्या कारणानी आवडतेस —कोणत्या कारणानी ते सागता येत नाही, समजत नाही मला, " तो किंचित् लाजल्यासारखा होऊन म्हणाला नतर आपली दृष्टि माझ्या दृष्टीत मिसळून त्याने मला विचारले, " असल्या प्रश्नाच उत्तर देण शक्य असत का अनू कधी तरी ?—Ask me no more What answer should I give ?"



त्या दिवशी 'मालती-माधव' वाचीत होतो आम्ही मला कालिदासाइतका भवभूति आवडत नसे त्यामुळें मालती-माधवाचा अभ्यास करिताना आमचा नेहमी काही ना काही तरी वाद हटकून व्हावयाचा अरूला कालिदास आवडत नसे, असे नाही, पण तो म्हणत असे की, कालिदासाच्या वाङ्मयात कल्पनेच्या भराऱ्या असल्या, तरी भावनाचे उद्रेक नाहीत, बुद्धीला भुलविणारा कलाविलास असला, तरी मनाला वाहवून नेणारा रसाचा प्रबळ ओघ नाही रसोत्कट प्रसगाच्या अगदी ऐन भरात सुद्धा आपण कलावत आहोत या गोष्टीचा विसर पडत नाही त्याला अजाने इदुमतीसाठी एवढा विलाप केला आहे ना, पण त्यातसुद्धा निर्व्याज करुणरसापेक्षा लालित्यच आहे जास्त नाही तर भवभूति पहा रसोत्कर्षाचा प्रसग आला की, आपण कवि आहोत ही त्याची जाणीव सुटून वर्ण्य विषया-बरोबर वाहून जातो तो अगदी त्याच्या नाटकात एरवी जरी बाधेसूदपणा कमी असला, तरी हृदयाला हलवून सोडणारे उत्कट प्रसग मात्र अतिशय आहेत त्यात मला हे त्याचे म्हणणे पटत नसे, असे नाही पण मी त्याला म्हणत असे की, कला म्हटली म्हणजे सयम आलाच. आणि सयमाचे तर

भवभूतीला अगदी वावडें होतें त्याची घमेंड, त्याचे पांडित्याचे प्रदर्शन, त्याच्या रचनेचा बोजडपणा, त्याच्या शृंगारातला सदभिरुचीचा अभाव—याला काय कुठे कला म्हणतात का? पण, त्या दिवशी आमचा वाद झाला, तो या नेहमीच्या मुद्यावर नव्हे तर दुसऱ्या अंकातील मालतीच्या "कुलममलिन न त्वेवाय जनो न च जीवितम्" या उद्गारावर तो श्लोक लावीत असता मी अगदी सहज अरूला म्हटले, "तुला नाही वाटत मालतीच्या तोंडी हे वाक्य अगदी विसंगत दिसत म्हणून?—एवढी जर तिला कुलीनपणाची चाड होती, तर रुक्मिणी-स्वयंवराची नक्कल करून पळून कशाला गेली मागून माधवाबरोबर?—अखेर जें करायच ते केलंनच सार, पण आधी मात्र विनयाच अवडंबर माजवलंन!—भवभूतीला सवयच आहे नाही तरी असल्या दांभिकपणाचा घोळ घालायची!" "पण तुमच्या कालिदासाच्या शकुंतलेन तरी काय केलय? तिनं सुद्धा नाही का दुष्यंताला दटावला?" अरूने मला उलट हसून विचारले "मुळीच नाही भलत्याच वेळी भलतीच गोष्ट राजा करायला लागला, त्याला तेवढ नाहीं म्हटल तिन—पण गांधर्वविवाहाची कल्पना एकदा मनाला पटल्यावर मग काही तिन मागपुढं पाहिल नाही कालिदासाच्या नायिका दुर्बल नाहीत त्याना आपल हृद्गत बरोबर कळत न् ते साध्य करून घेताना त्या पर्वा करीत नाहीत कोणाचीही त्याच्याजवळ खोट्या विनयाच पडप नाही भवभूतीच्या नायिकासारख! भवभूतीन जाणून बुजून स्त्रीजातीच दौर्बल्य, त्यांची परवशता आपल्या नाटकातून दाखविली आहे सीतेला राम टाकतो, तो कुलीनपणाच्या अभिमानान, अन् मालती म्हाताऱ्याला माळ घालायला तयार होते, तीही कुलीनपणाच्या अभिमानान कालिदासान प्रीतीपुढं दुसऱ्या कोणत्याच गोष्टीच स्तोम माजू दिल नाही त्याच्या नायिका प्रेमासाठीं वाटेल ते दु ख सोसायला, वाटेल तो त्याग करायला तयार होतात त्याना कोणी फसवाव न् बनवाव लागत नाही" मी आवेशाने म्हटलें त्यावर तो जास्तच हसला न् मला म्हणाला, "मग तुझ अस म्हणण आहे का अनू, की मालतीन मनात आल्याबरोबर माधवाचा हात धरून घराबाहेर पडायच होत न् शकुंतलेप्रमाणें अविचारी प्रेमाचे परिणाम भोगायचे होते?" "हो हो,—जें आपल्याला अत करणापासून वाटत न् पटत त्याच्यासाठी जर मनु-

ध्यान अपवाद न् आपत्ति सोसायला तयार व्हायच नाही, तर मग जगायच तरी कशाला ? सावित्री, दमयती, रुक्मिणी या नाही कुठ परिणामाच्या भीतीन आपल्या प्रेमविषयापासून परावृत्त झाल्या त्या ? त्याना झाल तरी कुलशील होतच कीं नाहीं ? प्रेमासाठी घर सोडण्याची जर तयारी नव्हती, तर प्रेमान मी जळतें आहें न् पोळते आहे अशा वल्गना तरी कशाला कराव्या ? शकुतलेन अशा प्रकारच्या वल्गनाही उठल्या सुटल्या केल्या नाहीत, न् मनाला जें योग्य वाटल ते करायलाही प्रसगी ती चुकली नाहीं !" मी म्हटले त्यावर तो पुन्हा हसून म्हणाला, "अनू, इतक तावातावान हे सारे तू बोलते आहेस, पण मालतीच्या जागी जर तू स्वत असतीस, तर प्रेमासाठी काय तू घर सोडल असतस ? समज, उद्या जर आप्पानी तुझ्या इच्छेविरुद्ध तुला एकाद्या आय् सी एस् ला द्यायच ठरवल न् तुझ प्रेम दुसरीकडे गेलेल असल, तर तू काय त्याच्याविरुद्ध जाशील ?" त्याच्या त्या व्यक्तिविषयक प्रश्नाचा मला राग आला फार, व मी त्याला चिडूनच उत्तर दिलें, "हो हो आप्पाच्याच काय, साऱ्या जगाच्या सुद्धा विरुद्ध जाईन मला जें योग्य वाटेल ते करायला मी कधींही भ्यायची नाही —एवढ साध मनोधैर्य जर मला दाखवता आल नाही, तर आप्पानी मला व्यर्थ इतक शिक्षण दिल असच मी समजेन !"



"Two in the Campagna"—किती सुदर कविता आहे नाही अरू ? पण तुला पटते का ब्राउनिगची ही अतृप्ततेची कल्पना ?" मी विचारलें आम्ही त्या वेळी ब्राउनिंग पति–पत्नींच्या कविता वाचीत होतों. आम्हाला नेमलेल्या सिलेक्शनमध्ये एलिझाबेथ ब्राउनिंगची एक कविता होती ती नीट समजावी म्हणून तिचे चरित्र वाचले मी त्यामुळें, बापाच्या रागाची पर्वा न करतां, किंबहुना माहेरची माया कायमची सोडून, आपल्याला आवडलेल्या पुरुषाबरोबर लग्न करणाऱ्या एलिझाबेथचे प्रेमजीवन जाणण्याची विलक्षण उत्कठा लागली मला म्हणून उन्हाळ्याची सुटी सुरू होताच ब्राउनिंग–दापत्याच्या कविताचे सग्रह व त्याचीं मिळालीं तितकी सारी चरित्रें आणवून त्याचे पारायण करावयाला प्रारंभ केला मी सकाळी, दुपारी न् रात्रीं त्याच्या कविताबद्दल चर्चा करावयाची, त्यांच्या आयुष्यातल्या निरनिराळ्या प्रसंगाचे प्रतिध्वनि त्यांत

हुडकावयाचे व त्याच्या प्रणयबधनाचे नाजूक धागे उलगडण्यात सारा दिवस घालवावयाचा—नादच लागला मला हा सारखा माझे ते ब्राउनिंगचे वेड पाहून अरू मला एक दोनदा म्हणाला सुद्धा, "आता आपण ब्राउनिंग सोसायटीची शाखाच काढू या आपल्या घरी, अनू ?" कारण त्या साऱ्या वाचनात न् चर्चेत त्याला सक्तीने भाग घ्यावा लागत असे—तो दुसरें काही वाचीत असला, तरी त्याच्या हातातल ते पुस्तक काढून घेऊन मी सारखी नाही नाही त्या शका त्याला विचारावयाची त्या दिवशी एलिझाबेथ आणि रॉबर्ट याच्या प्रेमविषयक कवितावरून त्याच्या प्रीतीबद्दलच्या कल्पनाचा मेळ पडतो का पहात होते मी "प्रीतीच्या उन्मादात प्रेमी जनाना लाभणार अद्वैताच सुख, ब्राउनिंगन म्हटल्याप्रमाण, खरोखरीच इतक क्षणिक, इतक फसव असत का ? प्रीतीच्या समाधींत प्रेमिकाच्या व्यक्तित्वाचा लय क्षणमात्रच व्हावा न् अतृप्तेच्या वेदनानी त्याच मन सदोदित तळमळत रहाव, इतकी माणसाची स्वत च्या व्यक्तित्वाची चाड बलवत्तर आहे का ?" मी त्याला ती कविता वाचून दाखवून प्रश्न केला "होय खरच आहे ब्राउनिंगच ते म्हणण प्रेमाच्या उन्मादात मनुष्य घटकाभर स्वत ला विसरेल पण त्या उन्मादाची धुदी डोळ्यावरून उतरताच त्याच वेगळ अस्तित्व त्याला क्षणोक्षणीं अधिकाधिक तीव्रतेन जाणवू लागत पण मी ब्राउनिंगप्रमाण तक्रार मात्र करणार नाही याबद्दल प्रेमाच खर सुख उत्कठेत, अतृप्ततेत असत, उपभोगात, अद्वैतात नाही स्वत च व्यक्तित्व जर मनुष्य प्रेमापायी गमावून बसला, तर मजा काय उरली त्या प्रेमात ?" अरू म्हणाला पण त्याचा तो युक्तिवाद पटला नाही मला मी त्याला म्हटले, "ही अतृप्ततेची कल्पना पुरुषाच्या स्वार्थी स्वभावाला शोभेशीच आहे ब्राउनिंग प्रेमी असला म्हणून काय झाल ? किती झाल तरी पुरुषच तो जातीवरच गेला अखेर आपल्या ! नाही तर एलिझाबेथन पहा आपल्या सॉनेटमध्ये काय म्हटलय ते !—"I love thee with the breath, smiles, tears of all my life !" ब्राउनिंगन नुसत म्हटलय तेवढ की, तुझ्या इच्छेशीं मला एकरूप होता आल, तुझ्या डोळ्यानी मला पहाता आल, तुझ्या हृदयाला माझ्या हृदयाची धडधड जाऊन भिडली अन् तुझ्या जीवनाच्या झऱ्यातल अमृत मला यथेच्छ सेवन करता आल, तर केवढी बहार होईल !" पण

हे सारं खरं झाल मात्र एलिझाबेथच्या आयुष्यात !" "अस का म्हणतेस तू अनू ? एलिझाबेथसारख्या पगु स्त्रीशी लग्न करण्यात ब्राउनिगन काहीच का स्वार्थत्याग केला नाही ?—खरोखरी, तू विपर्यास करते आहेस त्या कवितेचा — त्याची तक्रार फक्त एवढीच आहे की, दोन व्यक्तीनी एकमेकावर कितीही प्रेम केल, त्याच मीलन क्षणैक कितीही उत्कट झाल, तरी अतृप्तता कायमच राहते यात कुठ चुकल आहे ?" तो म्हणाला त्यावर मी आवेशाने उद्गारले, "त्याची तक्रार ? त्याची एकट्याचीच कशाला ? ही साऱ्या पुरुष जातीचीच तक्रार आहे मुळी एका स्त्रीच्या प्रेमावर कोणता पुरुष आजपर्यंत तृप्त झाला आहे ? अतृप्तता हा शापच आहे मुळी पुरुषजातीला ! एलिझाबेथच्या प्रेमाची सर ब्राउनिंगच्या प्रेमाला कधी तरी येईल का ?—If I leave all for thee, wilt thou exchange and be all to me ?—असा प्रश्न तिन विचारला न् खरोखरीच त्याच्यासाठी सार काही सोडल !—प्रेमासाठी सर्वस्वाचा त्याग फक्त स्त्रीनच करावा ती जेव्हा प्रेम करते, तेव्हा प्रियकराशिवाय वेगळ अस्तित्व तिला मुळी उरतच नाही.—तिच्या जीवनाचा ओघ त्याच्या जीवनात मिसळून जातो, नाहीसा होऊन जातो !"

– ✿ –

आमचा रोजच होत असे काही ना काही तरी वाद पण, त्या दिवशी जो प्रकार घडला, त्याच्या आठवणीने अजूनही पस्तावून जाते माझें मन दुपारीं आम्ही सगळ्या मुली एकत्र जमलो असता कालिंदीने अशी कल्पना काढली की, आज कॉलेज सुटल्याबरोबर साऱ्यानी मिळून परस्पर तिच्या घरून मोटारनें कुठे तरी फिरावयाला जावयाचे कारण काय ?—तर म्हणे कोजागिरी पौर्णिमा होती त्या दिवशी मला आवडली तिची ती कल्पना पण, कॉलेजातून परस्पर जर कालिंदीबरोबर फिरावयाला गेले मी, तर आईला काय वाटेल, हा विचार लगेच मनात आला माझ्या शिवाय तिच्या कार्यक्रमातलें ते कुठे तरी न् किती वेळ हेंही सारे अनिश्चितच होते म्हणून मी तिला म्हटले, "हे बघ गडे, मी आधी घरी जाऊन आईला सगळ सागून मग येईन तुझ्याकडे अन् काहीं झाल तरी नवाच्या आत परत आल पाहिजे आपण घरीं" त्यावर ती मला हसून म्हणाली, "तू की नाही उगाच दोन वर्षे कॉलेजात काढलींस अनू ?—अग,

आपण मुली मुली जाणार घरच्या मोटारींतून त्यात तुझ्या आईला न आवड-ण्यासारख एवढ काय आहे ग!—जरा घरट्यातून बाहेर पडून जग पाहिल्या-शिवाय भीति जाणार नाही तुझी कधीच अनू? आपण अस करू,—तुम्हा सगळ्याच्याच घरी निरोप पाठवीन मी आमच्या गड्याबरोबर,—मग तर झाल ना? पण गडे, तू नसत्या अडचणी नको उत्पन्न करू आपल्या या बेतात आता!" तिच्या त्या लाघवी बोलण्यावर उत्तर सुचले नाही मला काहीं, व मधल्या सुटीनतर वर्ग सुटण्याच्या वेळी अरूला मुद्दाम गाठून मी सागितलें की, "मी आज कॉलेजातून परस्पर जाणार आहें कालिंदीकडे— कदाचित् वेळ होईल मला घरी यायला थोडासा" त्यावर तो काही बोलला नाही पण, त्याने अशा काही चमत्कारिक नजरेनें माझ्याकडे पाहिले की, मला अतिशय राग आला त्याचा आणि, इतका वेळ आईची समति न घेता परस्पर जाण्याबद्दल जें माझे मन थोडे चाचरत होते, ते अगदी घट्ट झालें त्या रागाच्या भरात सध्याकाळी चार वाजल्यापासून आमचा वेळ खरोखरीच त्या दिवशीं फार आनदात गेला समुद्रकाठचे सुदर चादणे, कधीं न लाभणारी मनसोक्त स्वतत्रता व समवयस्क मैत्रिणीचा खेळकर सहवास,—आम्हाला कळलें नाही गप्पात वेळ कसा गेला ते! कालिंदी तर त्या दिवशी इतकी आनदात होती कीं, आपल्या प्रणयाची सारी हकिकत—कॉलेजात आपली कर्णिकाशी कशी ओळख झाली, त्या ओळखीचे पर्यवसान प्रेमात कसे झालें, आपल्या वडिलानी लग्नाच्या कल्पनेला प्रथम कसा विरोध केला, इत्यादि नाना प्रकारच्या गोष्टी खूप रगवून सागितल्या तिने विशेषत, एम्. ए ची परीक्षा झाल्यावर मे मध्ये जेव्हा आपले लग्न होईल, तेव्हा बॉबगोळा पडल्या-सारखी आपली जात कशी किंचाळत उठेल, याचे तिने इतके गमतीदार वर्णन केलें कीं, आमची हसता हसता पुरे वाट झाली अगदीं आम्ही परत यावयाला निघालों, तेव्हा दहा वाजून गेले होते इतका वेळ काहीं वाटलें नाहीं मला त्या उशिराचें पण मोटारींत बसल्यावर मात्र माझें मन अस्वस्थ झालें फार मी मोटारीतून खाली उतरले, तेव्हा आई व्हराड्यातच बसली होती. ती मला पुरत्या पायऱ्या चढू न देताच म्हणाली, "हद्द झाली बाई तुमच्या भटकण्याची अनू!—अग, कॉलेजात गेल म्हणून काय साऱ्याच गोष्टींची पर्वा सोडून

द्यायची असते का? कालिंदीच ठीकच आहे अर्धामुर्धा साहेब आहे तिचा बाप!—पण आपल कस चालेल त्याच्यासारख वागून!" "अग पण आई, मी निरोप पाठवला होता ना उशीर होईल म्हणून?" मी काही तरी बोलावयाचें म्हणून म्हणाले "अरूबरोबर सागून पाठवल होतस तोच ना तुझा निरोप?—पण म्हणून काय बारा वाजवायचे का घरी यायला?—तो सुद्धा उपाशी बसलाय वाट पहात तुझी —बरोबर कुणी घरच पुरुष माणूस नाही एकव्या मुलीनी इतक अपरात्रीं हिडण शोभत का तुम्हाला?"—या तिच्या बोलण्या-वरून कळून चुकले मला की, कालिंदीच्या गड्याबरोबर मी पाठविलेली चिठ्ठी काही पोचली नाही तिला मी तशीच काहीं न बोलता वर गेले, व माझा सारा राग अरूवर काढला "अगदी सागकाम्याप्रमाण पोचवलास तू निरोप माझा आज?" मी त्याला म्हणालें "तो कसा बुवा?" त्यानें हातातलें पुस्तक मिटून विचारले त्याच्या चढलेल्या भुवयात इतका उपरोध भरलेला होता कीं, मला अतिशय चीड आली त्याच्या त्या वागण्याची, व मी त्याला म्हणाले, "तुम्हाला सुद्धा पसत नव्हत वाटत माझ कालिंदीबरोबर फिरायला जाण?" "अर्थात् नाही तुला माहीत आहे ना लोक तिच्याविषयीं काय बोलतात ते?" तो रागाने म्हणाला "असतील बोलत!—मला काय करायच आहे लोकाशी? कॉलेजात जाणाऱ्या कोणत्या मुलीविषयी लोक चागल बोल-तात, तर पर्वा करावी आम्ही त्याच्या मताची? पण तुला शोभत का अस बोलण तिच्याविषयी? तरी बर भवभूतीचा अभिमान अगदी उतून चालला आहे! तुला ती आवडत नसली म्हणून काय झाल? तुझ्या आवडीनिवडीवर थोडच आयुष्य अवलबून आहे माझ!" मी सतापाच्या भरात म्हणालें त्यावर तो थोडा वेळ काही बोलला नाहीं नतर एक उसासा टाकून म्हणाला, "ठीक आहे—अस असेल तर बोलणच खुटल सारं मुळी!"

- ❦ -

मनूला भेटावयाला जाण्याचे जिवावर आलें होते माझ्या अगदीं गेल्या तीन वर्षांत ती किती तरी वेळा माहेरी आली असेल पण आज तिच्या येण्याची आईनें दिलेली बातमी सकटासारखी वाटली मला एकाद्या त्याचा न् आमचा घरोबा जरी आता पूर्वीइतका राहिलेला नव्हता, तरी आम्हा दोघींच्या प्रेमांत

मात्र मुळींच अतर पडलेलें नव्हतें मनू माहेरी आली, म्हणजे आमच्या कुटु-बात अलिकडे उत्पन्न झालेला दुजाभाव आम्हा दोघींच्या स्नेहभावात पार लोपून जात असे अगदी तिचा सारा वेळ बहुतेक आमच्याच घरी जावयाचा, व रविवारीं तर दिवसभरच आमच्याकडे असे ती आईला तर हर एक बाबतींत तिचे केवढें कौतुक होते ! पहिल्या वर्षी मनूची एक मगळागौर तिने आमच्या घरी मोठ्या थाटानें केली, व विवाहित मुलीचे जे जे म्हणून सोपस्कार माहेरी होत असतात, तेही सारे तिने केले मनूचे जणु काही, माझें लग्न न झाल्यामुळें अपुऱ्या राहिलेल्या आपल्या हौशी तिने मनूचे कौतुक करून पुरवून घेतल्या आज ती मनू आल्याचे कळल्याबरोबर तिला जी भेटून आली, ती देवापुढे किती वेळ तरी रडत बसली होती, व मला तिने एवढेच सागितले की, " अग, भेटून घेऊन ये तू इथच तिला रहायला चार दिवस " अरू मुळीं तिला आणा-वयालाच गेला होता स्टेशनवर तो त्या दिवशी असा बावरल्यासारखा वागत होता कीं, त्याला " माझ्याबरोबर चल " असें म्हणण्याचा धीरच होईना मला मला राहून राहून सारखे वाटे, तिथे जाऊन मी काय बोलू मनूशी ? कोणत्या शब्दानीं तिच्या पोळलेल्या मनाचें सात्वन करू ?—तिच्या लग्नाच्या दिवशीं मी तिला भेटावयाला गेलें होते, त्याची आठवण झाली मला आज त्या वेळी आपलें लग्न झाल्याबद्दल वाईट वाटले होते तिला पण मागाहून तिचे मन ससारात किती लवकर रमले ! रोपा एका जागेचा काढून दुसऱ्या जागीं लावला, म्हणजे प्रथम तो अगदी कोमून जातो, त्याची पालवी गळून पडते सारी पण एका परीनें ते इष्टच नाही का ? नव्या जागी मूळ धरल्यावर पालवीही नवीच आली पाहिजे. लग्न होऊन सासरीं जाणाऱ्या मुलीला ज्या नव्या वातावरणात रुळावयाचे असतें, त्याला अनुरूप अशी तिची वृत्ति होण्यासाठीं जुन्या भावना लुप्त नकोत का व्हावयाला ? मनू माहेरून सासरीं जावयाला निघाली, तेव्हा तिचे डोळे दु खाश्रूनीं डबडबलेले होते पण, नवऱ्याची ओळख होऊन जेव्हां ती सासरहून परत आली, तेव्हा तिथल्या गोष्टी सागत असताना तिच्या डोळ्यात आनदाश्रु चमकताना दिसले मला मांडवापेक्षा वृक्षाचा आसरा वेलीला सुखकर वाटावा, हें स्वाभाविकच आहे नाही तरी ! एकाद दुसरें मूल तिला झालें असतें अन् मग हा प्रसग !—तर तेवढाच नसता का एक आधार झाला

तिच्या जिवाला? पण आता कोणाच्या तोंडाकडे पाहून तिने उभा जन्म कठावयाचा? बालविधवाचे एक तरी बरे असते. ज्याला ससार म्हणून म्हणतात, त्याच्या सुखाची काहीच कल्पना नसते त्याना. पण तीन वर्षे त्या सुखाची गोडी अनुभवल्यावर पुढे आता हे वैराण आयुष्य घालवावयाचे!—काय विलक्षण प्रसग आला हा मनूवर!—हे विचार मनात घोळत असतानाच मी घरी गेले तिच्या मला पाहिल्याबरोबर तिची आई म्हणाली, "वेळेवर आलीस बाई!—तू तरी साग तिला काही गाडीतून उतरल्यापासून अन्नाचा कण नाही गेलेला तिच्या पोटात अशान कस निभेल? आल्या दिवसाला तोड दिलच पाहिजे मन दगडासारख घट्ट करून! हातच्या का आहेत या गोष्टी कुणाच्या? काय म्हातारपणी प्रसग आणला देवान!"—आणि त्या रडावयालाच लागल्या एकदम मी तशीच आतल्या खोलीत गेलें तिथे एका कोपऱ्यात—केंस भुईवर लोळत असलेले, सारें अग जुनेराने झाकलेले, फक्त एक बांगडी असलेला तो गोरा पान हात उशाला!—मला भडभडून आलें तिची ती अवस्था पाहून मी तिच्या अगदी जवळ जाऊन बसले, व झोपेत असलेल्या तान्हुल्याच्या अगावर जसा अगदी हलकेच हात फिरवावा, तसा माझा हात तिच्या अगावरून फिरविला त्याबरोबर जोराने हुदका देऊन ती उद्गारली, "कसं होईल ग अनू आता माझ!" आणि धडपडत उठून माझ्या गळ्यात दोन्ही हात घालून हबरडा फोडला तिने त्या स्थितीत किती वेळ तरी होतों आम्ही रात्रीच्या निवात वेळी दव पडल्याने जसा हलुहळू गारवा येतो, तसा त्या निःशब्द अश्रुमोचनाने किती तरी विरगुळा वाटला आम्हाला आणि परत येताना मी तिला गाडीत घालून आपल्याबरोबर आमच्या घरीं घेऊन आलें.

— ❦ —

अरूची ती कविता वाचून मला अगदीं कसेसेच वाटले त्याचा नेहमींचा क्रम असा होता की, कविता लिहिल्याबरोबर ती आधी मला दाखवावयाची पण आज 'मनोरजना'चा अक उघडल्याबरोबर जेव्हा ती कविता माझ्या दृष्टीस पडली,—पहिल्या चार ओळी वाचताच ती कुणावर लिहिलेली आहे हें जेव्हां माझ्या ध्यानात आलें, तेव्हा माझ्या मनाला तीव्र वेदना झाल्या, अगदीं अननुभूत असें दुःख मला झाले मला आधी न दाखविता त्यानें कविता प्रसिद्ध

करावयाला पाठविली, याचें कदाचित् माझ्या मनाला वाईट नसतें वाटलें इतकें वास्तविक त्याची प्रत्येक कविता सर्वांच्या आधी पहाण्याचा हक्क मलाच नव्हता का? आम्ही एकत्र रहावयाला लागल्यापासून गेल्या तीन वर्षांत त्याच्या कवितेत किती तरी फरक पडला होता,—अगदी नवीन असें स्वरूप तिला आले होते मनोरजनातून नियमाने येणाऱ्या त्याच्या कविता वाचून —त्यातली ती मधुर उत्कंठा, भावनांचे ते नाजूक विश्लेषण, अतृप्त मनाची ती तरळ स्वप्ने आणि त्या सर्व भावाविष्कारातून मधून मधून अस्पष्टपणाने प्रतीत होणारी त्याच्या हृदयाची अधिदेवता!—मी त्याच्या स्फूर्तीचा विषय झाल्या-बद्दल अभिमान वाटत असे मला अतिशय नुकतीच लिहिलेली आपली कविता मला वाचून दाखवीत असता विशिष्ट शब्द किंवा संकेत आल्याबरोबर तो जेव्हा घुटमळत असे व तेवढ्या ओळी खालच्या मानेने वाचून नंतर भावपूर्ण दृष्टीनें माझ्याकडे पहात असे, तेव्हा रोमांच उठत असत माझ्या अंगावर अगदी! स्वत विषयी प्रत्यक्ष असा एक शब्दही न बोलता अशा रीतीने परस्पराचे मनोगत परस्पराना सांगण्यात किती तरी सुखाचे क्षण घालविले होते आम्ही त्या समरसतेच्या क्षणाची आठवण झाली आणि बाजूला पडलेल्या मनोरंजनाकडे मी बघितलें!—Where is the thread now? Off again!— हे ब्राउनिंगचे शब्द प्रतिध्वनित झाले माझ्या हृदयात समरस-तेचा, प्रीतीच्या एकतानतेचा धागा क्षणोक्षणीं तुटतो, तो अशाच कारणामुळें तर नव्हे? नाहीं तर ही कविता मला न दाखविता,—माझ्यापासून बुद्धिपुरस्सर लपवून ठेवून,—मनोरंजनात प्रसिद्ध करण्याचे काय कारण? मनुष्याच्या मनाला अनेक कप्पे असतात, व त्या निरनिराळ्या कप्प्यात त्याच्या निरनिराळ्या व्यक्तींविषयीच्या भावनांचीं गूढें दडवून ठेवलेली असतात ज्या व्यक्तीवर त्याचे नितांत, निरुपाधिक प्रेम आहे म्हणून आपण समजतों, त्या व्यक्तीजवळ सुद्धा त्या साऱ्या कप्प्याना लागू पडणारी किल्ली नसते; व म्हणून त्याचें पुष्कळसे आंतर जीवन त्याही व्यक्तीला अज्ञात रहातें! पूर येऊन पाणी कमालीचें चढलें, म्हणजे धरणाचीं सगळीं दारें आपोआप उघडून, सारें जलभांडार सैरावैरा धावूं लागते. पण, प्रीतीच्या अगदी ऐन उन्मादात सुद्धा जेव्हा भावनांना पूर आल्याचा भास प्रेमिकांना होत असतो, त्या पुरात आपले सारे जीवभाव लय पावल्याचा आनंद ते

उपभोगीत असतात, तेव्हा त्यांच्या समाधीच्या क्षणी सुद्धा मनाचा काही भाग अलिप्त रहातो, त्याचे चोरकप्पे बंदिस्तच रहातात—मला वाईट वाटलें, माझ्या मनाला पीळ पडला, तो या जाणिवेने अरूला माझ्याहून वेगळें जीवन आहे म्हणावयाचे एकंदरीत! एरवी मनूवर लिहिलेली ती कविता माझ्यापासून लपवून ठेवण्याचे काय कारण होते? तिचा,—त्या माझ्या हतभागी बहिणीचा मला हेवा वाटेल, अशी का समजूत झाली त्याची? त्याला वाटले तरी काय?—त्याची कल्पना तरी काय आहे माझ्याविषयीं?—दु ख आणि अपमान असह्य होऊन माझ्या डोळ्यातून अश्रु आले इतक्यात कोणी तरी खुर्चीवर हात ठेवल्यासारखे वाटलें मला, व मी मागे वळून पाहिले त्याबरोबर अरूने मला विचारलें, "काय झाल ग? आई बोलली का तुला काही आज अनू?" त्याचा तो प्रश्न लपडावाचा वाटला मला; व मी ती कविता त्याच्यापुढें धरून त्याला विचारलें, "याचा अर्थ काय अरू?" तो क्षणैक अगदी वरमून गेला, लाजेने लाल झालें तोंड त्याचे पण आवढा गिळून त्याने मला म्हटले, "तुला कदाचित् आवडणार नाही म्हणून दाखविली नाही ती कविता मी तुला? माझ काही तुझ्यासारख नाहीं अनू? तुझ्या आवडी-नावडीवर आयुष्य आहे अवलबून माझ!" "म्हणून मला दाखविल्याशिवाय कविता पाठविलीस का ही तू छापायला? समजतात मला ही बोलणी—हा सूड आहे कोजागिरीच्या दिवशी मी बोललें त्याचा! तुला काय अस वाटल की, मनूवर कविता लिहिलेली न आवडण्या-इतकी मी क्षुद्र मनाची आहे म्हणून?" बोलता बोलता सतापानें माझ्या डोळ्यातून अश्रु वाहू लागले "अस काय बर बोलतेस अनू?—चूक झाली माझी खरंच मला भीति वाटली तुझी,—कसली भीति वाटली सागता नाहीं येत पण तू अस नको बोलूस मला!" त्यानें माझ्या खाद्यावर हात ठेवला. आणि, त्याचा तो हात मी रागाने बाजूला करणार, तोच त्याचे थरथरणारे ऊन ऊन ओठ माझ्या आसवानीं भिजलेल्या पापण्यांना येऊन भिडले!

- ९ -

मी कसाबसा पेपर देऊन परत आलें व वर जाऊन बिछान्यावर पडलें. पेपर लिहिताना माझे डोळे सारखे जळत होते, अग सारखे शहारत होतें. गेला सबध महिना एक प्रकारच्या ईर्ष्येनें अभ्यास केला होता मी बी ए ला मी

सस्कृत घेतलें, तेव्हापासून आप्पा मला नेहमी म्हणावयाचे, “सस्कृतची “स्कॉलरशिप गमावता कामा नये बरं का पडिताबाई!” मला ‘पडिता’ ही पदवी प्रो राजारामशास्त्री भागवत यानी दिली होती त्याचा न् आप्पाचा अतिशय स्नेह, शिवाय आमचे नातेही होते थोडेंसे मी लहान असताना ते घरीं आले, म्हणजे नेहमी मला कसला ना कसला तरी श्लोक शिकवावयाचे, व तो शिकताना जर मी आळस केला, तर म्हणावयाचे, “अज्ञान कशी होणार तू पडिता? आम्ही पडिता रमाबाईला मुकलो आमच्या मूर्खपणामुळ तिची जागा भरून काढण्यासाठी आता पडिता अनसूयाबाई झाल पाहिजे तुला धर्मशास्त्राच अध्ययन करून स्त्रियाच्या हक्कासाठी झगडायला न् त्याच्या उन्नतीच कार्य चालवायला तयार झाल पाहिजेस बर का तू!” त्याच्या त्या अर्धवट थट्टेने पण वस्तुत आतरिक तळमळीने काढलेल्या उद्गाराचा परिणाम आप्पाच्या न् त्याहीपेक्षा माझ्या मनावर फार झाला प्रवेशपरीक्षेच्या वेळेला जेव्हा जगन्नाथ शकरशेठची शिष्यवृत्ति माझी पाच मार्कांनी गेली, तेव्हा अतिशय वाईट वाटले मला त्या वेळी माझे समाधान करण्यासाठीच बहुधा आप्पा मला असे म्हणाले होते, “आहे काय त्या स्कॉलरशिपमध्ये एवढ? नुसती घोकपट्टी लागते ती मिळवायला तुला जर आपल्या बुद्धीच तेज दाखवायच असेल, तर बी ए च्या वेळी दाखव तू ते!” ते माझ्या अभ्यासाची चुकूनही कधीं करीत नसत चौकशी पण त्याचे ते शब्द खोल घर करून बसले होते माझ्या मनात त्यामुळें, अलिकडे माझ्या जिवाला जरी पूर्वीइतकी स्वस्थता नव्हती, तरी मी शेवटचा महिना दीड महिना अतिशय परिश्रम घेतले अभ्यासावर त्याचा माझ्या शरीरावर झालेला परिणाम बघून आई केव्हा केव्हा म्हणत असे, “करायची आहे काय मेली ती स्कॉलरशिप मिळवून? उगाच रक्ताच पाणी करून घेते आहेस तू अनू आपल्या! परीक्षेच्या वेळीं अथरूण धरण्याची मात्र पाळी येईल असल्या या अघोरी अभ्यासान!” यावर आप्पा तिला म्हणावयाचे, “अग, तुला काय कळतय त्यातल? तिला पडिता म्हणून मिरवायचय ना जगापुढ म्हणून धडपड चालली आहे तिची इतकी!—ती पडिता झाली म्हणजे तुला मग रोज नव्या देवळात जाण्याच काम पडणार नाहीं मुलींच! घरच्या घरींच तुला सारीं शास्त्र पुराण ऐकवील ती!” “दिसतच आहे ती

कसल शास्त्र ऐकवणार आहे ते मला !—असली कसली ही मेली रक्त जाळणारी विद्या ! ” आई त्याना म्हणावयाची पण तिचे भाकित जवळ जवळ खरें ठरले परीक्षेच्या दोन दिवस आधीच आपले अग रात्रीचे तापून येते, अशी शका आली होती मला पण मनाच्या निश्चयाच्या जोरावर मी परीक्षेंतून अगदी अपेक्षेपेक्षा चागल्या रीतीने पार पडले मात्र शेवटचा पेपर अर्धा लिहून होतो न होतो, तोच माझ्या हातापायाची आग होऊ लागली, डोळे काम करावयाचें नाकारू लागले जणु काही, यश आटोक्यात आल्याचे दिसल्याबरोबर, शरीरावरील निश्चयाचा ताबा सुटून त्यावर तापाचा पगडा बसला त्या दिवशी रात्रीच माझा ताप तीनपर्यंत चढला, व ती सारी रात्र तळमळत काढली मी पुढचे आठ दिवस कसे गेले, ते आता माझे मलाच आठवत नाही नीटसें कारण अर्धवट ग्लानि आणि अर्धवट भ्रम याच्या गुगीत मृत्यूच्या सरहद्दीवर घोटाळत होतें मी पण त्या आजारातला एक प्रसग मात्र मला अगदी पक्का आठवतो त्या प्रसगाने माझ्या आयुष्यावर विदारक परिणाम केलेला असल्यामुळेंच कदाचित् त्याच्या स्मरणाचे शल्य इतक्या तीव्रतेने माझ्या मनात डाचत असेल माझ्या तापाचा सातवा किंवा आठवा दिवस असेल तो सध्याकाळ झाल्यामुळें आई देवाजवळ दिवा लावण्यासाठीं खाली गेली होती, व अरू बर्फाची पिशवी माझ्या डोक्यावर धरून उशाशी बसला होता त्या पिशवीला सुटलेल्या पाझराचा गार ओघळ माझ्या मानेवर आल्यामुळे दचकून डोळे उघडले मी. त्याबरोबर अरू माझ्या गालाजवळ तोंड आणून म्हणाला, “ काय झालं अनू ? बर वाटतय ना तुला आता !” त्याच्या त्या प्रश्नानें शून्यतेंत विलीन झालेलें माझें मन तीतून बाहेर आले, व स्थिर दृष्टीनें त्याच्याकडे बघून मी कांहीं तरी आठवण्याचा, काही तरी बोलण्याचा प्रयत्न केला त्याची दृष्टि माझ्या दृष्टींत मिसळली होती, श्वास माझ्या श्वासात मिसळला होता त्याच्या डोळ्यातून एकवटून मजकडे निश्चलतेनें पहात असलेल्या त्याच्या करुणातुर प्रीतीनें माझ्या क्षीण, सतप्त शरीरातील सारे चैतन्य जणु जागृत केलें, व त्या आवेगात मी त्याला विचारलें, “अरू, तू असाच रहाशील नेहमीं माझ्याजवळ ?—मला सोडून नाहीं ना जाणार कधीं ? ” त्याबरोबर माझे हात आपल्या हातात घेऊन तो

– ❦ –

म्हणाला, " अनू, तुझ्या इतकं दुसरं काय आहे प्रिय या जगात मला ? " आणि त्याच्या डोळ्यातले अश्रु टपटपा माझ्या गालावर पडले

मी आजारातून उठल्यावर लगेच लोणावळ्याला गेलो आम्ही कालिंदीच्या वडिलानी आपला एक बगला आम्हाला रहावयाला दिला होता, व दुसऱ्या बगल्यात त्याची मडळी रहात असत आम्ही तिथे गेल्यावर आठ दिवसानी लग्न झाले कालिंदीचे तिच्या आईची फार इच्छा होती की, लग्नाचा समारभ मुबईला थाटाने व्हावा पण, जातीतल्या माणसाचे दुरुद्गार कानावर पडावयाला नकोत, या उद्देशाने तिच्या वडिलानी तो लोणावळ्यासच उरकून घेतला मुबईतल्या गर्भश्रीमत पाठारे घराण्यातली कालिदी न् अरविंद गुणी पण गरीब कायस्थ ! आईच्या, वडिलाच्या आणि जातीच्याही रोषाची पर्वा न करिता आपल्या त्या आवडत्या सहाध्यायाशी लग्न करण्याचा निश्चय तडीला नेण्यात कालिंदीनें दाखविलेल्या मनोधैर्याचे कौतुक वाटत असे मला फार लग्नानतर तिच्या उल्हासी न् खेळकर वृत्तीला ऊत आला अगदी आणि तो का येऊ नये ? ज्या प्रेमासाठी गेली चार वर्षे तिनें नाना प्रकारचे अपवाद सोसले न् नाना तऱ्हेची आमिषें लाथाडली, त्या प्रेमाने तिच्या जीवनाला आता पूर्णता नव्हती का आणली ? त्या पूर्णतेचा आनद तिच्या प्रत्येक हाल-चालीतून—वृत्तीतून न् कृतींतून—नाचत, निथळत होता जणु काही ! टेनि-सच्या कोर्टावर रोज सकाळी खेळताना आम्हा सर्वांचा डोळा चुकवून तिच्या ज्या नाजूक प्रेमचेष्टा अरविंदाशी सारख्या चालत असत किंवा रात्री ब्रिजच्या रगलेल्या डावातून त्याना उठवून त्याच्याबरोबर एकटेच फिरावयाला जाताना तिच्या डोळ्यात जी लकाकी खेळत असे !—प्रणयजीवनाचा तो आनद एकदा मनसोक्त उपभोगावयाला मिळाल्यानतर मग पुढले सारें आयुष्य जरी दु खात पिचत कठावे लागले तरी काय पर्वा ! सृष्टीत असे अनेक प्राणी असल्याचें आपण ऐकत नाही का की, जीवनातल्या वसताचा सारा सौरभ लुटल्यावर ज्याचें आयुष्य सपून जाते, ज्याच्या सौदर्याचा लोप होतो ? तसेंच आपलेंही झालें असे समजावे फार तर ! पण ज्या प्रेमोन्मादामुळें भावना बहरून जातात न् बुद्धि मोहरून जाते, त्याचा उपभोग एकदा तरी घ्यावाच घ्यावा !—कालिं-दीचे प्रेमजीवन बघून मला पडणाऱ्या या स्वप्नातून मी पुष्कळदा अगदीं

दचकून जागी होत असे—आम्ही इतके जवळ जवळ रहात होतो ना, पण टेनिसचा खेळ सोडून एरवी सहसा कवी अरू आमच्यात मिसळत नसे कालिं-दीविषयी त्याच्या मनात का एवढी अढी असावी, याचा राहून राहून चमत्कार वाटत असे मला मी त्याला खोदखोदून विचारले एकदा त्याबद्दल तेव्हा तो तुटकपणाने एवढेच मला म्हणाला, " मला की नाही तिच ते सार प्रेम पहिल्या-पासून उथळ न् थिल्लर वाटत आल आहे अगदी!" " छान! ज्या प्रेमाकरिता तिन इतका स्वार्थत्याग केला, त्याला तू उथळ म्हणतोस होय?" मी म्हणाले " मला तो स्वार्थत्याग वाटत नाही—त्याचे महत्त्व पटत नाही मनुष्य उच्चतम सुखाच्या प्राप्तीसाठी त्याच्यापेक्षा खालच्या दर्जाच्या सुखाचा त्याग करीत नाही का आनदान? त्यातलाच प्रकार आहे तो!" त्याने उत्तर दिलें " पण जगातल्या साऱ्याच स्वार्थत्यागाच्या कृत्याची वासलात अशा रीतीने लावता येणार नाही का?" मी विचारले " येईल कदाचित् पण प्रेमाचा हा असला प्रकार मला पसत नाही अन्, शिकारी नाही वाटेल त्या तऱ्हेचे कष्ट सोशीत सावजाचा पाठलाग करण्यासाठी? त्याच कोटीतल हे उपभोगासाठी आसुसलेल, जिवाच रान करून घेणार प्रेम त्या प्रेमाचा सबध बुद्धिपेक्षा किंवा हृदयापेक्षा वासनाशीच जास्त असतो, व वासनाच्या पूर्ततेन जीवन सफल झाल्याचा लटका भास होतो मनाला " तो म्हणाला त्याच्या त्या उत्तरानें गोधळ झाला माझ्या मनाचा अगदी, एक प्रकारची चमत्कारिक भीति वाटली मला शेलेच्या कविताविषयी बोलताना बौद्धिक प्रेमाबद्दल पुष्कळ गप्पा मारल्या होत्या आम्ही पण, प्रेम बौद्धिक असलें, म्हणून काय आपल्या आवडत्या माणसाला स्पर्श करण्याची इच्छा त्याला कधीच होणार नाही का? त्या स्पर्शापासून त्याला मुळीच सुख वाटणार नाही का? अरूची कल्पना तरी काय आहे प्रेमाविषयी?—मी त्याला विचारले, " प्रेमाला उपभोगाची आवश्यकता नाही, उपभोगाची इच्छा केल्याने त्याची किंमत कमी होते अस वाटत का तुला?" " होय प्रेमाच पर्यवसान उपभोगात व्हाव ही कल्पनाच मुळीं सहन होत नाहीं मला सुदर वस्तूच्या चिंतनात जें सुख आहे, तें तिच्या उपभोगात नाहीं उपभोग म्हटला की, त्याच्या पाठोपाठ उपरति आलीच प्रेमी माणसाना पुष्कळदा जो एकमेकांचा कटाळा

येतो, तो उपभोगानतर प्रेमातली जादू उडून गेल्यामुळच कालिंदीच प्रेम म्हणजे शुद्ध वासनाचा खेळ आहे अनू ” तो आवेशाने म्हणाला माझें मन अत्यत अस्वस्थ झाले त्याच्या त्या बोलण्याने जानकीच्या स्पर्शाने रामचद्राला मूछेतून जागृत करणारा भवभूति काय नादान होता का ? ते त्याचे प्रेम जर उदात्त नसेल, तर जगात उदात्तता राहिली तरी कुठे मग ? छे, छे, काही तरी चुकते आहे अरूचे, कुठे तरी वैगुण्य आहे त्याच्या विचारसरणींत —अशी सारखी रुखरुख लागून राहिली माझ्या जिवाला अखेर त्या दिवशीं रात्री ब्रिजचा खेळ आटोपल्यावर बागेच्या फाटकापर्यंत मला पोचवावयाला आलेल्या कालिदीला मी विचारले, “ लग्नामुळे फार सुखी झालोस नाही तू कालिदी ? तुझी सारीं मनोराज्ये सफळ झाली ना अगदी ? ” माझ्या त्या प्रश्नामागे शका-कुशकाचे केवढे थैमान चाललेले होते, याची त्या प्रणयिनीला काय कल्पना ! माझ्या गळ्यात हात घालून तिने मला म्हटले, “ काय सागू अनू तुला ? माझ्या आयुष्यात इतके सुखाचे दिवस कधी पाहिले नव्हते मी ! ” ‘

— ❦ —

‘ आम्ही परीक्षेचा निकाल पाहून आलो न् अभिनदनाचा वर्षाव सुरू झाला माझ्यावर ' (मोटारीतून खाली उतरल्यावर आधी आईला मी बातमी सागितली निकालाची) (त्याबरोबर ती मला देवघरात घेऊन गेली व फूल वाहून नमस्कार करावयाला सागितला तिने मला देवाना \ नतर माझ्या तोडावरून हात फिरवून ती मला म्हणाली, “ छान झाल बाई त्याच्या हौसेप्रमाण सगळ काही !—आता लग्न होऊन एकदा तू चागल्या घरी पडलीस न् चार मुलबाळ झाली, म्हणजे सार्थक होईल या तुझ्या गुणाच ! ” तिच्या तोडून हे शब्द पुरते बाहेर पडतात न पडतात, तोच आप्पा गडबडीनें तिथे आले अरूने त्याना आल्याबरोबर सागि-तली होती बातमी , ते हसत हसत मला म्हणाले, “ काय चाललय मायलेकीच एवढ हितगुज देवापुढ बसून ?—तिन बहुधा आतां लवकर लवकर लग्न व्हाव तुझ म्हणून गधफूल व्हायला सागितल असेल देवाना तुला ! केव्हा एकदा नातवाच तोंड दिसेल अस झालय तुझ्या आईला !(पण बी ए त मिळविलेल्या या यशाची तड एम् ए पर्यंत पोंचवून स्त्रियाची चळवळ चालवायची तयारी केली पाहिजे बरं का पडिताबाई ) नाही तर सारी विद्या गुडाळून ठेवून इतर

शिकलेल्या मुलीप्रमाण ससाराच्या गाड्याला जुपून घ्याल स्वत ला !—तुमच तें प्रेम बीम काही समजत नाही आम्हा जुन्या माणसाना ! आम्हाला विद्या, पैसा न् समाजसेवा या तीन गोष्टी मात्र कळतात ! ” आणि बोलता बोलता ते एकदम आईकडे बघून हसत हसत म्हणाले, “ का हो, मेजवानी कधी देता आम्हाला तुमच्या लेकीला स्कॉलर्शिप मिळाल्याबद्दल ! अरू, अरे उद्या बोलाव सकाळी तुमच्या साऱ्या मित्राना, मैत्रिणीना न् प्रोफेसराना !” इतके बोलून, आई त्यावर काय म्हणते ते ऐकण्यासाठी न थाबता, ते लगेच वर गेलेही परतु त्याचे ते बोलणे ऐकून शास्त्रीबुवाची प्रेमळ पण उग्र मूर्ति उभी राहिली माझ्या डोळ्यापुढे खरेंच, माझ्या इच्छेप्रमाणे मी सस्कृतमध्ये पहिली तर आलें पण हें आजचे यश म्हणजे पुढल्या कष्टमय आयुष्याची प्रस्तावनाच समजावयाची का ? आप्पा म्हणाले, आम्हाला प्रेम बीम काही समजत नाहीं तुमचे ! आणि त्याचे आयुष्य खरोखरीच प्रेमाशिवाय यशस्वी झाले होतें साऱ्या बाजूनी आईचा सगळा दिवस देवघरात जावयाचा न् त्याचा कचेरींत जावयाचा आता या घटकेला माझे मन आपल्या बोलण्याने चाळवून ते जे इतक्या घाईने वर गेले, तेसुद्धा महालक्ष्मीवर बाधल्या जात असलेल्या एका इस्पितळाच्या इमारतीचे कत्राट पक्के करण्यासाठी बाह्यात्कारी किती रुक्ष दिसत असे त्याचे जीवन ! पण त्या कल्पवृक्षाचा आसरा लाभल्यामुळेंच माझी सारीं सुखस्वप्ने सफळ झाली ना ? माझ्यासाठी त्यानी काय करावयाचे शिल्लक ठेवलें होते ? मग कसे म्हणू मी त्याच्या आयुष्यात प्रेमाला जागा नाही म्हणून ? ते आमच्याप्रमाणे उठल्यासुटल्या प्रेमाविषयी गप्पा मारित नाहीत किंवा त्याच्या वागण्यात प्रेमाची उचबळ दिसत नाही, म्हणून काय त्यांचे माझ्यावरलें प्रेम कमी ठरतें का ? कदाचित् प्रेमाविषयी वाचाटपणा न् पाडित्य करणारी आम्ही अलीकडली माणसे,—आम्हालाच त्याचे पावित्र्य न् त्यामुळें अगावर पडणाऱ्या जबाबदाऱ्या कळत नसतील आमचे प्रेम म्हणजे अधिऱ्या भावनाचा आधळ्या कोशिबिरीचा खेळ ! तो खेळण्यात आयुष्य घालवावयाचें की समाजसेवा करावयाची ?—पण आज तरी या प्रश्नाचे उत्तर देण्याची निकड नव्हती माझ्यामागे परतु मनूला दिलेल्या वचनाची मात्र आठवण झाली मला त्याच्या त्या बोलण्याने आणि मी तशीच उठून घरी गेलें तिच्या गेले तीन

महिने मी सारखी म्हणत होतें तिच्या आईला तिला शाळेंत घाला म्हणून पण त्या नुसता उसासा टाकून म्हणावयाच्या, वर्ष झाल्यावर मग पाहू ! तिच्या शाळेंत जाण्याला सर्वांत मोठा अडथळा दिनूचा होता त्यामुळें तिची आई न् वडील ही दोघेंही त्या बाबतीत काही करावयाला तयार नव्हती कर्त्यास-वरत्या मुलाच्या विरुद्ध जाण्याचा हिय्या कोणत्या आईबापाना होईल ? मी आप्पाना सुचविले एक दोनदा तिच्या वडिलाशी या बाबतीत बोलण्याबद्दल तेव्हा ते माझें बोलणें थट्टेवारी नेऊन म्हणाले, "तुला सवयच आहे नाही तरी असल्या पचायती करण्याची पोरी ! दुसऱ्याच्या गरजेला वाटल्यास पैसे द्यावे चार उचलून पण अनाहूतपणान सल्लामसलत द्यायला जाऊ नये कुणाला ! तुला जर मनूच्या स्थितिविषयी इतक वाटत, तर रमाबाईप्रमाण सदन काढ तू एक विधवासाठी परीक्षेतून मोकळी झाल्याबरोबर —मी दहा हजाराचा चेक फाडून ठेवलाय म्हणून समज तुझ्या सदनासाठी !" पण मी अगदी निश्चय केला होता मनूला शाळेंत घालावयाचा त्यामुळें माझ्या मनात आज असा विचार आला की, या वेळी जर मी दिनूला जाऊन भेटले, तर मला नकार द्यावयाचा धीर नाही होणार बहुधा त्याला —मला येताना पाहिल्याबरोबर तो हसत हसत म्हणाला, "पेढे आणले आहेत की नाही पडिताबाई ?" "पेढ्याना काय तोटा का आहे दिनू ?—पण मी की नाही आज काही तरी मागायला आलें आहे तुझ्याजवळ, न् ते तू मला दिल्याशिवाय आज हलायच नाही अस ठर-वलय मी इथून !" मी म्हणालें आणि तासभर त्याच्याशी हुजत घालून मनूला शाळेंत पाठवावयाचे वचन घेतले त्याच्यापासून तिथून परत येताना मी तिला माझ्याबरोबर घरी घेऊन आले रात्री आम्ही दोघी अथरुणावर पडून बोलत असता मनू मला म्हणाली, "आज तुझ्यामुळ कबूल केल दिनून मला शाळेंत घालायच, अनू—पण उद्या तू लग्न होऊन सासरी गेलीस म्हणजे कस होईल ग माझ ?" आणि तिला एकदम जोराचा हुदका आला तेव्हा मी तिच्या अगावरून हात फिरवीत तिला म्हटलें, "काही काळजी करू नकोस तू मनू अगदी ! मी कोणत्याही स्थितीत न् कुठेंही असलें तरी अतर नाही देणार कधी तुला !"

- ९ -

त्या दिवशीं संध्याकाळपर्यंत किती आनदांत गेला माझा वेळ! सकाळीं उठून मी चहा घ्यावयाला खाली आलें, तों आप्पा आईला काही तरी वाचून दाखविताना दिसले मला 'इदुप्रकाशा'चा ताजा अक होता तो मला पहाताच ते म्हणाले, "याच्यासाठीं चालली होती बरं हिची सारी धडपड! आम्ही इतकी काम करतो लोकाची न् देणग्या देतो एवढ्या सस्थाना, पण आमच्या-बद्दल कधी चुकून तरी येत आहे का वर्तमानपत्रात लिहून! नाही तर तुमच्या-वर पहा पडिताबाई, केवढ कॉलमभर आर्टिकल लिहिलय इदून आज ते!" आणि त्यानी हसत हसत कौतुकाने तो अक माझ्यापुढें ठेवला आईला वर्तमान-पत्र वाचून दाखवण्याचा त्याच्या आयुष्यातला बहुधा पहिला प्रसग असावा तो. ती अरूला म्हणाली "वाच बघू पुढच अरू!—ही आली न् थट्टा सुरू होऊन अर्ध्यावरच राह्यल वाचण" "अग, त्यात काय आहे एवढ वाचण्यासारख आई! बायकाना हरभऱ्याच्या झाडावर चढवण्याची सवयच असते नाहीं तरी वर्तमानपत्राना—शिवाय इदु तर घरचाच आहे आपल्या!" मी त्या लेखा-वरून नजर टाकीत म्हटलें सकाळचा माझा सारा वेळ आलेल्या मडळीला भेटण्यात न् त्याचे अभिनदन आभारपूर्वक स्वीकारण्यात गेला त्यातून मोकळी होऊन मी अग धुवून वर येते न येते, तोंच आमच्या मैत्रिणी यावयाला सुर-वात झाली आणि तेव्हापासून जो हास्यविनोदाला ऊत आला, तो सध्याकाळीं चार वाजता सारी मडळी जाईपर्यंत माझी सगळ्यात जास्त थट्टा कालिंदीनें केली अरूचें न् माझे सहजीवन ही गेली चार वर्षे सगळ्या कॉलेजला एक विषय होऊन बसला होता चर्चेचा, व प्रणयाचीं सारी चेष्टितें अनुभविलेल्या चतुर कालिंदीनें माझें मनोगत कधीपासून ओळखून ठेवलें होतें पण तिने या बाबतीत आजवर कधीं थट्टा नव्हती केली माझी परतु त्या दिवशी मात्र ती जाता जाता मला म्हणाली, "आता वाङ्निश्चयाची मेजवानी मिळाली पाहिजे बरं का याच्या मागोमाग अनू!—तू समजत असशील आपल आवडत माणूस आपल्या मुठीत आहे म्हणून पण पुरुषाची मन फार चचल असतात बरं का!" "तुला अनुभव आला आहे कीं काय अलीकडे त्या चचळपणाचा?" मी तो विषय उडवून देण्याच्या बुद्धीनें म्हटलें त्यावर माझ्या गालावर हळूच चापट मारून ती हसत हसत म्हणाली, "मला नाहीं कधीं तो अनुभव येण्याची धास्ती!

—आपल्या प्रियकराला पोपट बनवून पिंजऱ्यात कोंडून ठेवणाऱ्या जादुगारिणी-सारखी वस्ताद आहे मी! पण तू मात्र सांभाळ बाई!—नाहीं तर इतकं संस्कृत वाचून अखेर हंसपदिकेप्रमाण नुसते टोमणे देत बसण्याची पाळी येईल तुझ्यावर! आम्ही इंटरपासून आणभाक करून बसलों होतो, तेव्हा कुठं चार वर्षांनी सफळ झाले मनोरथ आमचे. प्रणयपथावर आडवळण न् अडथळे किती असतात, याची कल्पना नाही तुला अजून!" तिच्या त्या विनोदाने अत्यंत विचलित केले माझे मन. अरूचे मन जसे तिच्याविषयी स्वच्छ नव्हतें, तसेच तिचेही त्याच्याविषयी स्वच्छ नव्हते, व लोणावळ्याला असताना आमच्या वर्तनात मधून मधून उत्पन्न होणारा तुटकपणा बहुधा तिच्या लक्षात आल्याशिवाय राहिला नसावा. एकदा टेनिस कोर्टावरून एक शब्दही माझ्याशी न बोलता अर्ध्या खेळातून निघून गेला होता तो. तेव्हाच ती मला म्हणाली होती, "का ग, काहीं तरी बिनसलेलं दिसतंय तुम्हा दोघांच!—हीं कविमाणसं भारीच छांदिष्ट न् जगावेगळी असतात नाही तरी!" त्यामुळें तिचे ते उद्गार ऐकून आजपर्यंत कधी न आलेली शंका—कधी न झालेली इच्छा उद्भवली माझ्या मनात. अरूचे माझ्यावर खरोखरीच प्रेम आहे का? का मी निव्वळ आभासाच्या आशेवर झुलते आहे?—गेल्या आठ नऊ वर्षात आमचे संबंध, आमच्या भावना कसकशा बदलत, परिणत होत गेल्या, याचे चित्र उभें राहिलें माझ्या डोळ्यापुढें—किती फरक पडत जातो आपल्या भावनांत स्वतःला न कळत!—मला अजून आठवण आहे, मी पहिल्या भाऊबिजेला अरूला किती कौतुकानें ओवाळले होते, याची—परंतु, अलिकडे त्याच्या कपा-ळाला अक्षता लावताना नीराजनाच्या निर्मळ प्रकाशात जेव्हा आमची दृष्टभेट होत असे, तेव्हा ही निव्वळ फसवणूक चालली आहे असेच वाटत नसे का आमच्या मनाला? पण माझें मन ज्या भावनेने त्याच्याकडे ओढ घेते, तीच भावना त्याचीही माझ्याविषयी असेल का? माझ्याविषयीं त्याला आकर्षण वाटते—एक प्रकारची विलक्षण आसक्ति वाटते, याबद्दल शंका नव्हती मला. पण आकर्षण म्हटले तरी त्यात किती प्रकार असतात! आणि, मनुष्य जितका बुद्धिप्रधान, स्वतःच्या भावना पिंजून पहाण्याकडे त्याची जितकी प्रवृत्ति, तितके त्याचे मन अस्थिर, त्याच्या बुद्धीला धर कमी. कापूस पिंजल्या-

शिवाय त्याचे चागले सूत निघत नाही पण भावनाचे अगदीं उलटे असते त्या जो जो पिंजीत जावे, तो तो त्याचे स्नेहबधन निर्माण करण्याचे सामर्थ्य नाहीसे होत जाते अरूला मी प्रिय असेन,—नाही, आहेच पण, मला ज्या अर्थाने तो प्रिय आहे, त्या अर्थाने मी त्याला प्रिय असेन का ?—तळमळ लागून राहिली माग्खी माझ्या मनाला

आम्ही फक्त दोघेंच बसलो होतो तिथे त्या वेळी खडकावरून वेगाने आपटत, फेसाळत येणाऱ्या समुद्राच्या लाटाशिवाय दुसऱ्या कशाचाही आवाज कानावर येत नव्हता तृतीयेच्या चद्राची निमुळती, पिंवळसर कोर अगदी बुडावयाच्या बेताला आली होती भरतीमुळे वेगाने उसळत असलेलें समुद्राचे निळे पाणी तिला गिळून टाकण्यासाठी धडपड करित होते जणु काहीं. त्या मावळत्या चद्रकलेचे सौम्य चादणे क्षणोक्षणी फिके पडत चालले होतें, व त्याच्या मद प्रकाशात समुद्राच्या लाटा सर्पाच्या अगावरील खवल्यासारख्या चमकत होत्या पूर्ण काळोख किंवा पूर्ण प्रकाश हा सोत्कठ, सभय करित नाहीं मनाला कधीं पण ते लोपत चाललेले चादणे आणि तो वाढत चाललेला अधार—त्यानी व्याकुळ करून टाकले माझ्या मनाला आतापर्यत आम्ही पुष्कळ गोष्टी बोललो पण, जो एक प्रश्न माझ्या मनात मघाचपासून सारखा डाचत होता, तो अरूला विचारण्याचा हिय्या मात्र मला अजूनही झाला नव्हता किती वेळा तरी ओठापर्यंत आले असतील शब्द माझ्या!—एकदा वाटे, जी गोष्ट उघड आहे, ती विचारण्याचे तरी काय कारण ? पण, लगेच अशीही शका येई की, जे आपल्या मनात आहे तेच त्याच्याही मनात असेल कशावरून ?—बोलता बोलता एम् ए तही पहिला वर्ग मिळविता यावा, म्हणून डेक्कन कॉलेजमध्ये जाण्याची आपली कल्पना त्यानें मला सागितली, व माझे दोन्ही हात आपल्या हातात घेऊन तो मला म्हणाला "पण तुला सोडून जायच जिवावर आल आहे माझ्या अगदीं!—गेली चार वर्षे किती मजेंत घालविलीं आपण अनू ? पण फिलॉसफीवर जरा चागली व्याख्यान ऐकायला मिळतील डेक्कनमध्ये, म्हणून पडतोय मोह मला पुण्याला जाण्याचा. परंतु तुझ्या हो म्हणण्यावर अवलबून आहे माझ जाण सर्वस्वी!" त्याच्या त्या उद्गारांनीं

जी विश्रब्धतेची भावना माझ्या मनात उत्पन्न केली, तीत क्षणैक बुडून गेली ती शका —पण लगेच माझ्या मनात विचार आला,—आज जर हा प्रश्न मी विचारला नाहीं तर ?—तर मन रुखरुखत राहील एकसारखें मागाहून माझें. म्हणून मी त्याला म्हटले, " तुझ्या कोणत्याही महत्त्वाकाक्षेच्या आड मी येणार नाहीं, अरू गेली चार वर्षें एकत्र राहिल्याच सार्थक व्हायच असेल आपल्या, तर एकमेकाच्या ध्येयाच्या पूर्ततेसाठी यापुढ झटल पाहिजे आपण —पण तू पुण्याला जाण्यापूर्वी एक गोष्ट ठरवून टाकली पाहिजे आता अस नाही का वाटत तुला ? " " कोणती गोष्ट ? " त्याने मला उत्सुकतेने विचारले " तस विशेष काही नाही पण एक—एक वचन दिल पाहिजेस तू मला आज," मी घुटमळत म्हणाले " कोणत—कसल वचन ? तू काय एवढ मागणार आहेस माझ्याजवळ अनू आज ?" बोलता बोलता त्याने माझीं बोटे हळूच आपल्या ओठावर दाबली त्याच्या त्या थरथरणाऱ्या नाजूक ओठाच्या स्पर्शाने रोमाच उठले माझ्या अगावर,—प्रणयपूर्तीचे स्वप्न सफळ झाल्याचा भास झाला मला! क्षणैक त्या सुखसमूढ स्थितीतच होतों आम्ही पण जवळ येत असलेल्या लाटाच्या तुषारांनी आम्हाला भानावर आणले, व मी त्याला विचारले, " तू इथून जाण्यापूर्वी आप्पाना आपण सागून टाकल्या पाहिजेत साऱ्या गोष्टी.— त्याच्या ध्यानीमनीही नसेल आपल्याला एकमेकाविषयीं काय वाटत ते !—म्हणून मला वाटत की, एम् ए झाल्याबरोबर लग्न करण्याचा आपला विचार आपण सागून टाकला पाहिजे त्याना आता !" माझ्या तोंडून ते शेवटलें वाक्य बाहेर पडलें मात्र, त्याच्या हातातला माझा हात त्यानें एकदम सोडून दिला तो क्षणमात्र अगदीं स्तब्ध, अगदीं निश्चेष्ट होता त्याची ती अवस्था पाहून मी भिऊन गेले, व त्याचा हात आपल्या हातात घेऊन त्याला म्हणाले, " काय झाल रे अरू तुला एकाएकी ? बोलत का नाहीस तू ?" " काहीं नाही —तू जें आता बोललीस ते इतक अनपेक्षित होत मला कीं, माझ्या साऱ्या भावनाना दचका बसल्यासारखा झाला एकदम !" तो उसासा टाकीत हलुहळू म्हणाला मूर्छेतून सावध होणाऱ्या माणसाने आपली पूर्वस्थिति आठवण्याचा प्रयत्न करीत एक एक शब्द सावकाश उच्चारित बोलावे ना, तशा प्रकारचें वाटलें त्याचें तें बोलणें मला त्याच्या ज्या विलक्षण मनाचा थाग मला कधींच लागला नाहीं,

न्या मनाच्या खोल कुहरातून क्षीण होत ते शब्द बाहेर आले जसे काहीं! आणि आपल्या भोवतालचे विश्व गरगरा फिरते आहे असे वाटले मला त्या शून्यतेच्या भरात मघाशी मी मोठ्या उत्सुकतेने वरलेला त्याचा हात माझ्या हातातून केव्हा गळून पडला, हे कळले नाही मला त्या स्थितीतून बाहेर पडल्यावर माझ्या मनाला निराशेने घेरले, सभोंवती अधार पसरत आहे असे वाटले मला, व अत्यत उद्वेगाने मी त्याला विचारले, "याचा अर्थ मी असा करू क्ा की तुझ माझ्यावर प्रेम नाही?" "नाही ग अस कस होईल अनू? —पण प्रेमाच पर्यवसान त्याच एका सबधात झाल पाहिजे असा आग्रह आहे का तुझा? मला कशीशीच वाटते ती कल्पना अगदी!" त्याने मला म्हटले त्याच्या त्या बोलण्यात नवीन नव्हते काही पण आजपर्यंत ज्या गोष्टी केवळ तत्त्ववाद म्हणून आम्ही बोलत आलों होतो, त्याचा सबध आमच्या स्वत च्या जीवनाशी असेल, अशी कल्पनाही नव्हती कधी शिवली माझ्या मनाला त्यामुळे हताश, हतबुद्ध होऊन गेले मी त्याच्या त्या बोलण्याने.—इतक्यात आम्हाला नेण्यासाठी तोफखान्याजवळ येऊन थाबलेल्या आमच्या मोटारीचा कर्णा वाजला त्याबरोबर माझा हात धरून, जणु काही मला उठावयाला आधार देत, अरू म्हणाला, "मला सागता येत नाही अनू मला काय वाटत तें! मी लिहूनच कळवीन सार काही तुला—"

- ❧

अरूचे ते पत्र! प्रेमाने ओथबलेले आणि आसवानी भिजलेले पत्र!! तुकडे तुकडे केले त्या पत्रानें माझ्या हृदयाचे आणि मीही पण तुकडे तुकडे केले सतापाने त्याचे त्या पत्राची वाट पहात सारी रात्र तळमळत काढली होती मी अथरुणावर. पहाटच्या गार वाऱ्याने माझा डोळा लागला असता केव्हा तरी त्याने हळूच ते टेबलावर आणून ठेवले होते उठल्याबरोबर मी ते घाईघाईनें वाचले, व नतर खाली गेलें चहा प्यावयाला मला बघितल्याबरोबर आई म्हणाली, "का ग उशिर झाला इतका आज उठायला? आणि डोळे लाल न् फुगीर कशान दिसताहेत तुझे एवढे?—काल फार श्रम झाले तुला मेजवानीमुळ नुकतीच आजारातून उठली आहेस,—मी म्हणणार होते तुला एकसारखी वर-खाली खेपा घालू नकोस म्हणून!" तिच्या त्या बोलण्यानें भडभडून आलें

मला अगदी —जगातले प्रेमाचे सारे झरे जरी आटून कोरडे पडले, तरी हा मायेचा झरा—हा नाही कधी मला दगा द्यावयाचा, असा विचार मनात आला न् अश्रु उभे राहिले माझ्या डोळ्यात पण ते दिसू दिले नाहींत मी तिला, व कसाबसा चहा एकदाचा सपवून वर आले अरू माझी वाट पहात तिथे बसलेला होता टेबलावर त्या पत्राचे कपटे पडलेले आणि त्याच्याकडे पहात तो बसलेला !—त्याला कल्पना तरी होती का आपण काय केले आहे याची ?—जर असती, तर त्याने असे पत्र का लिहिलें असते ? प्रेमाच्या आश्वासनानी काठोकाठ भरलेलें होते तें पत्र —शेलेला जर प्रणयाचे तत्त्वज्ञान विशद करावयाला बसवला असता, तर त्यानें सुद्धा कदाचित् इतके सुदर पत्र लिहिले नसते पण उपयोग काय होता त्या साऱ्या आश्वासनाचा ? तान्हेल्या हरणाने धावत धावत मोठ्या आशेनें सरोवरापाशी जावे न् खारट पाण्याला तोड लावण्याचा प्राणातिक प्रसग त्याच्यावर यावा, तशी माझी अवस्था झाली ते पत्र वाचून. पत्र लिहिताना त्यावर ठिकठिकाणी पडलेले त्याचे अश्रु !—त्यानी जागोजाग शाई पसरून गेली होती पण त्या अश्रूनी माझ्या मनाचे सात्वन करण्याऐवजी उलट त्याचा दाह वाढविला मात्र वळिवाच्या पावसानें नाही का मोहर झडून जात न् जमिनीला भेगा पडत ? ढोंग, सारे ढोग ! इतके जर प्रेम आहे याचे माझ्यावर, तर हा माझ्याशीं लग्न करावयाला का तयार नाहीं ?—हा काय विचित्र प्रकार आहे प्रेमाचा ?—माझ्या मनात एकवार शका आली, मनूखर तर याचे प्रेम नसेल ना ? आणि लगेच मी त्याला विचारलेंही तसे तेव्हा तो म्हणाला, " नाही नाही, अनू, तुझ्याइतक कुणावरच प्रेम नाही माझ. कोणत्या शब्दानीं, कोणत्या उपायानी पटवून देऊ तुला मी हे ? " " का ? हे पत्र लिहून नाहीं केलस तू आपल्या प्रेमाच प्रदर्शन ? या पत्राचे तुकडे लॉकेटमध्ये घालून गळ्यात वागवणार आहें ते मी नेहमीं माझ्या —म्हणजे मला विसर नाहीं पडणार तुझ्या स्वर्गीय प्रेमाचा कधीं ! " मी उपरोधाने हसून म्हणाले पण त्याच क्षणी डोळे भरून आले माझे न् मी ते दु ख लपविण्यासाठी आसरा घेतला उशीचा त्याबरोबर तो माझ्या जवळ आला व माझ्या केसावरून हात फिरवीत त्यानें मला म्हटलें, " अनू, मी काय करू ? तुझी इच्छा असेल तर लग्न होऊ दे आपल.—पण त्या लग्नामुळ तुलाही सुख होणार नाही न् मलाही सुख होणार नाहीं. उलट ज्या

प्रेममूर्तीच आपण इतके दिवस चिंतन केल, ती भगून गेल्याबद्दल, भ्रष्ट झाल्या-बद्दल सारखी तळमळ होत राहील माझ्या मनाची ! अनू, तुला खरोखरीच कधी कळणार नाहीत माझ्या भावना ” त्याच्या त्या प्रेमाच्या, सात्वनाच्या शब्दानी माझ्या हृदयाची तळमळ, माझा सताप अधिकच वाढला, व त्याचा हात दूर सारून धडपडत उठत मी त्याला म्हटलें, “ पुरे पुरे अरू ! माझ्याशीं लग्न केल्यान ज्या माणसाच सार आयुष्य दु खात जाणार आहे, त्याच्याशीं लग्न करण्याची—त्याचे उपकार घेण्याची इच्छा नाही मला !—तुझ्याशी लग्न न केल्यान मी काही मरत नाही खास आणि आता जगून तरी काय मिळवायच आहे मला ? खरोखरी, तू जर आता इथून जाशील तर माझ्या मनाच्या वेदना कमी तरी होतील थोड्या ! ” माझ्या तोडचे ते उद्गार ऐकताच तो जाण्यासाठी उठला व त्याने माझ्याकडे केविलवाण्या दृष्टीने पाहिले त्याबरोबर मी एकदम उठून त्याच्या खाद्यावर हात ठेवले, व त्याच्या दृष्टीत दृष्टि मिसळून म्हटलें, “ किती कठोर, किती क्रूर आहेस रे तू अरू ! ” “ अनू अनू, अशक्य गोष्ट शक्य करून कोणाला सुख होणार आहे ? आजपर्यंत ज्या भावनेन मी तुझ्या-कडे कधी चुकूनही पाहिल नाही, त्या भावनेन मी तुझ्याशी यापुढ कसा वागू ? आपल्या वासनेच्या पूर्ततेसाठी तू मला बळी द्यायला सागते आहेस माझ्या भावनाचा,—माझ्या वैशिष्ट्याचा ! ” त्याने ते शेवटचे वाक्य इग्रजींत उच्चारलें त्यानें वापरलेला तो वासना ( desire ) हा शब्द ऐकताच, कालिदीच्या प्रेमा-विषयी तो जें मजजवळ बोलला होता, त्याची आठवण झाली मला, व मी अगदी चिडून जाऊन त्याला इग्रजीतच म्हणालें, “ पुरे कर तुझ्या या ध्येयवा-दाच्या वल्गना ! तुला काय अस वाटल रे, की आम्ही सारे जमिनीवर सरपट-णारे प्राणी न् तू तेवढा स्वर्गांत भराऱ्या मारणारा शेलेचा चडोल ? तुझी कल्पना तरी काय आहे स्वत विषयीं ? माणसाच्या अहकाराला, आत्मपूज-नाला काही सीमा असते ! खरोखरी पस्तावा होतो मला तुझ्यासारख्या ढोंगी, नालायक माणसावर प्रेम केल्याबद्दल ! सर्व बाजूनी फसवणूक झाली माझी तुझ्या बाबतीत —ती प्रेमाची सभाषण आणि !—नको, नको, त्या प्रसगाच स्मरण सुद्धा नको व्हायला यापुढ कधी ! ” आणि मी दुःखानें बिछान्यावर अग टाकले.

मुका मार ! होय, मुका मारच तो माराला जखमेच्या रूपानें कुठे तरी तोंड फुटलेलें असले, म्हणजे त्याची नक्की जागा कळते, व त्यावर उपचारही करता येतात पण मुका मार !—जागा तर सागता येत नाही निश्चित, पण कळा मात्र येतात सारख्या. त्या दिवसापासून माझी स्थिति तशीच झाली नव्हती का ? आईच्या कुशीत तोंड लपवून, तिच्या हृदयावर डोके ठेवून मनसोक्त रडावें, असे किती तरी वेळा वाटले असेल मला पण, जगातल्या कोणत्या एका व्यक्तिपासून आपले दु ख दडवून ठेवण्यासाठी जर मला सतत धडपड करावी लागली असेल, तर ती आईपासून ! आई, आई ! तिच्या प्रेमासारखा उबारा न् निवारा जगात दुसरा कोणता तरी असू शकेल का ? जगात तेवढेच एक स्थान असें आहे की, जिथे हृदयातल्या साऱ्या दु खानी मुक्तकठ धाय मोकलून रडावें. पण, मी अशी हतभाग्य की, तो आसराही मला धाव घ्यावयाला उरला नव्हता माझें दुःख तिला क्षणोक्षणीं दिसत होते, पदोपदी जाणवत होते माझ्या डोळ्याभोवती पडत चाललेलीं काळी वर्तुळें, माझी अन्नावरून उडून गेलेली वासना, माझे खोलीला आतून कडी लावून दिवसभर बसणे !—मी केव्हाही खाली आलें की, ती माझ्याकडे कावरीबावरी होऊन टकमका पहावयाची पण, तिच्या मनात काहींही आलें असलें, तरी ती बिचारी मला काय विचारणार ? मी किती झाले तरी प्रौढ, शिकली सवरलेली, विद्वान् मुलगी ! गेलीं चार वर्षें मी ज्या जगात स्वच्छदानें वावरत न् विहार करीत होते, त्यातल्या धाडसाची न् धोक्याची त्या माऊलीला काय कल्पना ! त्यामुळें वासराच्या यातना बघून त्या दूर करा-वयाला असमर्थ असलेली गाय जशी त्याच्याकडे पहात दीनवाणी हुबारते, तशी अवस्था झाली होती तिची पण माझा तरी काय इलाज होता ? माझें दुःख जरी कदाचित् मी मनाचा हिय्या करून तिला सागितलें असते, तरी ते तिला पटलें असते का ?—तो प्रसग घडल्यानतर दुसऱ्याच दिवशी अरू जेव्हा पुण्याला जाताना तिच्या पाया पडला, तेव्हा ती त्याला म्हणाली, "अनूच लग्न ठरल तर वेळेनसर अभ्यास सुद्धा टाकून आल पाहिजे बर तुला तयारी करायला ! तिच्या लग्नामध्यें होमात लाह्या टाकायचा न् जावयाचा कान पिळा-यचा हक्क तुझा आहे बरं अरू !" तिने मोठ्या प्रेमानें आणि कौतुकानें उच्चारलेले ते शब्द !—ते कानावर पडताच मला जो हुदका आला, तो मी पाठमोरी उभी

असल्यामुळेंच तिच्या लक्षात आला नाही अशा स्थितींत माझ्या मनातल दु ख मी तिला सागण्यात काय अर्थ होता ? उलट ते सारे अत्यत चमत्कारिक, अभद्र वाटले असते तिला, न् माझ्याविषयी कदाचित् शिसारी मात्र उत्पन्न झाली असती तिच्या मनात —म्हणून तिच्यापासून माझे दुःख चोरून ठेवण्याशिवाय दुसरी गति नव्हती मला मी खाली येताच हातातले काम तसेच ठेवावयाची ती न् माझ्याकडे सारखी पहात रहावयाची !—अशा रीतीने तीन चार दिवस वाट पाहिल्यावर तिने काही तरी निरोप पाठविला कालिंदीला कारण, एक दिवस मी चहाच्या वेळी खाली आले, तों आई तिच्याशी हळुहळू बोलत बसलेली दिसली मला एरवी कधी ती घरीं आली, तरी चालीरीतीचे काय दोन शब्द आई तिच्याशीं बोलेल तेवढेच तिला कालिंदी खाली घरात वावरलेली चालत नसे फारशी —पण त्या दिवशी ते अगदी अनपेक्षित दृश्य दिसलें मला परतु, मला पाहिल्याबरोबर कालिंदी झटकन् उठून हसत हसत माझे हात धरून म्हणाली, "पुन्हा तब्बेत बिघडून घ्यायचा बेत दिसतोय तुमचा बाईसाहेब ! आताच काकू सांगत होत्या मला की, तू दिवसभर खोलीत बसून वाचीत असतेस सारा वेळ ! एम ए ला पहिल यायची प्रतिज्ञा केली असली, म्हणून काही एव्हापासून पुस्तकात डोक खुपसून बसायला नको बर का ! पुढ सार्वजनिक कामांत पड-ल्यावर तुझी भेट आम्हाला आधी चिठी पाठवून घ्यावी लागेल, हें जाणून आहोत आम्ही पण आताच इतकी दुर्मिळ होशील अस वाटल नव्हत मला !" आणि मला एक शब्दही बोलण्याची सधि न देता ती आईला म्हणाली, "तुमची काही हरकत नाहीं ना काकू ?—मी आज हिला आपल्याबरोबर घेऊन जाणार आहे घरी माझ्या !" "पण ती तयार आहे का यायला ?—तें तर विचारशील की नाही आधीं ?" आई चहा कपात ओतीत म्हणाली "तिच्या कबुलीची काय गरज आहे ? मी मुळी चहा घेतल्याबरोबर माझ्या मोटारींत घालून घेऊन जाणार आहें तिला !" ती म्हणाली आणि, खरोखरीच तिनें मला कपडे बदलावयाला लावून, आपल्याबरोबर स्वतःच्या घरीं नेलें.



आम्ही मोटारींत बसल्यापासून कालिंदीच्या तोंडाचा जो पट्टा एकदा सुरू झाला, तो अगदीं थेट तिच्या घरी जाऊन पोंचेपर्यंत माझ्या मनाची स्थिति,

माझ्या हृदयातलें दु ख तिनें ओळखलें होते, याबद्दल शकाच नाही कपडे बदल-ण्यासाठी मी जेव्हा वर आले, तेव्हा तिथे माझ्या टेबलावर नेहमी दिसणारा अरूचा फोटो !—त्याचे तिथून नाहीसे होणे न् अरूचे एकाएकी पुण्याला जाणें—त्या दोन गोष्टीचा जो काय अर्थ करावयाचा तो केला होता तिने पण एका अक्षरानेही तिने मला विचारले नाही त्याबद्दल उलट, जणु काही, काही घडलेच नाही अशा रीतीने, ती आपल्या नव्या घराविषयीच्या बारीक सारीक गोष्टी सागत होती मला लहान मुलाना तपासताना डॉक्टर जसा त्याचे मन दुसरीकडे गुतविण्यासाठी काही तरी गमतीचे बोलतो ना, तसे चालले होते तिचे ती सारखी काही तरी बोलत होती न् मधून मधून हसत होती,—पण तिचे डोळे मात्र माझी प्रत्येक हालचाल, माझ्या चेहऱ्यावरली प्रत्येक भावना न्याहाळण्यात गुतले होते ती जर दुसरी कोणती वेळ असती, तर मी खचित तिला म्हटले असते, “ मला कशाला नेतेस घरी तुझ्या ?—तुमच्या नव्या ससारात अडचण मात्र होईल उगाच माझी ! ” पण स्वत च्या दु खात मी आज इतकी चूर होते की, हा सहज सुचणाराही विनोद त्या दिवशीं मला करिता आला नाही आम्ही घरी गेल्यावर तिने आपले ते छोटेखानी बिऱ्हाड, त्यातली प्रत्येक वस्तु न् वस्तु, मला मोठ्या उल्हासाने दाखविली तिच्या माहेरचे ऐश्वर्य नव्हतें तिथे, ही गोष्ट खरी पण, अरविंदावरल्या तिच्या निरतिशय प्रेमाने त्या गरि-बीच्या ससाराला एक प्रकारचे निरुपम माधुर्य आणले आहे, असे वाटले मला तिथल्या हर एक वस्तूत अन् साऱ्या वस्तूच्या माडणीत तिची कलाभि-रुचि—कोंड्याचा माडा करण्याचे चातुर्य दिसून येत होते —ससार ही सुद्धा तरी एक कलाच नाही का ? दोन व्यक्तीनी परस्पराच्या सुखासाठी जरूर तो स्वार्थत्याग करणें आणि त्या त्यागाचा जाणीव मनाला केव्हाही बोंचू न देणे, याच्यापरती पवित्र, नाजूक कला जगात दुसरी कोणती आहे ? जीविताचे सारें सौदर्य प्रमाणबद्धतेत असते, व ती प्रमाणबद्धता सयमानें येते नुसत्या चार वस्तु जरी नीटनेटक्या माडावयाच्या झाल्या, तरी त्याची ती माडणी सुदर दिसावी, म्हणून आपल्याला काहीं वस्तु पुढे काहीं मागे माडाव्या लागतात तसेंच ससाराचेही नाही का ? काहीं वासना, काही भावना या त्यांच्यापेक्षा उच्चतर वासनांच्या, भावनाच्या सोईसाठी मागे साराव्या, अजिबात सोडून

द्याव्या, तेव्हाच ससारात सवादित्व येऊन तो सुखमय होतो ना ? फार कशाला, कालिंदीने जर प्रेमासाठी वैभवावर लाथ मारण्याची मनाची तयारी केली नसती, तर ज्या अनिर्वचनीय सुखात ती आज डुबते आहे, ते तिला कधी तरी लाभलें असते का ? जगातल्या प्रत्येक व्यक्तीने जर आपल्या साऱ्या वासना, साऱ्या भावना मोकाट, सुसाट सोडल्या, तर ससाराचाच काय पण समाजाचाही विचका होऊन जाईल सगळया !—पाहता पाहता तिने आपल्या शयनगृहात नेले मला तिथे एका लहानशा वाटोळ्या टेबलावर सुबक पुष्पपात्राला टेकून फोटो ठेवलेला होता त्या दोघाचा तिने मोठ्या अभिमानाने तो फोटो मला दाखविला न् आपला हात माझ्या अगाभोवती लपेटून विचारले, “अनू, तुला नाही सुखी व्हावस वाटत माझ्यासारख ?” तिच्या त्या प्रश्नाने इतका वेळ कशा तरी आवरून धरलेल्या माझ्या दु खाला वाचा फुटली, तिच्या खाद्यावर मान टाकून मी ओक्साबोक्शी रडू लागले—कालिंदीने प्रेम केले आणि मीही प्रेम केलें ! पण तिला सुखसर्वस्व लाभले. न् मी ? माझ्या हाती काय पडले ?—“Infinite passion and the pain ”—हे ब्राउनिंगचे शब्द आठवले मला कालिंदी नुसती माझ्या अगावर प्रेमाने एकसारखा हात फिरवीत होती पण किती बरें वाटले मला तिच्या त्या सहानुभूतीच्या स्पर्शाने !—आपले दुःख दुसऱ्यानें जाणलें आहे, त्या दु:खाने त्याचे हृदय द्रवून गेले आहे, या नुसत्या कल्पनेनें अर्धे अधिक सात्वन होते पोळलेल्या जिवाचे !—मनाच्या त्या अवस्थेंत तिनें न विचारताही कदाचित् मी तिला सागितला असता तो सारा प्रकार पण तित-क्यात दारावरली घटा वाजली. त्याबरोबर “अगबाई, आले वाटत ? न् चहाची मी काही सुद्धा नाही तयारी केलेली ?” असें अर्धवट स्वतःशीच पुटपुटत ती लगबगीनें बाहेर गेली तिच्या मागोमाग विस्कटलेला पोषाख नीट करून मीही बाहेरल्या दिवाणखान्यात आले, व तिथे मधोमध ठेवलेल्या टेबलाजवळ बसलेल्या अरविंदाना नमस्कार केला तेव्हा त्याच्याजवळ बसलेल्या तरुणानें माझ्याकडे क्षणैक न्याहाळून, निरखून पाहिलें आणि, त्याच्या घाऱ्या डोळ्यात जिज्ञासायुक्त हास्याची लकेर खेळू लागून, तो कालिं-दीकडे बघून इग्रजीत म्हणाला, “मला कुठ तरी पाहिल्या सारख वाटतय याना पूर्वी ?” त्याबरोबर कालिंदी हसून इग्रजीत म्हणाली, “—ही अनसूया

भागवत,—आमच्या शेजारच्या रा ब भागवताची मुलगी मीच दिली होती तुझी हिच्याशी ओळख करून चार वर्षांपूर्वी कॉलेजात ! किती लाजाळू होती रे ही त्या वेळी !—पण आता तुझ्यासारख्या बॅरिस्टराचा सुद्धा वादात पराभव करील बरं का ती !" "किती अचानक भेट झाली आपली आज नाही !" त्या तरुणानें मला उद्देशून हसत हसत इंग्रजीत म्हटले आणि, त्या क्षणी त्याची न् माझी दृष्टभेट होताच मला कळून चुकले की, चार वर्षांपूर्वी ज्या तेजस्वी डोळ्यानीं आपल्या दृष्टिक्षेपाने माझें मन इतके विचलित करून सोडले होते, ते डोळे आजही माझ्याकडे तितक्याच आकर्षकतेने, उत्सुकतेनें पहात आहेत !



त्या क्षणापासून माझा सारा वेळ आनदात गेला त्या दिवशी माझें दु ख इतके ताजें आणि तीव्र होते की, त्याचा पूर्ण विसर पडणें अर्थातच शक्य नव्हते पण जळजळणाऱ्या जखमेवर गार मलमाची पट्टी लावून वारा घालीत बसल्यानें ज्या तऱ्हेचे सुख होतें, तशा प्रकारचे सुख कालिंदीच्या सहवासात मिळालें मला तिची उल्हासी वृत्ति, अरविंदाचा प्रेमळ स्वभाव आणि अनिरुद्धाचें मार्मिक भाषण,—त्या तिघाच्या सगतीत मला विसर पडला माझ्या वेदनाचा आमचे बोलणें बहुतेक सारे इंग्रजीतून चालले होतें अनिरुद्ध इंग्रजी इतकें सुदर व सफाईनें बोलत की, त्यातल्या सौष्ठवाने मुग्ध करून सोडलें मला अगदीं कालिंदीनें माझ्यासाठी जेवणाचा बेत मुद्दाम ब्राह्मणी ठेवला होता ते मिळमिळीत जेवण पहाताच अनिरुद्धानी मोठ्या आवेशानें शाकाहारावर हल्ला चढविला, व मला खूप छेडलें त्या प्रश्नावर युरोपात काही तत्त्वनिष्ठ शाकाहारी असे आहेत कीं, जे दुधासारखे पदार्थ सुद्धा प्राणिज म्हणून वर्ज्य मानतात त्याचे उदाहरण देऊन कालिंदीनें तयार केलेल्या मिष्ट श्रीखडाचा आस्वाद घेत असलेल्या माझी त्यानी सपाटून थट्टा केली तेंव्हा शेवटी मी त्यांना म्हटलें, "तर्काच्या अंतिम टोंकापर्यंत जाऊन कोणत्याही तत्त्वाची टवाळी करता येईल अशा रीतीन ! पण मानवी आयुष्यात भावनाना काहींच का जागा नाही ? आपल्या इतर कल्पना, इतर वर्तन तरी कुठ इतक तर्कशुद्ध किंवा तर्कसिद्ध असतं, तर या बाबतीत तेवढी तर्काच्या टोंकापर्यंत धाव घ्यायची !—तुम्ही

म्हणता त्याप्रमाणं हें श्रीखड कदाचित् प्राणिज अन्न असेल पण ते तयार करताना प्रत्यक्ष हिसा तर होत नाही ना कोणत्याच प्रकारची ? आपल बहुतेक सुखदु ख हे प्रत्यक्ष अनुभवावरच नसत का अवलबून ? आत्मा अमर आहे हें सर्वानाच माहित असते पण, त्याला शरीराची जोड मिळाल्यान लाभणार प्रत्यक्ष साहचर्याच सुख मृत्यूमुळ दुरावत, म्हणूनच आपण आपल्या आवडत्या माणसाच्या मरणान कष्टी होतो ना ? वातावरण हवेन व्यापलेल आहे हे आपल्याला ठाऊक असल, तरी वाऱ्याची झुळूक प्रत्यक्ष अगाला लागल्याशिवाय आपल्याला तिच अस्तित्व कुठ जाणवत ? कोणत्याही गोष्टीपासून होणार सुखदु ख हे तिच्या आपल्यावर होणाऱ्या प्रत्यक्ष परिणामावर—ज्या अनुकूल प्रतिकूल सवेदना आपल्या मनात उत्पन्न होतात त्याच्यावरच नसत का अवलबून अखेर ? जगातल सारं सौंदर्य सकलक, सार सुख समर्याद अन् सारी तत्त्व सापेक्ष आहेत त्याना जी पूर्णता येते, ती केवळ आपण तस मानतो म्हणून,—निव्वळ आपल्या भावनेच्या प्रभावान ! आपल सार जीवन हे भावनाच्या हेलकाव्यावर झुलत असता याच बाबतीत तेवढी तर्काच्या खडकाकडे धाव का घेता तुम्ही ?—मला तर बाई तुमचा तो बाजार पाहिला की नाही, म्हणजे पाण्यातून बाहेर काढल्यावर तडफडणाऱ्या माशाची आठवण होऊन, अगावर काटा उभा रहातो माझ्या !—श्रीखड हे जरी प्राणिज अन्न असल, तरी अशी हत्या नाही बघावी लागत तें तयार करिताना कुणाची ! " माझ्या त्या युक्तिवादाला ते काही उत्तर देणार तोंच कालिंदी त्याना हसत हसत म्हणाली, " पाहिलस ? मी म्हटल नव्हत ही वादात तुला हार खायला लावील म्हणून ! " " त्याच्यासारख्या बुद्धिमान् तरुणीकडून पराभव करून घेण्यातच अधिक आनद आहे मला !—याच्याशीं बोलताना आपण विलायतेत आहो, असाच क्षणभर भास होतो मला ताई ! इतक्या धीट न् वावदूक मुली क्वचितच आढळतात आपल्याकडे —ही घ्या हो आमची शरणचिठ्ठी ! " ते माझ्याकडे वळून हसत हसत उद्गारले वादाला ही जी भलतीच कलाटणी त्याच्या उद्गारानीं मिळाली, त्यामुळें मी लाजून गेलें अगदीं जेवणानतर त्या दोघानी धूम्रपानाला सुरवात केली मला मासाहाराइतकाच त्याचाही अगदीं तिटकारा होता, व त्याच्या नाकातोंडातून धुराचे फवारे निघू लागताच मला तें असह्य होऊन मी मुकाट्यानें खिडकीजवळ येऊन उभी राहिलें. माझी

ती स्थिति लक्षात आली अनिरुद्धाच्या कारण ते लगेच मजजवळ येऊन म्हणाले, "तुम्हाला त्रास होतो का आमच्या धूम्रपानापासून ?" आणि लगेच त्यानी हातातली सिगारेट विझवून फेंकूनही दिली त्याच्या त्या सौजन्याने मी ओशाळून गेलें अगदी, व त्याच्या तोंडातून निघालेल्या सुवासिक धुराच्या भपकाऱ्याने आलेला ठसका दाबीत म्हणाले, "छे, छे, तस नाही काही —आमच्याकडे कुणी ओढीत नाही, म्हणून सवय नसल्यामुळ वाटत थोडस चमत्कारिक " "तुम्ही मघाशी म्हणत होता ना भावनाच्या दृष्टीन आपण आयुष्याचा विचार केला पाहिजे म्हणून ? मग आपल्या परिचयातल्या एकाद्या माणसाला जर धूम्रपानापासून सुख होत असेल, तर त्यामुळ स्वत ला होणारा थोडासा, न् मला वाटत तोही काल्पनिक, त्रास सोसायला आपण तयार नको का व्हायला ?" हे त्याचे बोलणें ऐकत असता मला एकदम आठवण झाली —अरू कॉलेजात गेल्यापासून केव्हा केव्हा सिगारेट ओढीत असे रात्रीच्या वेळी पण मला किती राग यावयाचा त्याचा ! आणि त्यानेंही कधी बुद्धिवाद घालण्याचा प्रयत्न केला नाही माझ्याशीं त्याबद्दल —हे विचार माझ्या मनात येत आहेत, तोच घरातले सारे आवरून बाहेर आलेली कालिंदी आमच्याजवळ येऊन म्हणाली, "तुझ्याशी वाद घालायला आज अगदी तोडीस तोड माणूस भेटल नाही रे भाई ! पण तुमच्या या वादामुळ दुसरं काही बोलण झाल नाही आमच तू आज येणार आहेस हें जर माहित असत मला आधी, तर मी आणली नसती हिला घरीं !" "नाही ग —तुझ आपल काही तरीच कालिंदी ! माझा वेळ किती छान गेला आज ह्याच्यामुळ !" माझ्या तोंडातून चटकन निघून गेले हे वाक्य पण नतर माझें मलाच कसेसेंच वाटले तसे बोलल्याबद्दल वास्तविक आज कालिंदीकडे आल्यापासून माझा वेळ जो इतका सुखात गेला, तो मुख्यत अनिरुद्धांच्या मोहक बोलण्यामुळेंच नव्हे का ? मग ते कबूल करण्यात काय गैर होते ? नव्हते खरेंच पण तरीही तसे करण्याबद्दल लाज वाटली मला ! माझें बोलणे अर्ध्यावरच थाबल्यामुळें कालिंदीच्याही बहुधा लक्षात आला असावा माझ्या मनाचा गोंधळ. पण, आपल्याला त्यातलें काहीं कळलेंच नाहीं असें दर्शवीत ती म्हणाली, "तू अस म्हणावस हा तुझा चागुलपणा आहे अनू ! पण भाई, आज आता एखाद्या शोला जाऊ या ना आपण —निरर्थक वाद घालून डोकीं

तापवून घेतल्यावर आता काही तरी करमणूक हवी गडे! मी गाडीसुद्धां बोलावली आहे मुद्दाम धरून—!"

- ❧ -

आणि, कालिंदीच्या माहेरून मोटार येताच, आम्ही तिच्या सूचनेप्रमाणे खरोखरीच सिनेमाला गेलो मला तिची ती कल्पना पसत नव्हती फारशी, व म्हणून मी नकारही दिला पहिल्यादा पण, लगेच मला वाटलें की, माझ्या मनाला बरे वाटावे म्हणून ती सारखी इतकी झटत असता व माझ्या मनाला करमणूक व्हावी म्हणूनच तिने ही कल्पनाही काढली असता, मी तिचे मन नाराज करणे कृतघ्नपणाचे होणार नाही का? आणि मी कबूल झाले शेवटी. अनिरुद्धानी बॉक्सची तिकिटे काढली, व ती दोघे न् त्याच्या पलीकडे आम्ही दोघें अशा रीतीनें आम्ही बसलो चित्रपट सुरू झाल्याबरोबर कालिंदी म्हणाली, "आता बोलायच नाही बर का अगदी, अनू? नाही तर हा भाई काही तरी खुसपट काढील न् होईल वाद सुरू तुमचा पुन्हा!" "बर बुवा, नाही बोलणार मी मुळीसुद्धा" अनिरुद्ध म्हणाले अरविंदाचे धूम्रपान सारखें सुरू होते पण मघाशी खिडकीजवळ तो प्रसग घडल्यापासून अनिरुद्धानी एकदा सुद्धा स्पर्श केला नाही सिगारेटला आणि तोही अरविंदानी वारवार आपली हस्तिदती केस त्याच्यापुढे केली असताना कालिंदी म्हणाली देखील मला एकदा, "बर बाई, तुझ्यामुळ तरी विश्राति मिळाली त्याच्या तोंडाला आज! नाही तर सारखा वेळी अवेळी धूर निघत असायचा त्यातून! मी याना किती तरी बोलते,—पण ते माझे बोलणे हसण्यावारी नेतात न् आपल्याला जें करायच ते करतात" पण मला मात्र अगदी ओशाळल्यासारखे झाले त्याच्या त्या वर्तनानें. मला वाटले, माझ्या सोईसाठी स्वत च्या सुखावर पाणी सोडण्याचें, माझ्या मताला इतका मान देण्याचे त्याना काय कारण? एकदा तर माझ्या मनात असेही आले की, त्याना अरविंदाजवळ जाऊन बसावयाला सागावे, म्हणजे धूम्रपान करावयाला सकोच नको वाटावयाला त्याना! पण, लगेच माझ्या मनांत अशी शका आली की, ते मजजवळ बसलेले मला आवडले नाहींत, असा जर माझ्या त्या सागण्याचा त्यानी अर्थ केला तर? आणि ते मजजवळून उठून गेल्याने मला तरी बरे वाटेल का?—आजपर्यंत अरुपलीकडे मला दुसरें

जग नव्हतें, त्याच्याशिवाय दुसऱ्या पुरुषाचा सहवास मला माहित नव्हता अनिरुद्धाची ओळख झाल्याला अजून पुरते चार तासही लोटले नव्हते. पण आपल्या मधुर वर्तनानें आणि चतुर सभाषणाने माझे मन मोहित केलें त्यानीं अगदीं! जणु काही, गेली चार वर्षं, ते प्रथम कॉलेजात माझ्या दृष्टीला पडले त्या क्षणापासून, माझें अतर्मन त्याची उत्कठेने वाट पहात होते एकादी अवन्वित घडलेली गोष्ट न कळत आपल्यावर असा काही परिणाम करून जाते की, त्या परिणामाच्या आपल्या भवितव्याशी असलेल्या सबधाची कल्पना त्या वेळीं तर आपल्याला येत नाहीच, पण अतर्मनाचे उलटे सुलटे खेळ दाखविणाऱ्या स्वप्नातही त्याचा पडताळा कधी मिळत नाही परतु, अतःकरणाच्या कपारीत खोल दडलेलें त्या परिणामाचे बीज, दैवाने अनुकूल सधि आणून देताच, भावनानीं बहरून जाते तसा प्रकार झाला माझा त्या दिवशीं अनिरुद्धाना मी सध्याकाळीं जेव्हा पाहिले, तेव्हा कॉलेजातला तो प्रसग उभा राहिला माझ्या डोळ्यापुढे,—मला आठवण झाली माझे मन किती विलक्षण रीतीनें त्यानीं विचलित केले होतें याची! आणि जेवताना बाह्यात्कारीं त्याच्याशी वाद खेळत असतां माझें अतर्मन मला सारखें विचारीत होते की, तुझी अरूवर जर इतकी प्रीति होती, तर या नवीन तरुणाविषयी एवढे आकर्षण तुला का वाटावें?—त्या प्रश्नाला उत्तर देण्याचा मी पुष्कळ प्रयत्न केला—त्या दोन्ही आकर्षणांची मी तुलनाही करून पाहिली—पण मला उत्तर सुचेना! एक गोष्ट मात्र माझ्या लक्षात आली. अरूच्या सान्निध्यात मला स्वतःच्या व्यक्तित्वाचा सकोच झाल्यासारखें चुकूनही कधी वाटले नाहीं पण, अनिरुद्ध आपले घारे डोळे विस्फारित करून माझ्याकडे पाहू लागले, त्याची दृष्टि माझ्या दृष्टीला येऊन भिडली की, माझ्या मनाला अगदीं चमत्कारिक होऊन जात असे, माझ्या व्यक्तित्वाचा दर्प अगदीं बचकून मागें सरत असे एकदा वाटे, त्या घाऱ्या डोळ्यातून जगाकडे तुच्छतेनें पहाणाऱ्या त्याच्या प्रखर बुद्धिमत्तेने तर माझें मन दिपावून जात नाही ना? पण त्याच्यापेक्षा बुद्धिशाली माणसें मी लहानपणापासून पहात आलें होतें आमच्या घरीं आणि शिवाय मी स्वत: काय कमी बुद्धिमान् होतें का? छे छे, तें कारण नव्हे. मग अरूविषयीं जो संकोच, जो धाक चुकूनही कधीं मला वाटला नाहीं, तो अनि-

रुद्धांविषयीं कां वाटावा?—मी राहून राहून विचार करित होते पण शेवटपर्यंत उत्तर सुचलें नाही मला आणि माझ्या सुखासाठी, माझ्या अभिरुचीला ढका लागू नये म्हणून, ते किती जपत होते सारखे! अर्धा शो आटोपल्यावर खाली आलों आम्हीं, व त्याच्या बरोबर पेये घेतलीं तिथें पावसाचा एकाद दुसरा थेंब पडत होता आता मधून मधून म्हणून आम्ही दोघी घाईने उठून आत आलों पण तितक्यात मी पाहिले, अरविंदानी आग्रहानें पुढे केलेला चिरूट त्यानी घेतला नाही, व त्याबद्दल अरविंद त्याना हसत हसत म्हणालेही काहीं तरी काय बोलले, ते कळलें नाही मला पण मी बॉक्समध्ये येऊन बसले, ती मात्र अत्यत अस्वस्थ होऊन शो सुरू झाल्यावर मी त्याना हळूच इग्रजीत विचारलें, "तुम्हाला फार त्रास होतोय नाही माझ्यामुळ!—मघाचपासून एकदाही धूम्रपान केल नाहीं तुम्ही!" तो प्रश्न विचारताना होत असलेली माझ्या हृदयाची धडधड न् माझ्या आवाजात उत्पन्न झालेला कप!—ते जर लक्षात आले असते त्याच्या तर!—पण ते त्या अधारातही माझ्याकडे डोळे भरून पहात हसून इग्रजीत म्हणाले, "काही माणसासाठी त्रास सोसताना पुष्कळदा सुख होत आपल्याला नाही का?—तुम्ही आठवण करीपर्यंत विसर पडला होता मला धूम्रपानाचा इतका शोकी आहें मी याचा!"

- ❦ -

ती रात्र अथरुणावर तळमळत काढली मी अगदीं कारण, सिनेमा आटोपून आम्ही बाहेर येत असता जो प्रकार अभावितपणे घडला, त्याने माझे मन अत्यत व्याकुळ करून सोडले शो सपल्यावर आम्ही खालीं आलों, त्या वेळीं पाऊस जोरानें पडत होता आम्ही सर्वानी आपले पाऊसकोट बरोबर आणले होते, व अरविंदानी लगेच आपला कोट अगात चढवून, कालिंदीला कोट घालावयाला मदतही केली मीही लगबगीनें कोट अगात घालावयाला लागलें पण, फाजील घाई केल्यामुळें म्हणा किंवा पदर नीट बाधलेला नसल्यामुळें म्हणा, माझ्या उजव्या हातातून कोट चटकन वर चढेना ती माझी धडपड पाहून स्वतःच्या कोटाची बटणे लावीत असलेले अनिरुद्ध एकदम पुढें आले, व माझें लक्ष जाण्यापूर्वीच ते मला कोट चढवावयाला मदत करू लागले त्याच्या सहाय्यानें मी कोट घालून बटणें लावीत होतें तोंच माझ्या पाठीवरील

त्याचा सुरकुतलेला भाग नीट करण्यासाठीं ते जवळ आले, व त्याची कॉलर सारखी करीत असताना त्या धादलीत अगदी सहज, अगदी अनपेक्षित रीतीनें त्याच्या बोटाचा स्पर्श माझ्या मानेला दोहो बाजूनी झाला त्याच्या त्या किंचित् ओलसर पण उष्ण बोटाचा स्पर्श वाऱ्याच्या झोताने गार झालेल्या माझ्या मानेला होताच माझ्या शरीरातील रक्त अत्यत वेगाने उसळले,—अगदी अननुभूत अशा विकाराचा कल्लोळ माझ्या मनात उठला आणि त्याच्याशिवाय इतर सर्व वस्तुजात क्षणमात्र माझ्या डोळ्यापुढून अदृश्य झाले! त्याना कदाचित् कल्पनाही नसावी—त्याच्या त्या अकल्पित स्पर्शाने मला किती बेभान, किती बेचैन करून टाकले ते! "चल ना ग अनू, अजून नाही का कोट घालण आटपल तुझ?" या कालिंदीच्या शब्दानी त्या स्वप्नसदृश अवस्थेतून जागृत केले मला, व मी भानावर येऊन पहाते तो ते कालिंदीशी बोलत उभे होते मी तिच्या मागोमाग मोटारमध्ये येऊन बसले पण त्याच्या स्पर्शामुळे माझ्या शरीराला सुटलेला कप न् डोळ्यावर आलेली तंद्रा अद्याप कमी झाली नव्हती त्या स्पर्शात असे काय होते की, ज्यामुळे माझे मन इतके सुन्न, शरीर इतके सकप व्हावे? मी आठवण केली—अरूच्या स्पर्शाने माझी अशी अवस्था कधीच झाली नव्हती त्याच्या स्पर्शापासून मला अत्यत सुख होत असे परंतु ते सुख निराळें आणि—! पण या स्थितीला सुख तरी म्हणता येईल का? त्या स्पर्शाने माझे रक्त जसे उलटे वाहू लागले, माझ्या भावना जशा गरगरा फिरू लागल्या न् माझी गात्रे जशी रोमाचानी फुलून गेली! त्या स्थितीत सुख नव्हते आणि दु खही नव्हते एक प्रकारची ग्लानि, एक प्रकारची मूर्च्छना मात्र होती भूल दिलेला मनुष्य जसा ती उतरल्यावर काही काळ गुगीत असतो, तशी माझी स्थिति मोटारीत बसल्यावर झाली होती आमच्या बगलीच्या रस्त्याला मोटार लागताच कालिंदी मला म्हणाली, "पुन्हा कधी येशील आता अनू? आज तुम्ही दोघ आल्यामुळ किती मजेंत गेला आमचा वेळ!" त्याबरोबर ड्रायव्हरजवळ बसलेले अनिरुद्ध माझ्याकडे पाहून हसत म्हणाले, "दोघामुळ नको म्हणू ताई, याच्यामुळ म्हण! आज या आल्या म्हणून तू घराबाहेर पडलीस नाहीं तर मी कितीही आर्जव केलीं तरी बाहेर यायला तयार होत नाहींस तू कधीं!" तिच्या त्या प्रश्नाला काहींच उत्तर

न देता इंग्रजींतून नुसते आभाराचे शब्द कसे तरी उच्चारून मी मोटारीतून खाली उतरले, व दार उघडावयाला आलेल्या नोकराच्या स्वाधीन कोट करून तडक वर माझ्या खोलीत गेले आणि लगेच कपाळावर थंड पाण्याचा शिडकावा करून बिछान्यावर पडले मी पण, संध्याकाळपासून घडलेले ते प्रसंग, खिडकीजवळ धूम्रपानाबद्दल झालेले ते बोलणे, थिएटरच्या दाराशी घडलेला तो शेवटचा प्रकार—त्याची ती रुबाबदार मूर्ति हलेना माझ्या डोळ्यापुढून! गेल्या सात आठ रात्री मी तळमळत काढल्या होत्या पण आजची ही तळमळ!—त्याच्या त्या स्पर्शाने माझे सारे जीवन खळबळून सोडलें असे सारखे वाटत होते मला —अखेर विचाराचे मनात उठलेले ते काहूर असह्य होऊन मी बाहेर गच्चीत येऊन उभी राहिले चंद्र या वेळी मावळण्याचा सुमार असल्यामुळें वाऱ्याच्या गार झुळका सारख्या येत होत्या, व पाऊस पडून स्वच्छ झालेल्या आकाशात पांढुरके तुरळक ढग तरंगत होते त्या अपुऱ्या पांढुर चंद्रबिंबाचे शांत चांदणे चौफेर पसरून गाढ झोपेत असलेल्या शिशूच्या हसऱ्या चेहऱ्यावरील प्रसन्नता सृष्टीच्या मुखावर शोभत होती पावसाने धुपून निघालेली झाडाची पाने त्या पिंवळसर प्रकाशात नाचत, चमचमत होती आणि अर्धवट उमललेल्या कळ्या विकासाच्या उन्मादाने हसत होत्या मघाशी मेघाच्या गडगडाटाने सारे विश्व काळवंडून, जणु कोलमडून गेल्यासारखें वाटत होते आणि आता? त्या मनसोक्त वर्षावानंतर सृष्टीत जणु नवचैतन्याचा संचार झाला होता ते रमणीय दृश्य पाहून इतका वेळ अबोध भावनांनीं तळमळत असलेले माझे मन शांत झाले, व स्थिरचरातून पाझरत असलेल्या त्या प्रसन्नतेत, वर्षावानंतर अर्धोन्मीलित झालेल्या त्या सृष्टीच्या सुखस्वप्नात आपणही विरून जावे, अशी उत्कट इच्छा झाली मला गच्चीच्या कठड्यावर पसरलेल्या चमेलीची शुभ्र फुले माझ्याकडे बघून हसत आहेत, आपल्या मंद आंदोलनाने जवळ बोलावीत आहेत, असा भास मला झाला आणि मी पुढें होऊन त्याच्या नाजुक गुच्छाला माझे ओठ लावले त्याबरोबर, मला वाटलें, चोहों बाजूंनी अंगाला लपेटणारे ते चंद्राचे मृदु किरण माझ्या कानात गुणगुणत आहेत—

Music is in the sea and air,
Winged clouds soar here and there,
Dark with the rain new buds are dreaming of
'Tis love, all love!



त्यानतर पाच सहा दिवसाची गोष्ट मनूला नुकतीच पोंचवून येऊन अथरुणावर विचार करित पडले होते मी दिनू तिला मुबईतल्या शाळेंत घालावयाला तयार नव्हता त्यामुळें थोडी काळजीतच होते मी पण आप्पाच्या शिफारशीमुळें तिची अनाथ बालिकाश्रमात अगदी मनासारखी सोय झाली सारी, व आज जेव्हा मी तिला गाडींत बसवून देऊन परत आलें, तेव्हा एक ओझें उतरल्यासारखे वाटलें मला आपल्या शिरावरून काल रात्री ज्या वेळी तिनें या व्यवस्थेबद्दल डोळ्यात पाणी आणून मला धन्यवाद दिले, तेव्हा किती समाधान झालें माझ्या जिवाला! त्याच वेळी मी तिला बजावून सागितलें की, "आता तिथला अभ्यासक्रम पुरा होईपर्यंत तू येऊ नकोस घरी मध्यें नाहीं तर पुन्हा काहीं तरी खुसपट काढून दिनू बद करायचा शिक्षण तुझ! तुला काय पैसे वगैरे लागतील ते पत्र पाठवून मागवून घे माझ्याकडून शिवाय अरू आहेच तिथें अडल्या वेळी मदत करायला मी त्याला लिहीन तस" आणि त्यानतर किती तरी वेळ त्याच्याच विषयी बोलत होतो आम्ही "त्याचा काहीं उपयोग कधी होईलस वाटत नाही मला अनू," ती म्हणाली तिचे ते उद्गार ऐकून मी चकित झालें अगदीं, व तिचे त्याच्याविषयीचे मत काढून घेण्याची उत्कट इच्छा झाली मला मी तिला विचारलें, "का ग, अस का म्हणतेस तू? अरूचा तुझ्यावर फार जीव होता नाहीं का?" "होय. पण त्याला एकाद मनुष्य आवडल म्हणून तो काहीं झीज नाही सोसायचा त्याच्यासाठीं कधी त्याचा स्वभाव की नाही थोडासा वडिलासारखा आहे आपल्या आत्या मरेपर्यंत त्यांच किती प्रेम होत तिच्यावर! पण दुसर लग्न झाल्यावर ते तिला विसरले न् तिच्या मुलालाही विसरले—तुला कल्पना नाही अनू, तुझी ओळख होईपर्यंत तो सारखा माझ्या मागें मागे असे तो कीं नाही स्वार्थी आहे विलक्षण अगदीं त्याच्यावर कुणी कितीही प्रेम केल, तरी चीज नाही व्हायच त्या प्रेमाच

व माझ्या हृदयाला चरका बसला अगदीं देवा, काय ही प्रतारणा? ही प्रतारणा मुकाट्यानें सोसण्यासाठींच का स्त्रीजन्म असतो? पुरुषाच्या प्रणय-चेष्टाचें आणि काव्यकौतुकाचे साधन व्हावे, एवढ्याचसाठीं का स्त्रीजात उत्पन्न झाली आहे? मनूनें त्याच्यावर इतकें प्रेम केलें!—आणि त्यानें झिडकारल्या-वर तिला जनरूढीप्रमाणें लग्न करून मुकाट्याने दुसऱ्या पुरुषाबरोबर ससार करावा लागला कदाचित् त्याच्याविषयीची ती प्रेमभावना आजही तिच्या हृदयात तितक्याच उत्कटतेने हेलावत असेल,—या क्षणाला सुद्धा तिच्या त्या मिटलेल्या डोळ्यापुढें त्याच्याबरोबर वाछिलेल्या प्रणयजीवनाची सुखस्वप्नें नाचत असतील!—हा सारा लपडाव प्रेमाविषयीच्या त्याच्या त्या अजब तत्त्वज्ञानामुळेंच तिला करावा लागला ना? प्रेमविषय जवळ आला असता त्याचा हिरमोड करणारी, त्याच्यापासून दूर पळणारी ही प्रेमाची विचित्र जात कुठली? अरूसारखा एकमार्गी, प्रेमळ तरुण जर इतक्या आतल्या गाठीचा असू शकतो, तर जगातले सारेच पुरुष असे दुटप्पी न् स्वार्थी असतील का?—मला एकाएकीं आठवण झाली अनिरुद्धाची गेल्या चार पाच दिवसात कालिंदी-कडे जावें, असें किती वेळा तरी वाटले असेल मला पण पूर्वीं माझा स्वत· होऊन तिच्याकडे जाण्याचा प्रघात नव्हता कधी, आणि, आता जर मी एक-सारखी तिच्याकडे जाऊ लागले, तर काय वाटेल तिला? अनिरुद्धाची गाठ पडावी एवढ्याचसाठी मी तिच्याकडे येते, अशी नाही का समजूत होणार तिची? पण अनिरुद्धाना भेटण्याची उत्सुकता!—इतक्यात खालीं मोटर थांबल्याचा आवाज होऊन त्या विचाराच्या तद्रीतून दचकूनच जागी झालें मी आणि, लगबगीनें खिडकीजवळ जाऊन पहाते, तों कीर्तिकराची मोटार दारात उभी असून अनिरुद्ध तिच्यात बसलेले!

- ❦ -

कालिंदी वर आल्याबरोबर मी तिला विचारलें, "का ग, एवढ्या उन्हाच्या वेळीं इकडे कुणिकडे आज?" "घरी जेवायला आलों होतों आम्ही दोघ, म्हणून आलें सहज पडिताबाई कोणत्या मूडमध्यें आहेत तें बघायला! त्या दिवशीं रात्रीं मोटारींतून उतरताना तू पुन्हा आमच्याकडे लवकर यायच कबूल केल होतंस ना? मग का नाहीं आलीस ग एकदासुद्धां?—तें कांहीं नाहीं,

उद्या संध्याकाळीं तू आता रहायलाच ये आमच्याकडे !" ती मला रागाचा आव आणून म्हणाली "हे बघ, ते आपण सावकाश ठरवू मागाहून पण तू जरा बसशील की नाही आल्यासारखी?—का अगदी अक्षत घेऊनच आली आहेस?" मी म्हटले "आलें असते अक्षत द्यायला पण भाई विलायतेहून परत येऊन चार महिने झाले, तरी लग्नाची गोष्ट काढू देत नाही न् तूही एम् ए होईपर्यंत लग्न करायला तयार होत नाहींस मग देणार कुणाची अक्षत?—भाई खाली मोटारीत बसला आहे वाट पहात मी जर तुझ्याशीं गप्पा छाटीत बसलें वर, तर त्याला काय वाटेल ग?"—तिने अशा चमत्कारिक रीतीनें आमची दोघाची नावे एकत्र आणली की, तिचे ते बोलणे ऐकून मला अतिशय लाजल्यासारखे झाले, व ते खालीं मोटारीत असल्याचे मला माहीत नाही असे दर्शवून मी म्हणाले, "कोण ते—अनिरुद्ध बसले आहेत? मग त्याना वर का नाही आणलस तू आपल्याबरोबर?" "मी पुष्कळ केला आग्रह त्याला पण तुझ्या बोलावण्यावाचून थोडाच येणार आहे तो वर? तो म्हणजे अगदीं शभरनबरी विलायती शिष्ट आहे बर का?" ती हसून म्हणाली "एवढच ना! चल, आपण दोघीजणी खाली जाऊन घेऊन येऊ त्याना वर!" मी म्हणाले आणि आम्ही लगेच खाली गेलो मला पाहिल्याबरोबर अनिरुद्धानीं आपल्या डोळ्यावरले गॉगल्स काढले, व माझ्याकडे बघून ते हसत हसत इग्रजीत म्हणाले, "बरोबर सहा दिवसानी भेटतो आहो नाहीं आज आपण? कस काय चाललय तुमच?" "ठीक चाललय पण मी आपल्याला वर बोलवायला आले आहे मुद्दाम," मी किंचित् लाजून म्हटलें. त्याबरोबर ते म्हणाले, "माझ्या बाबतीत इतक औपचारिक वागण्याची गरज नव्हती मुळीच!" ते मोटारीतून खाली उतरताच मी कालिंदीला म्हणालें, "तू पुढे हो. मी याची आप्पाशी ओळख करून देऊन वर येते लगेच." आणि मी त्याना घेऊन दिवाणखान्यात गेले. आप्पा एका भाटिया गृहस्थाशी बोलण्यात गुतलेले होते आम्हाला पहाताच ते उठून पुढे आले, व मी लगेच अनिरुद्धाची त्याच्याशी ओळख करून दिली तेव्हा आप्पा त्याच्याशीं हस्तादोलन करून हसत हसत उद्गारले, "आता मला कायद्याबद्दल जेव्हा सल्ला घ्यायचा प्रसग येईल, तेव्हा मी तुमचीच मदत घेईन यापुढ कीर्तिकराचा न्

आमचा फार घरोबा आहे पण तुमची ओळख व्हायचा योग मात्र आज अनूमुळ आला —अग, याना काही चहा वगैरे देशील कीं नाहीं ?” त्यांच्या त्या शेवटच्या वाक्याचा रोख ओळखून मी अनिरुद्धाना म्हणाले, “चला, आपण वर जाऊ या” त्यानी आपाना लवून नमस्कार केला, व आम्ही दोघें वर माझ्या खोलीत आलो माझी कल्पना अशी होती कीं, कालिंदी आधीच तिथे येऊन बसली असेल पण ती बहुधा खालीच आईशी काही तरी बोलत होती अनिरुद्धाबरोबर अशा रीतीनें एकट्यानेंच बसण्याचा प्रसंग आल्यामुळें मी थोडीशी गोंधळून गेले, व त्याच्याशी काय बोलावे, हें सुचेना मला. खोलीची सजावट पाहून ते इग्रजीत काही तरी अभिनदनपर बोलले पण त्याबद्दल रीतीप्रमाणें त्याचे आभार मानण्याचीही आठवण झाली नाहीं मला. माझी ही स्थिति बहुधा लक्षात आली असावी त्याच्या कारण थोडा वेळ वाट पाहून ते मला म्हणाले, “एम् ए झाल्यावर काय करायच ठरवलय तुम्ही ? ताई सागत होती तुम्ही काहीं तरी सामाजिक कार्य अगावर घेणार आहा म्हणून खरोखरी, तुमच्यासारख्या बुद्धिमान् स्त्रीन जर स्त्रियाच्या चळवळींत मन घातल, तर त्याच्या उन्नतीचा प्रश्न तेव्हाच सुटायच्या मार्गाला लागेल !” “कालिंदीन उगाच काही तरी अचाट कल्पना करून घेतल्या आहेत माझ्याविषयीं अद्याप काहीं निश्चित ठरलेल नाहीं माझं पण आपण काय करायच ठरवलय ?” मी त्याना विचारले त्याबरोबर ते दचकल्यासारखे होऊन इग्रजींत उद्गारले, “मी ?—मी सध्या माझ्या प्रॅक्टिसचा जम बसवण्याच्या खटपटीत आहें पण खरं सागायच म्हणजे माझ मनच इथ रमत नाहीं अजून म्हणण्यासारख परदेशात मी तीनच वर्षं काढलीं खरीं पण त्यामुळ माझा सारा दृष्टिकोन, माझ्या जीवनाची एकदर दिशा बदलून गेल्यासारखी झाली आहे अगदी तुम्ही कदाचित् माझ्या ठिकाणीं देशाभिमान नाही अस म्हणाल पण इथ आल्यापासून मी जिकडे पहातों तिकडे दौर्बल्य दिसत,—माणस खुरटलेलीं न् संस्था मरगळलेल्या दिसतात युरोपातल्या स्वित्झर्लंडसारख्या अगदीं टीचभर देशात जरी गेल, तरी जो जिवतपणा, जें रसरसणारं सामर्थ्य, जी प्रभुत्वाची आकाक्षा दृष्टीस पडते, तिचा मागमूसही नाहीं इथ —मी जेव्हां प्रथम आल्प्स पर्वत पाहिला, तेव्हा आपल्या हिमालयाची आठवण होऊन ऊर

भरून आला माझा अभिमानानं पण आपल्या देशाचं आतां फक्त भौगोलिक मोठेपण तेवढंच काय ते शिल्लक राहिलं आहे त्यांचे ते लॉईड जार्ज, क्लेमांसो न् हिंडनबर्ग बघितले, म्हणजे आपले टिळक, गोखले न् फेरोजशहा खुजे वाटतात त्यांच्यापुढे !—असल्या या खुरट्या न् दुबळ्या वातावरणात आपण राहिलों, तर आपणही काही दिवसानी वठून खुरटून जाऊ, अशी भीति वाटते मला ! त्यामुळं माझं मन कशातच रमत नाही इथं !" "तें रमायला एक उपाय आहे भाई,—लग्न करणं !" आत आलेल्या कालिंदीनें हसत हसत म्हटलें. "तू लग्न केल्याशिवाय तुझं मन रमायचं नाही हिंदुस्थानात !" "तुझं म्हणणं असं आहे का ताई, कीं कोणतीही मुलगी गळ्यात बांधून घेऊन मी एकदाचा संसार थाटावा ?" ते एकदम चिडल्यासारखें करून म्हणाले "मला काय प्रेमाची किंमत कळत नाहीं तर मी तुला असं सांगेन ? पण तू आता शक्य तितक्या लवकर आपलं प्रेमाचं माणूस शोधून काढ गडे !"—ती पुढें आणखी काहीं बोलणार, तोंच चहा न् फराळाचे सामान आलें त्याबरोबर हायसें वाटलें मला अगदीं, व लगेच मी चहा ओतून अनिरुद्धाना दिला माझ्या हातून कप घेत असता ते म्हणाले, "मी एकाच अटीवर चहा घेणार आहें तुमचा — तुम्ही आमच्याकडे चहाला आलं पाहिजे एक दिवस आतां आमच्या मंडळीशीं तुमची ओळख करून देण्याची इच्छा आहे मला फार !" "त्याला वेळ कशाला ? उद्याच मी तिला घेऊन येईन तुझ्या घरी न् तिथून ती रहायला येईल आमच्याकडे ! मी आताच काकूशी बोलून ठरवून टाकलंय बरं का सारं अनू ?" कालिंदीनें कप खालीं ठेवता ठेवता म्हटलें, व हातातल्या घड्याळाकडे पाहून ती उद्गारली, "अग बाई, ठरल्यापेक्षा अर्धा तास उशिर झाला तुमच्या या गप्पामुळं उठलंच पाहिजे बर का भाई आता नाहीं तर उगाच मर्जी जाईल स्वारीची !" आणि लगेच तीं दोघें खोलींतून बाहेर पडलीं मोटार सुरू करताना ते मला म्हणाले, "मग उद्या मी चार वाजताना वाट बघेन बरं का घरीं तुमची" आणि, मी त्यावर काहीं बोलणार, तोंच गाडी चालू झाली त्यांची मला चमत्कार वाटला, माझ्या तोंडून एक शब्दही न निघता उद्याचा हा सारा कार्यक्रम परस्पर ठरून गेला अगदी ! अनिरुद्धाच्या त्या अनपेक्षित भेटीमुळें माझें मन इतकें बावरून गेले होते कीं, ते आल्या क्षणापासून मी

एक प्रकारच्या स्वप्नातच वावरत होते जणु काही! त्याची मोटार गेल्यावर मी परत फिरलें तोच माजघरात उभ्या असलेल्या आईनें मला विचारलें, " कोण होता ग कालिंदीबरोबरचा तो तरुण मुलगा?" " अग, ते तिचे मावसभाऊ-बॅ प्रभाकर " मी तिला म्हणाले त्याबरोबर ती उद्गारली, " किती धिप्पाड न् देखणा आहे नाही ग तो!"

- ✿ -

कालिंदीकडून घरी परत यावयाला बारा वाजले मला घरून निघताना मी निश्चय केला होता अगदी की, कालिंदीने कितीही आग्रह केला तरी सिनेमाला म्हणून जावयाचे नाहीं आज माझा तो हटवादीपणा बघून ती मला अखेर रागाने म्हणाली देखील, " मघाशी मी आल्याबरोबर तुला पाहिल तेव्हाच वाटल मला बाईसाहेब कसल्या तरी मूडमध्ये आहेत म्हणून!—भाई, तू पोंचवून दे रे हिला घरीं जाताना आपल्या मोटारीतून " आणि आम्ही लगेच निघालोही पण मोटार रस्त्यावर येताच तिचा वेग किंचित् मद करून अनिरुद्ध मला म्हणाले, " किती छान चादण पडलय थोड समुद्रावर फिरायला जायला हरकत आहे का तुमची?" त्याच्या त्या अनपेक्षित प्रश्नानें घोटाळून गेलें माझे मन अगदीं अरूची न् माझी ताटातूट झाल्यापासून पोरक्या पोरासारखी झाली होती माझ्या मनाची अवस्था त्या मुलाला जसा कोणाच्याही मायेचा ळळा चटकन लागतो, तसें थोड्याशाही सहानुभूतीनें माझें मन लोभावून जात असे त्या दिवसापासून मी एकदाही धूम्रपान करिताना पाहिले नव्हते अनिरुद्धाना से माझ्या मर्जीला इतके जपतात न् एवढ्या क्षुल्लक गोष्टींत मी त्याचे मन दुखवू का?—मी त्याना म्हणाले, " तशी हरकत नाहीं काही पण उशीर नाहीं होता कामा घरी परत यायला." मोटार अपोलो बदरवर येऊन पोचतांच आम्ही खालीं उतरून बाकावर जाऊन बसलों चद्र या वेळी मध्यावर आलेला होता त्याच्या धूसर चादण्यात सारी सृष्टि गुरफटून, धुरकटून गेल्यासारखी दिसत होती; व त्या बदिस्त समुद्राच्या लाटा, आवरून धरलेल्या भावनांप्रमाणें, जागच्या जागीं उसळून लय पावत होत्या क्वचित् एकाद दुसरा अश्रु जसा त्या भावनाच्या उसळीसरसा डोळ्यातून ठिबकावा, तसे लाटाच्या धडकीसरसे त्याचे विरळ तुषार अगावर येत. पुढें तो जणु काहीं पडल्या जागीं तळमळत असलेला

उदास, क्षुब्ध समुद्र आणि मागें चद्राच्या प्रकाशातही आपले कठोर स्वरूप लपवूं न शकलेल्या काळसर, दगडी इमारती ! माझ्या मनात विचार आला,—माझ्याही आयुष्याची स्थिति अशीच झालेली नाही का ? होऊन गेलेल्या प्रकाराच्या विदारक स्मृति आणि सदोदित आतल्या आत गदमदत असलेले दु.ख !—मनाला कुठे तरी विरगुळा आहे का ? माझ्या शेजारी बसलेले अनिरुद्ध निश्चल दृष्टीनें समोर चाललेले ते लाटाचे निष्फळ ताडव पहात होते मी जवळ बसलेली आहें याचा जणु काही विसरच पडला होता त्याना आणि तेही बरोबरच होते आमच्या हृदयात या वेळी घोळत असलेल्या विचाराचा परस्पराशी काही तरी सबध होता का ? चक्रवाक पक्ष्याच्या जोडप्याला नुसते कमळाचे पान मध्यें आल्यामुळें विरहात रात्रभर तळमळावे लागते, म्हणतात पण, विचाराच्या अनोळखीपणामुळें दोन सहानुभवी मनात उद्भवणारा आडपडदा, एकमेकाच्या जवळ बसूनही त्याना घडणारा एकमेकाचा वियोग हा त्याहीपेक्षा दुर्धर नव्हे का ? चक्रवाकाच्या विरहाला आक्रदनाने वाचा फुटते, एकमेकाचा शब्द तरी एकमेकाच्या कानावर सतत पडत रहातो इथे आम्ही एकमेकाच्या जवळ बसलो होतों; दोघाचींही मनें व्यथित, व्याकुळ झालेली होती पण साधन होते का काही आमचें तें दु ख एकमेकाना समजावयाला ?—तोच ते अर्धवट स्वतःशीच उद्गारले, " हा समुद्र पाहिला म्हणजे बायरनची आठवण होते मला, न् त्याच्याप्रमाण कुठ तरी दूर देशीं जाऊन बेछूटपणान रहावस वाटत ! " त्या दिवशीं त्याची भेट झाल्यापासून मी पहात होते,—मधून मधून विमनस्कतेची लहर येत असे अशी त्याना —माझ्याप्रमाणे याचेही मन आतून भाजून निघालेलें नसेल ना ?—त्याचे ते उद्गार ऐकून मला शका आली आणि, क्षणैक त्याना तसें स्पष्टच विचारून पहावे, असे वाटले मला पण, लगेच माझ्या मनात असा विचार आला कीं, एकाद्याने बेसावधपणानें म्हणा अगर विश्वस्तपणानें म्हणा, आपल्या हृदयाचे दार किलकिले केले, म्हणून आपण काय त्यात डोकावून का पहावयाचे आहे ? आणि मी नुसते एवढेच म्हटले, " चादण्यात बसल्यान वास्तविक प्रसन्न व्हायला हव आपल मन पण आज का चमत्कारिक वाटतय कुणाला ठाऊक !" त्याबरोबर ते किंचित् आवेशाने इग्रजींत म्हणाले, " मला नाहीं आश्चर्य वाटत याबद्दल सृष्टीन कितीही रम्य रूप धारण केल, तरी तें

पाहून आपल्याला आनद वाटण, हें आपल्या स्वतःच्या मन·स्थितीवरच नाही का अखेर अवलबून ? दुःखी माणसाला सारंच जग दुःखान काळवडून गेल्या-सारख दिसत " मला कळेना, कोणत्या दुःखानें याचे मन इतके बेचैन झालें आहे ? माझ्याप्रमाणें याच्यावरही प्रेमभगाचा प्रसग आला नसेल ना ?—ती कल्पना मनात येतांच मला अत्यत सहानुभूति, एक प्रकारची आत्मीयता वाटली त्याच्याबद्दल त्यानतर बराच वेळ आम्ही बोलत बसलों होतों त्यानी इग्लडा-तील आपल्या अनुभवाच्या अनेक गमतीदार गोष्टी सागितल्या मला चादणें सारें लोपून जाऊन पावसाचे थेंब अगावर येऊ लागल्यावर आम्ही नाइलाजानें उठलो, व त्यानी मला घरापर्यत पोंचविली मी मोटारीतून खाली उतरत असता ते मला हळूच म्हणाले, "आता पुन्हा केव्हा भेट होईल आपली ? आज तुमच्या सहवासांत फार मजेंत गेला वेळ माझा !" त्याच्या त्या प्रश्नाला मी काहींच उत्तर दिलें नाहीं त्याच्याकडे एकवार बघून नुसती हसलें मात्र पण त्या अधारातही आमची दृष्टि क्षणैक एकमेकात मिसळल्याचा भास झाला मला मी वर येऊन अथरुणावर पडलें परंतु, मला सारखें वाटे, त्याचे ते तेजस्वी डोळे माझ्याकडे बघत आहेत, माझ्या हृदयाचा ठाव घेत आहेत आमच्या ओळखीला अद्याप पुरते आठही दिवस झाले नव्हते गेल्या रविवारीं याच वेळीं थिएटरातून बाहेर पडताना,—त्या प्रसगाची आठवण होतांच रोमांच उठले माझ्या अगावर ! देवा, कशाला आता हा मोह पुन्हा ?



अरूचें तें पत्र मी किती तरी वेळा वाचलें असेल मनूला मदत करण्याबद्दल मी त्याला चार ओळींचें कार्ड खरडलें होते पण त्यानें केवढें लाबलचक उत्तर घातलें त्याला ! कापऱ्या हातानें लिहिलेलीं तीं वाकडीं वाकडीं अक्षरें न् जागो-जाग आसवानीं पसरलेली ती शाई,—त्यानें लिहिलेलें खरेंच होतें तें सारें पण, माझ्यावर जर त्याचें खरोखरीच इतके प्रेम होते, तर मग त्यानें लग्न करण्याचें कां नाकारलें ? मला आठवण झाली एकदम मनूच्या त्या बोलण्याची मग आताच त्याला पत्र घालून विचारू का ? पण नको दिवाळींत तो आला म्हणजे समक्षच बोलता येतील साऱ्या गोष्टी आणि मी तें पत्र माझ्या पोलक्याच्या खिशांत घालून चहा घेण्यासाठीं खालीं आलें मला बघितल्याबरोबर आई

म्हणाली, " अग, ही कालिंदीची चिठ्ठी आली आहे तुला जेवणाच आमत्रण असेल बहुतेक दारात मोटार उभीच आहे तुझ्यासाठी " " किती वेळ झाला ग मोटार येऊन ? " मी ते पत्र तिच्या हातातून घेऊन वाचता वाचता विचारलें, व झटकन त्याच्यावर नजर टाकली त्यात जेवणाचे आमत्रण होतेच नेहमी-प्रमाणे पण त्याबरोबरच असेही लिहिले होते तिने की, " तू जर आज आली नाहीस तर भाईचा फार हिरमोड होईल बर का अनू ! गेल्या सबध पधरवड्यात तो सिनेमाला गेलेला नाही आज त्याने मुद्दाम सिनेमाचा कार्यक्रम ठरवून तुला बोलवायला सागितल आहे मला माझी परवा नाहीच तुला फारशी पण निदान त्याच्यासाठी तरी तू आलच पाहिजेस आज ! " मला ते शेवटचे वाक्य वाचून कसेसेच वाटले अगदी कालिदीने माझे मनोगत ओळखून तर ते वाक्य लिहि-लेलें नाही ना ? अनिरुद्धाकडे माझें मन ओढ घेत होते, ही गोष्ट खरी पण, माझ्या मनातली ती त्याच्याविषयीची भावना काय इतकी उघड होती की, ती आपण ओळखली असल्याची जाणीव कालिंदीने मला अशा रीतीनें द्यावी ? त्याबरोबर मला असे वाटले की, मी आज येऊ शकत नाही असें लिहून तिचा हा समज दूर करावा पण तिच्या बोलावण्याला मी नकार दिल्यामुळें अनिरुद्धाची निराशा होईल, त्याची वाट काय ? त्याची निराशा करण्याचा मला हक्क आहे का ? माझ्या वठलेल्या जीवनाला जी थोडी टवटवी गेल्या पधरा वीस दिवसात पुन्हा आली, ती त्याच्याचमुळें नव्हे का ?—छ, छे, त्याचा हिरमोड करणें कृतघ्नपणाचे होईल पण तो सिनेमा मात्र कसेही करून टाळलाच पाहिजे त्या दिवशी रात्री तो प्रसग घडल्यापासून सिनेमाची एक प्रकारची दहशतच घेतली होती जशी काहीं माझ्या मनानें वास्तविक त्या प्रसगाचा आणि सिनेमाचा तसा अर्थाअर्थी काय सबध होता ? व त्या प्रसगात तरी असे विशेष काय होते ? त्याच्या बोटाचा स्पर्श माझ्या मानेला झाला, अगदीं सहजगत्या झाला, यात मनाला एवढे लावून घेण्यासारखे काय होते ?—होय पण स्पर्शा-स्पर्शांत सुद्धा फरक नसतो का ? कुशल अगुलींचा वाद्याला होणारा स्पर्श, प्रभातवायूचा कळ्याना होणारा स्पर्श, सूर्याच्या प्रभेचा मेघाना होणारा स्पर्श आणि नवजात शिशूचा मातेला होणारा स्पर्श !—जगातले सारें सगीत, सारा सुवास, सारें सौंदर्य आणि सारी वत्सलता त्या स्पर्शांतूनच निर्माण होत नाहीं

का ? अनिरुद्धाचा न कळत घडलेला तो स्पर्श—तो घडावा अशी त्याना इच्छा नव्हती, मलाही इच्छा नव्हती !—पण एकादी गोष्ट अभावितपणें घडली, म्हणून ती परिणाम केल्याशिवाय थोडीच रहाते ? प्रखर उन्हाच्या तापाने म्लान झालेल्या कळीला चद्राच्या किरणानीं हळूच स्पर्श करावा आणि तिच्या कोमेजलेल्या पाकळ्यानी हसत हसत उमलावयाला सुरवात करावी,—त्याच्या त्या स्पर्शानें तशीच नव्हती का झाली माझी स्थिति ?—नको, नको तसा प्रकार पुन्हा कोणत्याही निमित्ताने घडता कामा नये म्हणूनच नाही सिनेमाला जावयाचे —मी निश्चय केला अगदी आणि चहा घेतल्यावर घाईघाईनें कपडे बदलून मोटारीत येऊन बसलें मोटार चालू झाल्यावर मी पोलक्याच्या खिशातून अरूचे तें पत्र काढलें, व त्यातला तो भाग पुन्हा एकदा वाचला—अरू, अरू, माझा अरुण ! त्याचे जर माझ्यावर इतके प्रेम आहे, तर केव्हा तरी तो माझा होईल, खात्रीनें माझा होईल कसली धडधड, कोणत्या विरोधी भावनाची धडपड चाललेली आहे ही माझ्या मनात ?—डोळ्यात अश्रु येताहेतसे वाटलें मला इतक्यात मोटार कालिंदीच्या घरासमोर येऊन उभी राहिली, व मी झटकन तें पत्र खिशात कोंबले दार उघडून मी आत आलें तो ती तिघे पत्ते खेळत असलेली मला दिसली मला पहाताच हातातले पत्ते ठेवून कालिंदी धांवतच मजजवळ येऊन म्हणाली, “खूप आनदात दिसताहेत बाईसाहेब आज !—मग काहीं सिनेमा बुडण्याची वास्ती नाही बर का आज भाई !” आणि मीही त्याच्या खेळात सामील झाले खेळताना किवा नतर जेवतानाही अनिरुद्ध काहीं फारसे बोलले नाहीत मला एकसारखे वाटे, याच्यात आज काही तरी फरक झाला आहे नाही तर बोलण्याचा, हसण्याचा न् वाद घालण्याचा सारा मक्ता त्याच्याकडे असावयाचा—वाळूत रुतून बसलेली होडी जशी खेळकर लाटानीं हलवून समुद्राकडे ओढून न्यावी, तसे सकोचात गुरफटून बसलेलें माझें मन स्वत च्या चतुर भाषणानें बोलके करून ते आपल्याकडे आकर्षून घेत असत—पण आज ते मुग्ध होते मला वाटले, याना विमनस्कतेची तर लहर नाहीं ना आलेली आज ? आम्ही जेवावयाला बसल्यावर कालिंदी हसत हसत मला म्हणाली, “मला वाटल नव्हत अनू तू इतकी पराक्रमी असशील म्हणून ?” “कसला केला ग मी पराक्रम ?” मी तिला विस्मयाने विचारलें “अग, भाईन आतांशा

नेहमीच जेवण सोडून दिल आहे अगदी. नाही तर पूर्वी एक वेळ जरी तें नसल, तरी चालत नसे त्याच मुळीच ! तूच साग,—त्याच्यात झालेल्या या फरकाच श्रेय मी कुणाला देऊ ?"—तिचे ते उद्गार ऐकताच मला अतिशय लाजल्यासारखे झाले, व पानावरून उठून जाऊन कुठे तरी लपून बसावेसे वाटले मला. पण तितक्यात अनिरुद्ध म्हणाले, "ताई, तू उगाच विपर्यास करते आहेस ह्या सारा माझ्या वागण्याचा तुला माहीत नाहीं, मी इग्लडात असताना सुद्धा काही दिवस वर्ज केला होता मासाहार पण तत्त्वत मी त्याच आहाराच्या बाजूचा आहे बर का ! अनुभव घेऊन ठाम बनलेलीं मत युक्तिवादान का कुठ बदलत असतात कधी ?" त्याच्या त्या बोलण्याने मला धीर येऊन मी वर पाहिले तोंच आमची दृष्टभेट होऊन त्याचे डोळे निराळीच भाषा बोलत आहेत, असा भास झाला मला !



सिनेमाच्या बाबतीत त्याना नकार देताना किती जिवावर आले होतें माझ्या ! पण मी त्याना सागितलेलें कारण मात्र पटण्यासारखें होते अगदी. जेवण झाल्याबरोबर कालिंदीने तो विषय काढताच मी तिला म्हणाले, "आनदान आले असते मी तुमच्याबरोबर सिनेमाला पण मग की नाही साऱ्या रात्रभर डोक दुखत रहात माझ आजारातून उठल्यापासून कोणत्याच प्रकारचा ताण सहन होत नाही माझ्या डोळ्याना अलिकडे " "अस ? मला माहित नव्हत हे मग राहू द्या आपला सिनेमाचा कार्यक्रम ताई ! थोडा वेळ पत्ते खेळू न् मग पोचवून देईन मी घरी याना माझ्या मोटारीतून " आणि आम्ही बिझिक खेळावयाला बसलो खेळताना ते अशा विमनस्कतेनें वागत होते कीं, आज त्याच्या मनात काही तरी विलक्षण खळबळ चालली आहे, त्याच्या वृत्तींत काही तरी चलबिचल झाली आहे, असे वाटले मला माझ्या मनात शका आली, मी त्याच्या सिनेमाला जाण्याच्या बेताला मोडता घातला, म्हणून तर ते उदास झाले नसतील ना ? तोच ते हातातले पत्ते खाली टाकून कालिंदीला म्हणाले, " आज खेळात मन लागत नाही ताई माझ मुळींच —चला जाऊ या आपण " त्याबरोबर कालिंदी माझ्याकडे बघून म्हणाली, " पाहिलस, तू सिने-माला जायच नाकारलस म्हणून मूड आला लगेच त्याला ! " " नाही ग, तस

नव्हे इतका का मी सिनेमाचा शोकी आहें? आज दुपारपासूनच माझं मन स्वस्थ नाही —मग निघायच ना आपण?"—त्यानी माझ्याकडे पाहिल्याबरोबर मी लगेच उठलें मोटार सुरू होताच माझ्या हृदयाचीही धडधड सुरू झाली माझी खात्री होती ते फिरावयाला जाण्याचा प्रश्न काढतील म्हणून, व त्यांच्या दृष्टीत आज अशी काही आकर्षकता उत्पन्न झाली होती की, ती पाहून त्याच्या-बरोबर फिरावयाला जाऊ नये, असे वाटत होते मला सारखें पण अर्ध्याच तासापूर्वी मी एका बाबतीत नकार देऊन त्याचे मन नाराज केले नव्हतें का? हे विचार माझ्या मनात येत आहेत, तोंच मोटारीचा वेग कमी करून ते मला म्हणाले, "समुद्रावर फिरायला जाण्यान तर त्रास नाही ना होणार तुम्हाला? आता दहा वाजले आहेत आपण तास सवा तासात परत येऊ हरकत आहे का तुमची? मला जरा बर वाटत नाहीं म्हणून म्हणतों" त्याच्या त्या शब्दात इतकी आर्तता भरली होती की, त्याचे ते शेवटचे वाक्य पुरें होण्यापूर्वीच मी उद्गारलें, "फिरायला जायला काहींच हरकत नाहीं माझी" अपोलो बदरावर आल्यावर आम्ही मोटारीतून खाली उतरून बाकावर बसलों चद्र अद्याप चागला वर आलेला नव्हता समुद्राच्या काहीं भागावर त्याचें खिन्न चादणें पडले होतें, व काहीं भाग अधारातच सुस्तपणानें हेलावत होता आशा आणि सशय यानीं व्यापल्यामुळें दोलाचल स्थितीत असलेल्या क्षुब्ध मनाची अवस्था अशीच नसते का? धक्क्यावर आदळून परत फिरणाऱ्या समुद्राच्या लाटाचा तो थडथड आवाज—निराश हृदयाचे आक्रदनच वाटलें ते मला एक प्रकारचें भूमीच्या आलिंगनासाठी आतुर झालेला हा सागर,—याची युगानुयुगें अशी सारखी धडपड चालली आहे पण त्याला रेंसभर तरी तिने कधीं आपल्याजवळ येऊ दिला आहे का? परंतु तिची स्वत ची तरी काय दशा आहे? सूर्याभोंवतीं तिचे परिभ्रमण सारखें चालू आहे पण आपले सोनेरी करजाल तिच्या अगावर दुरून फेंक-ण्यापलीकडे त्याने कधीं तरी तिला अधिक दया दाखविली आहे का? जगात जिकडे पहावे तिकडे आकर्षणाचा असा उरफाटा खेळ दृष्टीस पडतो सारी सृष्टि आकर्षणाच्या तत्वावर अधिष्ठित झालेली आहे, तिच्या साऱ्या व्यवहारात आकर्षणाचे स्वर्गीय सूत्र अनुस्यूत झालेलें आहे, असें आपण म्हणतों. पण त्या आकर्षणाला मर्यादा तरी किती आहेत! त्या मर्यादा जर वस्तुजातानें कळत

न कळत ओलांडल्या, तर लगेच विनाश, अगदीं चक्काचूर आकर्षण ही जर खरोखरीच दिव्य शक्ति आहे, त्या शक्तीच्या प्रभावानेंच जर स्थिरचराचे सारे व्यवहार सुरळित चालतात असे आपण मानतों, तर मग तिला इतक्या मर्यादात डाबून ठेवण्याचे काय कारण? मनुष्याने शोधून काढलेल्या इतर शक्ति या ज्याप्रमाणे कह्यांत न ठेवता स्वैर सोडल्या असता विध्वस करितात, तसेंच या दैवी म्हणून मानलेल्या आकर्षणाच्याही शक्तीचे आहे का? त्या शक्ति जशा अजाण, आधळ्या आहेत, तशीच ही शक्तीही आहे का? ती शक्ति जर डोळस, प्रबुद्ध असती, तर तिला इतक्या बधनानीं जखडण्याची काय गरज होती? आकर्षणाने वस्तुजात एकमेकाकडे ओढले जात असतील, परस्पराशी सबद्ध होत असतील पण त्याच्या त्या सबधाला शाश्वती, सौंदर्य आणि शुचिता कशामुळे येते? सयमाने, त्या आकर्षणाला विवेकाचें बंधन घातल्यानें —" आज बोलत का नाही तुम्ही? मी तुमच्या इच्छेविरुद्ध तर तुम्हाला फिरायला नाही ना आणल?" अनिरुद्धानीं मध्येच विचारलें त्याच्या त्या प्रश्नानें माझ्या मनात उद्भवलेल्या या विचाराची सांखळी एकदम तुटली; व काही तरी उत्तर द्यावयाचे म्हणून मी सहज म्हटले, " मघाशीं आपली गप्प बसण्याची पाळी होती, आता माझी आहे " तेव्हा ते किंचित् गभीर होऊन म्हणाले, " मला काही तरी तुम्हाला विचारावस वाटत आहे आज एकसारख न् ते बोलू देत नाही मला दुसर काही " " मग मघाशींच का नाहीं विचारलत आपण?" मी म्हटले " इतका सोपा नाहीं तो प्रश्न —आपल्या परिचयाला अद्याप पुरता एक महिनाही झालेला नसल्यामुळें तो विचारण कितीस प्रशस्त होईल याबद्दल शका वाटली मला " त्यानी उत्तर दिलें " पण परिचयाला दृढता यायला मुदत लागत असते का काही? पुष्कळदा केवळ पहिल्याच दृष्टभेटीत माणसाची मन जुळून जातात अस नाहीं का पहात आपण?" माझ्या तोंडून चटकन निघून गेलें हे वाक्य " होय.—आणि म्हणून तर मला तो प्रश्न विचारण्याच धैर्य करावस वाटत आहे," ते उद्गारले, व क्षणभरानें माझ्याकडे वळून त्यानी मला इग्रजीत विचारले, " माझ्या प्रेमाचा स्वीकार करणें आवडेल का तुम्हांला?" त्याचा तो प्रश्न ऐकताच मी दचकून गेलें अगदीं मला हा प्रसग अगदीच अनपेक्षित नव्हता, ही गोष्ट खरी पण,

आज, या क्षणी अशा तऱ्हेनें तो प्रश्न ते विचारतील, अशी मात्र मुळीच कल्पना नव्हती मला त्यामुळें मी अगदी गागरून गेलें, व मला काय बोलावे हें सुचेना थोडा वेळ माझ्या बोलण्याची वाट पाहून ते म्हणाले, " तुम्ही बोलत का नाही ? तुमच्या उत्तरावर माझ सर्व सुख, माझं सर्व जीवन अवलबून आहे जातीचा प्रश्न तर आड येत नाही ना माझ्या सुखाच्या ? " " नाहीं, नाहीं तशा कोणत्याच गोष्टीची परवा करणारी मी नाहीं " मी किंचित् आवेशानें उद्गारलें त्या आवेशाच्या भरात आतापर्यंत माडीवर विस्मयामुळें निश्चेष्ट पडून असलेले हात मी वर उचलून छातीजवळ नेले त्याबरोबर पोलक्याच्या खिशात असलेले ते पत्र हाताला लागून माझ्या साऱ्या शरीरात एकदम दु खावेगाची चमक उठली तोच त्यानी मला विचारले, " तुम्ही दुसऱ्या कुणाच्या वचनात तर नाही ना गुतलेला ? " तो प्रश्न विचारताना त्याचा आवाज इतका कातर झाला होता, ओठ इतके थरथरत होते आणि त्या विस्फारित नेत्रात इतकी सभय उत्कठा एकवटलेली होती !—चद्राच्या मद प्रकाशात माझ्याकडे उत्सुकतेने, एकाग्रतेने पहाणारी त्याची ती प्रणयकपित मूर्ति बघून माझ्या शरीराला कप सुटला, दु खाने माझें हृदय भरून आलें, व इतका वेळ त्या पत्रावर ठेवलेल्या हातानी स्वत चे तोंड झाकून घेऊन मी इग्रजीत उद्गारलें, " तस काही नाही.—मला विचार करायला वेळ द्या —पण नाही, नाहीं —क्षमा करा मला ती गोष्ट शक्य नाही अशक्य, अशक्य ! " आणि एकाएकी हुदका आला मला.

- ❦ -

मला एकसारखी भीति वाटत होती ते माझ्याशी कसे वागतात याबद्दल पण त्या दिवशी आमची भेट झाल्यावर ते इतक्या मोकळेपणाने माझ्याशी बोलले कीं, त्याच्याविषयी अनुदारतेने विचार केल्याबद्दल माझी मलाच लाज वाटली मागाहून त्याच्या त्या प्रश्नाला मी ' नाही ' असें उत्तर दिल्यावर त्यानीं क्षणार्ध थाबून टाकलेला तो उसासा—उसासा कसला, हुदकाच तो !—तो कानावर पडताच करपून गेले माझें मन अगदीं कोरड्या ढगावर जशी वीज चमकावी, तशी माझ्याकडे करुण दृष्टीने पहाणाऱ्या त्याच्या डोळ्यातली ती निराश प्रेमाची लकाकी !—मला वाटले, यापेक्षा एकादा अश्रु जरी त्यांच्या

डोळ्यातून पडला तरी बरे होईल काय केलें मी हें ? त्याच्याकडे माझें मन ओढ घेत नव्हते का ? त्याच्याविषयी विचार करण्यांत मी अथरुणावर तळमळत रात्री घालविल्या नव्हत्या का ? प्रेमाच्या बाबतीत मनोभग झाल्यानें किती दारुण वेदना मनाला होतात याची मला कल्पना नव्हती का ? मग का दिलें मी हे उत्तर त्याना ? मी पुन्हा ते खिशातले पत्र चाचपले तिथेच होतें ते त्याच्याविषयी मला आकर्षण वाटत होते खरे, पण अरू, माझा अरुण ! माझें हृदय मी त्याला देऊन टाकलेले होते तो कधी तरी माझा होईल, ही आशा सुटली नव्हती अद्याप मी नकार दिल्यामुळे अनिरुद्धाना जितके दु ख झालें असेल, त्याहीपेक्षा जास्त दु ख नकार दिल्याबद्दल मला झालें, व माझ्या डोळ्यातून सारखी आसवे गळत होतीं मोटारीत बसताना मी त्याना इग्रजींत म्हणाले, “ क्षमा करा मला मी तुमच्या योग्यतेची नाही मुळींच ! ” तेव्हा ते फक्त एवढेच उद्गारले, “ क्षमा करण्यासारख काय आहे इतक त्यात ? आयुष्यात यायचेच असे प्रसग ! ” आणि त्यानी पुन्हा एक उसासा टाकला जळत असलेल्या वस्तूवर पाणी शिंपडताच भपकन वाफारा अगावर यावा, तशी माझी झाली स्थिति तो सुस्कारा ऐकून ! “ मी काय केले हें ?”—पुनः पुन्हा माझें मन विचारित होते मला त्यानी क्षणभर मोटार थाबवून जर माझ्याकडे लक्ष दिले असते, तर त्या प्रश्नागणिक होणारी माझ्या हृदयाची धडधड त्याना ऐकू गेली असती, व त्या दु.खाच्या प्रसगातही त्याना थोडासा विरंगुळा वाटला असता पण ते इतक्या बेछूटपणाने मोटार हाकीत होते,—माझें शापित सान्निध्य असह्य झालें होते त्याना जसें काहीं ! आमच्या दाराशीं मोटार येऊन उभी रहाताच त्यानी मुकाट्याने दार उघडले, व मी खाली उतरले पण माझे पाऊल पुढे पडेना की माझ्या तोडून शब्द बाहेर निघेना शेवटी तेच मला म्हणाले, “ जाऊ ना मी आता ?—good night ”—पण, त्या दुर्धर प्रसगानतर आठ दिवसानी जेव्हा मी कालिंदीकडे आपण होऊन गेलें, त्या वेळी किती आनदात असलेले दिसले ते मला त्याचा तो उल्हास पाहून मला वाटलें, जखम करणाऱ्याच्या हृदयाला करुणेने क्षत पडावे न् जखम झालेल्याच्या हृदयावर मात्र तिचा वणही दिसू नये !—किती कठोर असतात पुरुष ! स्त्रियानी प्रेमाचे एवढे स्तोम माजवावे आणि पुरुषानी ती

केवळ करमणुकीची चीज मानावी! मला पहातांच ते हसत हसत इंग्रजींत म्हणाले, "काय बिझिक खेळायला बसता का?" खोलीतील वातावरण सिगारेटच्या विशिष्ट गधाने कुद होऊन गेले होतें पण, मी बघितले, एकटे अरविंदच धूम्रपान करित होते, न् मला धीर आला थोडासा टेबलाजवळच्या खुर्चीवर बसत मी त्याना म्हणाले, "घरी करमेना म्हणून खेळायलाच तर आले आहे मी मुद्दाम आज!" त्याबरोबर कालिंदी म्हणाली, "मोठा अनुग्रहच झाला म्हणायचा आमच्यावर हा पडिताबाईचा! मी ठरवून टाकल होत किती दिवस तू येत नाहीस हे पहायच या वेळीं!" "मग मी आले की नाहीं तुझ्या बोलावण्याशिवाय अखेर!" मी हसून म्हणालें आणि त्याचा सुरू असलेला डाव सपताच लगेच आम्ही बिझिक खेळावयाला बसलो खेळताना अनिरुद्धानी विलायतेतल्या नाना प्रकारच्या गमती सागितल्या, व आम्हाला मनसोक्त हसविलें त्याचा तो आजचा उल्हास बघून मला पुन पुन्हा वाटे, याची ही वृत्ति स्वाभाविक आहे का? की स्वत चे दु ख लपविण्यासाठी याची ही सारी धडपड चालली आहे? पण, ते इतके सारखे बोलत न् हसत होते ना, तरीसुद्धा त्याच्या डोळ्यात, विशेषत आमची दृष्टभेट झाल्यावर, विषादाची छटा क्षणार्धात उमटून जात असे दिवेलागणीच्या सुमारास मी जावयाला उठलें त्याबरोबर कालिंदी मला म्हणाली, "उठलीस का ग? तुला वाटत मी आज जेवल्याशिवाय तुला इथून सोडीन अस? आज तुमची ओळख झाल्याला बरोबर महिना होतो नाही रे भाई? मग त्या दिवशी आपण ज्या गोष्टी केल्या, त्या साऱ्या आजही करायच्या बरं का अनू! वाढदिवस आहे आज तुमच्या ओळखीचा आम्ही सुद्धा आमच्या ओळखीचा वाढदिवस पाळीत असतों" "अग पण ताई, वाढदिवस वर्षान पाळीत असतात ना? आमच्या ओळखीला वर्ष तरी होऊ दे नीटपणी पुर!—महिन्याचा कसला आला आहे वाढदिवस?" अनिरुद्ध म्हणाले तीं वाक्ये उच्चारताना त्याच्या आवाजात उत्पन्न झालेल्या कपानें माझें हृदय कपित केलें "तुला कळत नाहीं यांतल काही भाई! विलायतेहून जाऊन आल्यापासून तुला विसर पडला आहे इथल्या साऱ्या गोष्टींचा तू फार तर कुणाच्या वाढदिवसाला कोणत्या केक्स पाठवाव्यात याच शास्त्र सागू शकशील—लहान मुलांचा वाढदिवस आपण

पहिल्या वर्षी प्रत्येक महिन्याला हौसेन नाही का साजरा करित, तसंच हें! ओळख नवी असते न् ती वाढवावी अशी जोंपर्यंत दोन्ही बाजूना उत्सुकता असते, तोंपर्यंतच वाढदिवस करण्यात गमत!” ती हसून म्हणाली “मग तुमची ओळख जुनी नाही झाली वाटत अजून?” मी विचारले “थोडीशी जुनी झाली आहे, म्हणून तर वर्षान करतों आम्ही वाढदिवस तिचा पण आमची ओळख न् आयुष्य याच्यातला ताजेपणा कधीच नाहीसा व्हायचा नाहीं कस्तुरीसारख आहे आमच प्रेम अनू! तें कितीही जुन झाल, तरी त्याचा ताजेपणा म्हणून कमी नाही व्हायचा कधी शिवाय, दोन माणसापैकीं एक माणूस अबोल असल की नाही, म्हणजे त्याच्या स्वभावाची काहीं ना काहीं नवी छटा कळत रहाते न् ओळखीतल नावीन्य नेहमी कायम रहात,” ती अरविंदाकडे पहात हसत हसत उद्गारली त्याबरोबर तोंडातली सिगारेट बाहेर काढून तिच्याकडे अत्यत प्रेमाने बधत ते हसून म्हणाले, “पण मी अबोल राहिलों आहें कुठे आता पूर्वीसारखा! मुक्याला वाचाळ करणारी तू देवता आहेस ना मला बोलकी करायला!” त्या वेळी त्या दोघाच्या दृष्टिमीलनात व्यक्त झालेले प्रेम!—ते बघून मला वाटले, अशा तऱ्हेचें प्रणयजीवन आपल्याला कधी तरी लाभेल का?



वाढदिवस! कालिंदीनें अक्षरशः खरा करून दाखविला आपला शब्द जेवण चाललेलें असतानाच तिने सिनेमाला जाण्याच्या गोष्टी काढल्या त्याबरोबर अनिरुद्ध तिला म्हणाले, “आताशा माझ मन मुळीच रमत नाहीं सिनेमात. त्यापेक्षा आपण थोडा वेळ पत्ते खेळू वाटल्यास जेवल्यानतर न् मग सारेच जण फिरायला जाऊ समुद्रावर” त्याची ती साऱ्यानी मिळून फिरावयाला जाण्याची कल्पना,—माझा सकोच घालविण्यासाठीं तर त्यानी काढली नाहीं ना ती? मी लगेच कालिंदीला म्हटलें, “माझी तयारी आहे आज सिनेमाला जायची महिन्यातून एकादे वेळी गेल्यान काही त्रास नाहीं व्हायचा मला फारसा” माझें तें बोलणें ऐकून त्याच्या भुवया किंचित् चढल्याचा भास झाला मला, व त्यांनीं अर्थपूर्ण दृष्टीनें माझ्याकडे पाहिले जणु ते डोळे मला विचारितच होते, आज तुझ्या मनांत आहे तरी काय? आणि खरोखरी तसा प्रश्न विचारण्या-

सारखीच माझ्या मनाची स्थिति या वेळी झाली होती त्याच्याविषयीं आपल्याला वाटणारें आकर्षण किती प्रबळ आहे, हे आता कळून चुकलें होतें मला पण अरू जर मला हवा असेल, तर त्याच्याविषयीचा हा मोह सोडावयाला नको का ? आकाशात सूर्य न् चद्र कदाचित् एकाच वेळी तळपत रहातील पण स्त्रीच्या जीवनात दोघा प्रेमिकाना एकाच वेळी थारा मिळणें,—अशक्य, सर्वथैव अशक्य आहे ती गोष्ट प्रेम म्हणजे त्यागाचे मोल देऊन आवडत्या माणसावर मिळविलेली मालकी ती मालकी अबाधित रहावी म्हणून प्रेमी जन एकमेकासाठी वाटेल तो स्वार्थत्याग करितील परतु आपल्या सुखात किंवा प्रेमात तिसरा वाटेकरी झालेला मात्र त्याना कधीही सहन होणार नाहीं पण, अनिरुद्धाचा मोह तोडावयाचा म्हणजे त्याच्याशीं स्नेहबुद्धोने सुद्धा वागावयाचे नाहीं का ?—ते खिडकीतून बाहेर पहात विमनस्कतेने घालीत असलेली शीळ माझ्या कानावर पडली तिच्या त्या नि शब्द पण करुण सुरानी मघाचच्या त्यांच्या त्या दृष्टिक्षेपाने चाळविलेलें माझें चित्त अधिकच विचलित केले मला आठवण झाली, आमच्या ओळखीच्या त्या पहिल्या दिवशी त्याच्या धूम्रपानाला कटाळून मी अशीच खिडकीजवळ जाऊन उभी राहिले असता, किती प्रेमाने माझ्याजवळ येऊन माझी समजूत घालण्याचा प्रयत्न केला होता त्यानी ! पण, मला त्याच्याजवळ जाऊन उभें रहावे असे मनातून आता कितीही वाटत असले, तरी तें शक्य आहे का ? त्याच्या हृदयाला केलेली ती जखम—तिची जळजळ तुमच्याइतकीच माझ्याही हृदयाला जाणवत आहे, हें कशा रीतीनें सागू मी त्याना ? “ काय रे भाई, कोणत्या पिक्चरला जायच मग ?” कालिंदीने त्याना विचारलेला तो प्रश्न ऐकून मी जागी झाले त्या विचाराच्या तद्रींतून “ आज एम्पायरमध्ये चागले पिक्चर आहे तिथेंच जाऊ या आपण, ” ते म्हणाले त्यानी बॉक्सचीं तिकिटे काढलीं व आम्ही आत जाऊन बसलों पण, समोरच्या पडद्यावर झपाट्यानें येऊन जाणाऱ्या चलत्चित्राकडे जरी मी बघत होतें, तरी माझ्या अतर्दृष्टीपुढून मात्र निराळींच दृश्ये झरझरा येऊन जात होतीं. धावत्या चित्राच्या दीप्तीनें उजळलेल्या त्या अधारात माझ्या जीवनात उत्पन्न झालेले विरोधी प्रवाह आणि त्यात पडलेली स्वतःच्या भावनाचीं प्रतिबिंबें न्याहाळून बघत होते मी. अर्धा चित्रपट पुरा झाल्यावर एकदम दिवे लागताच

डोळे दिपावल्यासारखे होऊन त्यावर मी हात ठेवला त्या बरोबर त्यांनीं मला विचारले, "त्रास होतो आहे का फार तुमच्या डोळ्याना ? मी पोंचवून देतो वाटल्यास तुम्हाला घरी " "तस काही नाही दिवे एकदम लागल्यान थोड फिरल्यासारख वाटल मला क्षणभर एवढच, " मी म्हणालें आणि आम्ही बाहेर आलों तिथे पेयें घेत असता कालिंदीनें मला विचारलें, "कसा काय वाटला ग शो तुला ? भाईची निवड नेहमीच छान असते नाहीं का ?" मी पाहिले, त्याची दृष्टि माझ्याकडे लागलेली होती, व विचाराच्या भरात अर्धवट बघितलेल्या त्या चित्रपटाविषयी काय बोलावे, हे सुचेना मला तोच अरविंद इग्रजीत म्हणाले, "ती नायिका अगदीच रुक्ष ( Frigid ) वाटली मला इतक्या गुणी न् मोहक तरुणाची प्रेमयाचना कोणत्या समजस तरुणीन झिडकारली असती ? प्रेक्षकाच्या मनाला क्षुब्ध करण्यासाठी मुद्दाम कृत्रिम प्रसग निर्माण करतात या चित्रपटातून !" "कृत्रिम कसले ? प्रत्यक्ष व्यवहारात सुद्धा बघत नाही का असले प्रेमभगाचे प्रसग आपण ? तुम्ही ताईवरून केलेली दिसते आहे जगांतल्या साऱ्या प्रणयिनीची कल्पना ! पण सगळेच तरुण काही प्रेमाच्या बाबतीत तुमच्यासारखे दैववान् नसतात" अनिरुद्ध हसून म्हणाले पण त्या हसण्यात उपरोधाचा ध्वनि उमटल्याचा भास झाला मला, व माझें मन अधिकच सत्रस्त झाले मला शका आली, यानी मुद्दामच तर या चित्रपटाची निवड केली नाही ना ? पण पुन्हा लगेच मनात आलें, ते इतक्या प्रेमानें माझ्याशी वागत असता त्याच्याविषयी असा अनुदारपणानें विचार करणें शोभते का मला ? चित्रपट सुरू झाल्यावरही माझ्या मनात सारखे हेच विचार घोळत होते —त्याना नकार दिल्याबद्दल मला किती वाईट वाटत आहे याची कल्पना मी त्याना कशा रीतीने आणून देऊ ?—विचाराच्या या वेदनानी मन सारखें तळमळत असतानाच शो सपला, व कालिंदीच्या बरोबर मी मुकाट्यानें मोटारीत येऊन बसले माझी ती विमनस्कता पाहून ती म्हणाली, "का ग डोक दुखतय का अनू तुझ ? निघताना किती मजेंत होतीस तू ! भाई, तुझी निवड पसत नाहीं पडलेली दिसत हिला फारशी !" "भलतच काहीं तरी ! छान होता शो पण माझे डोळे कीं नाहीं दुखताहेत मघाचपासून थोडेसे." हें उत्तर मी तिला देत आहें, तोंच मोटार त्याच्या बिऱ्हाडाजवळ

येऊन तीं दोघे खालीं उतरलीं, व कालिंदीनें जाता जाता हंसून अनिरुद्धांना म्हटलें, " नीट पोंचवून दे बरं का रे माझ्या मैत्रिणीला तुलासुद्धा मूड आलेला दिसतोय थोडासा एक जात आहे तुमची दोघाची अगदीं ! " मोटार सुरू झाल्यावर त्यानीं मला हळूच इग्रजीत म्हटले, " शो आवडला नाही का तुम्हाला आजचा ? माफ करा ह मला—!" बोलता बोलता मोटारीचा वेग त्यानीं मद केल्यासारखा वाटला मला " तुम्हीच माफ केल पाहिजे मला किती मन दुखवल मी तुमच त्या दिवशी ! "—पण पुढचे अगदीं ओठावर आलेलेही सहानुभूतीचे शब्द बाहेर पडेनात, व माझे हृदय भरून आलें तोंच ते किंचित् घुटमळून म्हणाले, " क्षमा करण्यासारख काय आहे त्यात ? मला स्वत लाच मागाहून वाटल मी फार घाई केली तो प्रश्न विचारण्यात म्हणून ! "

- ❦ -

अनिरुद्धांबरोबर फिरून मी रात्रीं घरी परत आलें, तों अरू आईशीं गप्पा मारित बसलेला दिसला मला त्याला पहाताच मला मागच्या साऱ्या गोष्टींचा विसर पडला, व मी त्याला आनदानें विचारलें, " केव्हा आलास रे ? अन् अगोदर का नाही कळवलस ? म्हणजे मी गाडी नसते का घेऊन आलें स्टेशनवर ? मी रोज वाट पहाते आहें तुझी आणि तुला मात्र सारी सुटी सपल्यावर यायला फावल नाहीं रे ? " " अग कॉलेजचा मोह सोडवेना मला ! खरोखर कॉलेजातल्या आयुष्यक्रमाची मजा जर मनसोक्त लुटायची असेल, तर डेक्कनमध्येच जाऊन राहिल पाहिजे अनू !—तो मुळामुठाचा सगम, सगमातल्या बेटावरलीं तीं पिकनिक्स, पौर्णिमेच्या चादण्यातल ते मध्यरात्रीच बोटिंग न् काळोख्या रात्री माळावर भटकून तारकाच्या मधुर प्रकाशात मिळणार तें चिंतनाच सुख ! तुला कल्पना नाही यायची कधीं त्या मजेची —पण का ग तू कुठ होतीस इतका वेळ ? " त्यानें माझ्याकडे न्याहाळून पहात विचारले " अरे, ती गेली असेल बहुतेक कालिंदीबरोबर कुठ तरी फिरायला तू गेल्यापासून कीं नाहीं कालिंदीच न् तिच फार सख्य झाल आहे अलिकडे कॉलेज न् कालिंदी यांच्याशिवाय दुसरी करमणूक नाहीं तिला आताशा !" आईचे हे उद्गार ऐकत असतां त्याच्या कपाळावर चढत असलेल्या आठ्या मला दिसल्या, व त्याला पहातांच मनाला झालेला आनद मावळून गेला अगदीं मी इतकीं पत्रावर पत्रें लिहिलीं !

पण कॉलेज पुन्हा सुरू होण्याची वेळ येईपर्यंत याला माझ्यासाठीं इथं येण्याची बुद्धि झाली नाही, न् कालिंदीशी स्नेह ठेवल्याबद्दल माझ्यावर रागावण्याचा काय हक्क आहे याला? मनू म्हणत होती तेच एकदरीत खरे,—स्वार्थी, स्वार्थी आहे हा अगदी!—"आपल्या आवडत्या माणसासाठी लहानसहान गैरसोई सोसताना सुख वाटत मनाला फार!"—अनिरुद्धानी मघाशी इंग्रजीत उच्चारलेले हे शब्द माझ्या कानात अद्याप गुणगुणत होते आज त्याच्या क्लबात कसलीशी सभा असल्यामुळे मला घरी पोंचवून लगेच तिथे जाणार होते ते पण कालिंदीकडून निघाल्याबरोबर मी त्याना इंग्रजीत म्हणाले, "फिरायला चलता का आज? आता या सध्याकाळच्या वेळी घरी बसून करमणार नाही म्हणून म्हणते पण नको,—क्लबात महत्त्वाच काम आहे नाही का तुम्हाला आज?" त्या वेळी महालक्ष्मीच्या बाजूला मोटार वळविताना त्यानी उच्चारले होते ते शब्द. त्याचेही माझ्यावर प्रेम आहे आणि याचेंही माझ्यावर प्रेम आहे पण ती वृत्ति आणि ही वृत्ति! या तुलनेनें माझ्या मनात उठविलेले विचाराचे तुफान दाबून टाकून मी म्हटले, "पण मला उशिर झाला असला, तरी तू आज इथच रहाणार आहेस ना?" "होय आज रात्रभर इथ, उद्या सकाळी मामाकडे न् दुपारी गाडीत असा कार्यक्रम आहे माझा," त्याने हसून म्हटले त्यानतर जेवणें आटोपेपर्यंत खालींच बसून गप्पा मारल्या आम्ही जेवल्यानतर तो कांहीं वेळ आप्पाशीं बोलत बसला दिवाणखान्यात न् नतर माझ्या खोलीत आला मी त्या वेळी खिडकीपाशी उभी राहून क्षितिजावर तळपणाऱ्या चद्राकडे पहात होतें. त्याची चाहूल लागताच दचकून मागे वळले मी त्याबरोबर तो मला म्हणाला, "किती रोड झालीस तू अनू!—तुझ्या अगावर पडलेला चद्रप्रकाश बघून मला वाटल आमच्या डेक्कनच्या माळावर रात्री भटकत असता अतश्चक्षूनीं अनेकदा पाहिलेली रजनीच आहे उभी माझ्यापुढ!" आणि क्षणार्ध माझ्याकडे टक लावून बघून तो इंग्रजीत उद्गारला, "तुझी पत्र इतकी तुटक का येत होतीं मला?" "तू आपल्या मनाला विचारून पहा त्याच कारण.—माझीं फार तर पत्र तुटक असतील. पण तुझ वर्तन? एवढी पाऊण महिन्याची सुटी सपल्यावर माझी आठवण झाली नाही रे तुला?" मी म्हणालें, आणि, डोळ्यात आलेले अश्रु त्याला दिसू नयेत, म्हणून पुन्हा खिडकींतून बाहेर पहावयाला

सुरवात केली त्याबरोबर तो माझ्या अगदी जवळ येऊन म्हणाला, " तुला कल्पना नाही अनू, तुझ्याविषयी विचार करीत मी रात्रीच्या रात्री भटकत घालविल्या आहेत!—माझ्या वहीतल प्रत्येक सॉनेट साक्ष देईल तुला माझ्या मन स्थितीची ! "—त्याच्या त्या शब्दात इतकी कातरता आणि कोमलता भरली होती कीं, ते कानावर पडताच माझ्या डोळ्यातले आवरून धरलेले अश्रु ओघळले एकदम तेव्हा त्याने झटकन पुढे येऊन माझा हात आपल्या हातात घेतला, व " अनू, अनू, अस काय करतेस ? " त्याचे ओठ माझ्या कानात कुजबुजले —पण मी उद्वेगाच्या भरात तोंड फिरविले त्याबरोबर त्याच्या त्या आतुर ओठाचा स्पर्श माझ्या मानेला झाला क्षणभरच, खरोखर क्षण-भरच मला वाटले की, त्याच्या खाद्यावर मान टाकून मनसोक्त रडावे पण मागल्या दु खद प्रसगाच्या स्मृतीनी माझा स्वाभिमान डिंवचून जागृत केला, व त्याच्या हातातून आपला हात सोडवून घेऊन मी त्याला म्हटलें, " हे ठीक नाही अरू अशा बेजबाबदारपणान वागून तुझ चालेल पण माझा नाही निभाव लागायचा. आणखी किती दिवस अत पहाणार आहेस तू माझा ? तुझ्या मनात काय आहे हे तू स्पष्ट सागून टाक मला एकदा ! "

" माझ्या मनाशी काय करायच आहे तुला ? तू म्हणशील ते करायला तयार आहे ना मी ! " त्याने चमकून म्हटलें " पण ते एक दिव्य म्हणूनच की नाही ? " मी उपरोधाने हसून विचारले " तसच केवळ नाही पण तुझ्यासाठी कोणतीही गोष्ट करताना सुखच वाटेल मला " तो म्हणाला " माझ्यासाठी तू स्वार्थत्याग करावास अशी मुळीच इच्छा नाही माझी —तुझी पूर्वीचींच मत कायम आहेत का अरू अजून ? " मी विचारले " होय, ती मत नाहीत, माझा स्वभावच आहे तो !—कवीच्या प्रतिभेन निर्मिलेल्या स्वर्गीय चकोरासारखी वृत्ति आहे माझी सुधेचा एकादा बिंदु तोडात पडावा आणि बाकीच आयुष्य द्रिचकेच्या चिंतनात घालवाव यातच जस त्याच सर्व सुख असत, तस जीवन आहे माझ ! तुझ्याविषयी विचार करण्यात, एकादेच वेळी तुझ्या स्पर्शाच सुख अनुभविण्यात जो आनद मला वाटेल, तो कदाचित् जन्माची गाठ पडल्यान नाहीसा सुद्धा होऊन जाईल ! " तो एकदम इम्रजीत उद्गारला. तो हें बोलत असता मी मध्येच त्याला विचारले, " तुझा कधींच

लग्न करायचा विचार नाही का अरू ? " " का वरं ? बहुधा लग्न करीन मी पण लग्नाचा न् प्रेमाचा काही सबध आहे किंवा असावा, अस वाटत नाहीं मला ! " त्याने अगदी विचारपूर्वक उत्तर दिलें " अशा रीतीन प्रेम करीत रहाण तुला सोईच असेल कदाचित्.—पण मी स्त्री आहें मला शक्य नाही, इष्ट नाही अशा रीतीन वागण तू इथ आलास की मला तुझा मोह पडायचा न् अशा गोष्टी घडायच्या तुला तरी बर वाटत का हे अरू ? " मी त्याला विचारलें " तुला अस सुचवायच आहे का अनू मी कधी येऊ नये इथे पुन्हा म्हणून ? मग स्पष्टच का नाही सागत तस तू मला ? " त्याने दु खपूर्ण आवाजात विचारले त्या आवाजातला कप मला जाणवला —क्षणैक स्तब्ध होते मी अगदीं –पण तो कप, त्यातून व्यक्त झालेली ती हृद्वेदना !—खरी आहे का ती ?—त्या कपानें कपित होण्याइतके कोमल राहिले नव्हते माझे मन आतां त्याच्या बाबतीत मी इतकेच म्हणाले, " आपले अशा तऱ्हेचे सबध यापुढ रहाण चागल नाही एवढ मात्र खर ! " माझ्या आवाजात उत्पन्न झालेला कठोरपणा ते शब्द बोलता बोलताच मला जाणवला, व तत्क्षणीच मला पस्तावा होऊन माझे हृदय अनुकपेने भरून आले तोंच त्यानें पुढे येऊन माझे हात आपल्या हातात घट्ट, अगदी घट्ट धरले—त्याच्या त्या आवेशाची भीति वाटली मला, न् मी मान फिरविली त्याबरोबर माझ्या हातानीं आपलें तोंड झाकून घेऊन तो इग्रजीत उद्गारला, " नको, नको, असा निर्दयपणा नको करूस या वेळी !—माझा शेवटचा, हा शेवटचाच स्पर्श आहे तुला ! "



अरूला पोचवून परत येत असता अनिरुद्ध घरी आहेत का पहावे, अशी इच्छा झाली मला पण, लगेच मला वाटले, मनाच्या या सत्रस्त स्थितीत त्याची भेट घेणें इष्ट होणार नाही वादळानें एका होडीतलीं दोन माणसें जशी भिन्न दिशाना फेकली जावी, तशी अवस्था झाली होती आमची आईनें आठवण दिल्यामुळे मी मुद्दाम गाडी घेऊन अरूला पोंचवावयाला गेलें मला माहीत होते, कदाचित् पुन्हा आमची कधीही गाठ पडणार नाही —आमच्या सौहार्दाची, सहजीवनाची ती अखेरची यात्राच होती जणु काहीं ! पण त्या पाऊण तासाच्या सहवासात आम्ही एक शब्दही बोललों नाही एकमेकाशीं नाहीं म्हणावयाला मी

गाडी सुरू केल्यावर त्यानें मला विचारलें, " कुणी शिकवल तुला मोटार चालवायला ? " " कालिंदीन ! " माझ्या तोंडून चटकन् निघून गेलें अनिरुद्धाचें नाव घेण्याचा धीर नाही झाला मला त्याच्याजवळ नतर तो शेवटपर्यंत अगदी स्तब्ध होता एजिन लागून गाडी हलल्यावर आमची अत करणेंही हललीं तो माझ्याकडे अगदी अनिमिष नेत्रानी बघत होता त्याच्या त्या आकर्षक दृष्टीची अशी काही विलक्षण ओढ लागली होती की, मला शोषून, साठवून घेत आहे तो आपल्या हृदयात असा भास झाला मला मी खिडकीवर हात ठेवून उभी होते मला वाटलें, निदान गाडी सुटताना तरी ?—पण छे ! अक्षरश खरा केला त्यानें आपला शब्द गाडी सुरू झाली आणि माझ्या डोळ्यातून अश्रूचा पूर लोटला काल रात्री तो माझ्या खोलीतून निघून गेल्यावर जितक्या वेदना माझ्या जिवाला झाल्या नव्हत्या, तितक्या आता झाल्या कुडीतून प्राण निघून गेल्यावर जितकें दु ख होते, त्यापेक्षा अधिक दु ख शरीर समोरून उचलून नेल्यावर होत नाही का ? पण मला राग आला त्या दु खाचा, त्यातून व्यक्त झालेल्या माझ्या दुर्बलतेचा त्याच्या तोंडातून एक शब्द कीं डोळ्यातून एक अश्रु बाहेर पडला नाही आणि मी मात्र ! काय वाईट वाटून घ्यावयाचें अशा माणसाचा सबध तुटल्याबद्दल ?—घरीं आल्यावर याच गोष्टीचा विचार करीत किती तरी वेळ अथरुणावर तळमळत पडलें होतें मी सध्याकाळ झाल्यावर, मला वाटलें, कालिंदीकडे जावे आणि आरशासमोर उभी राहून मी विस्कळित झालेले केस नीटनेटके करू लागले तोंच मोटारीचा आवाज झाला मी उत्सुकतेनें खिडकीजवळ जाऊन पाहिले,—अनिरुद्ध अगदी हलक्या हातानें कर्णा वाजवीत होते. मी तशीच धावत खालीं आले आई माजघराच्या दारात उभी होती — तिनें माझ्याकडे साभिप्राय पाहिल्यामुळें मी क्षणार्ध घोटाळले, व तिच्या दृष्टींतला तो भाव ओळखून, " कालिंदीकडे जाण्यासाठी आलेले दिसताहेत बहुतेक ?" असे मी तिला ऐकू येईल अशा रीतीने स्वत शीच पुटपुटलें. मला बघितल्याबरोबर अनिरुद्धानीं हसत हसत इंग्रजींत विचारले, " फिरायला चलता का ? आतापर्यंत पत्ते खेळत होतों आम्ही न् शेवटीं कटाळून उठून आलों मी तुम्हांला न्यायला " माजघरातून आमच्याकडे साशक पहात असलेले ते डोळे !—मला जाणीव होती, मी त्याच्याबरोबर एकटी बाहेर गेलेली आईला आवडत नसे

मुळींच —त्या डोळ्याची भीति वाटली मला. पण क्षणभरच लगेच माझ्या मनांत आलें, काल रात्रीपासून माझ्या जिवाची जी सारखी तळमळ चालली आहे, ती याच्या सहवासानें थोडी तरी शात होणार नाही का ? मी काही त्याना आपण होऊन बोलवावयाला गेलें नाही पण ते स्वत होऊन आले असता !—मी त्याना हसून इग्रजीत म्हणाले, "आलेच मी दोन तीन मिनिटात" आणि मी झटकन वर जाऊन कपडे बदलून आले मोटार सुरू होताच ते मला म्हणाले, "तुम्हीच चालवा गाडी आज बघू या तरी कितपत प्रगति झाली आहे ती !" माझ्या मनात आलें, दुपारी मी बोरीबदरपर्यत स्वत गाडी नेली होती, म्हणून सागावें त्याना पण लगेच दाबून टाकला मी तो विचार तोफखान्याजवळ आल्यावर मोटार उभी करून आत खडकावर जाऊन बसलों आम्ही शरदृतूतील उन्मादक ज्योत्स्ना समुद्राच्या उसळत्या लाटावर नाचत होती. गतकाळच्या स्मृति आणि भाविकाळच्या चिंता या जशा उत्कट आनदाच्या ऊर्मीत विरून जाव्या, तसा क्षितिज आणि समुद्र याचा लय झाला होता त्या चादण्यात भरतीच्या फेंसाळ पाण्यानें अद्याप न बुडालेले उच खडक चादण्याने उजळलेल्या आकाशातील ढगाच्या काळसर शकलासारखे दिसत होते इच्छापूर्तीच्या खात्रीनें सुखावलेल्या हृदयात डोकावत राहिलेल्या अनिष्ट शकाच होत्या जणु कांही त्या ! मधून मधून लाटाचा एकाद दुसरा तुषार अगावर आला म्हणजे शरीर रोमाञ्चित होत असे मला आठवण झाली, चार महिन्यापूर्वी, कदाचित् याच खडकावर बसून असेल, मी विचारला होता अरूला तो प्रश्न !—माझ्या शरीरातून दु खाची चमक उठून गेली त्या आठवणीने त्याबरोबर अनिरुद्ध मला म्हणाले, "काय होतय तुम्हाला ? वारा झोंबतोय का अगाला ?" आणि त्यांनीं हळूच माझा हात आपल्या हातात घेतला मी तो तसाच त्याच्या हातात राहू दिला. व नुसते डोळे भरून त्याच्याकडे पाहिले तेव्हा ते अगदी जवळ येऊन इग्रजींत म्हणाले, "याही वेळेला तुम्ही नकार देणार का माझ्या याचनेला ? तुमच्या उत्तरावर माझ जीवित अवलबून आहे तुम्ही जर मला याही वेळी नाकारलत तर—तर माझ काय होईल सागवत नाही मला कदाचित् याच खडकावर माझ प्रेत वहात आलेलें दृष्टीस पडेल तुमच्या !"— त्यानी बोलता बोलता असहायतेनें आपली हनुवटी माझ्या मांडीवर टेकली, व त्याच्या डोळ्यात आसवें येत

असलेली दिसली मला. त्याच्या त्या अश्रुपूरित दृष्टीत आपली दृष्टि मिसळून मी क्षणमात्र त्याच्याकडे निश्चल नजरेने पाहिले माझ्या शरीराला कप सुटला, डोळ्यात अश्रु उभे राहिले व माझ्या मनाची शुद्धबुद्ध हरपल्यासारखी झाली चद्राच्या त्या मदिर प्रकाशात माझ्या पायालगतच्या खडकावर बसून सोत्कठ मजकडे बघत असलेली त्याची प्रेममूर्तीच काय ती मला दिसत होती पहाता पहाता मी स्वत ला अगदी न कळत खाली वाकले, व त्याच्या श्वासात माझा श्वास मिसळून गेला ’



आप्पाचा मला केवढा भरवसा होता! मला खात्री होती की, सारें जग जरी माझ्यावर उलटलें, तरी ते माझ्या पाठीशी उभे रहातील त्या विश्वासाच्या भरात रात्री घरी आल्याबरोबर मी साऱ्या हकिकतीचे पत्र लिहून काढलें, व सकाळी उठता क्षणीच ते नोकराबरोबर त्याच्याकडे पाठविले माझे काळीज सारखें धडधडत होते—मला वाटलें, लगेच त्याच्याकडून बोलावणे येईल आपल्याला अखेर तास दीड तास वाट पाहून मी मुद्दाम नोकराला बोलावून विचारले सुद्धा तेव्हा मला इतकेच कळलें की, त्यानी ते पत्र तत्क्षणीच फोडून वाचले मग या शाततेचा, या स्तब्धतेचा अर्थ काय करावयाचा ? ही वादळा-पूर्वीची तर शातता नव्हे ना ? दहा वाजेपर्यंत वाट बघून मी अग धुवावयाला म्हणून खाली उतरले शेवटी आप्पा जेवावयाला बसले होते मला न्हाणीघरात जाताना बघून ते आचाऱ्याला उद्देशून किंचित् मोठ्याने म्हणाले, “अरे, ताईला म्हणाव लवकर आटप आज जरा आपल मी तिला घेऊन बाहेर जाणार आहे आता माझ्याबरोबर काही कामासाठीं ” त्याचे ते शब्द ऐकून आई चकित झाली अगदी पण तिचा सारा जन्म त्याच्या तोडून बाहेर पडणारे शब्द झेलण्यात गेलेला होता त्या शब्दाची चिकित्सा करण्याचा, त्याच्याबद्दल शका विचारण्याचा आपल्याला काही हक्क आहे, अशी कल्पनाही शिवली नाही कधी तिच्या मनाला मी अग धुऊन बाहेर आले, त्या वेळीं आप्पाचें जेवण झालेलें होतें आईनें एक-वार माझ्याकडे सहेतुक पाहिले, पण एका अक्षरानेंही चौकशी केली नाही कसली मी जेवत असताना तिची दृष्टि सारखी माझ्याकडे लागलेली होती. पण, आप्पांच्या समतीचा आधार मिळाल्याशिवाय तिच्याजवळ ती गोष्ट काढणें किती

धोक्याचें आहे, याची जाणीव होती मला म्हणून मी खालीं मान घालून मुका-
ट्यानें वाढलेलें अन्न कसेबसे संपविलें एकदा मी हात धुवून वर येते न् येतें,
तोंच, "ताईला म्हणाव निघायच बर का आता," हे आप्पाचे शब्द माझ्या
कानावर आले, व मी घाईघाईने आपली मनीबॅग घेऊन तशीच ताबडतोब खाली
उतरले मोटारीत बसल्याबरोबर ते मला हसून म्हणाले, "तू म्हणे स्वत गाडी
चालवतेस अलीकडे बॅ प्रभाकरानीच शिकवल असेल बहुधा! बघू या तरी
कशी काय चालवतेस ती!" त्याच्या त्या बोलण्यात उपरोधाचा ध्वनि तर
नाही ना?—शका आली मला आणि अनिरुद्धाचे नाव तरी किती तिऱ्हाईत-
पणानें उच्चारले त्यानी! त्याची समति मिळण्यासबधाची आपलीं सारी सुखस्वप्नें
फोल ठरणार का मग? माझ्या डोळ्यापुढल्या मोटारच्या तावदानावर पाणी पडून
दिसेनासे झाल्यासारखे वाटले मला, व डोळ्याच्या कडावर आसवे तरारली तोंच
आप्पा मला म्हणाले, "तुमच्यावर भिस्त टाकण्याइतक नाही येत तुम्हाला अजून
चांगल चालवताना पडिताबाई! पहा पहा, आता मेली असती ना ती म्हातारी
चेगरून!" ते झटकन ब्रेक दाबताना उद्गारले "आयुष्याच सुद्धा हे अस;
असत ताई तरुणपणीं आपल्याला फार वाटत आपण जें करतो ते सार शहाण-
पणाच असत म्हणून पण अनुभविक माणस जर आपल्या चुका दाखवायला
नसली, तर असे अपघाताचे प्रसग यायचे आयुष्यात!" बोलता बोलता त्यानीं
मोटार आपल्या ऑफिससमोर आणून उभी केली वर गेल्याबरोबर त्यानीं मला
आपल्या खासगी खोलीमध्ये नेले, व रुमालाने कपाळावरला घाम पुशीत ते उभ्या
उभ्याच म्हणाले, "पोरी, मला अनपेक्षित नव्हत तुझ पत्र पधराच दिवसापूर्वी
तुझ्या आईन इषारा दिला होता मला तू कुठ जेवायला गेली होतीस त्या दिवशी
रात्रीं त्यावरून बोलण निघाल, न् "काही झाल तरी या मार्गशीर्षापर्यंत तिच लग्न
उरकून टाकल पाहिजे," अस एकदम म्हटल तिन मला मी तिला त्यावर
सहज विचारल, "आणि समजा, जर मी नाही केल तर?" "तर—तर ते
आपोआप होईल," ती मला आवेशाने म्हणाली मी तिला अशा रीतीने
बोलताना कधीच पाहिली नव्हती, व म्हणून मग मी खोदखोदून तिला
साऱ्या गोष्टी विचारल्या तेव्हा तू बॅ प्रभाकराबरोबर नेहमी असतेस म्हणून
सागितल तिन मला! पण ताई, तू हे पत्र विचारपूर्वक लिहिल आहेस ना

मला ? अद्याप तुझं त्यांच नक्की नाही ना कांहीं बोलण झालेल ? ”—त्यांनीं शेवटची ती दोन वाक्ये इंग्रजीत उच्चारली त्याच्या त्या प्रत्येक शब्दागणिक आपल्या आशेच्या ठिकऱ्या उडत आहेत, असें वाटले मला, व मी क्षणमात्र स्तब्ध, सुन्न होऊन गेले अगदी पण उत्तरासाठी खोळबून बसण्याचा स्वभाव नव्हता त्याचा. ते पुन्हा इंग्रजीत म्हणाले, “तुझ्या आईन आपला तो सशय मला सागितल्यावर मी बाररूममध्ये चौकशी केली त्याच्या हुशारीबद्दल तेव्हा दाजी-साहेब, नानासाहेब न् सर जीवनलाल यानी त्याच्या होतकरूपणाविषयी फार चागले उद्गार काढले माझ्यापाशी पण तरीही एक अडचण आहे! ” “ कोणती ती ? जात का ? ” माझी वठत चाललेली आशा त्याच्या त्या उद्गारांनीं टवट-वीत होऊन मी त्याना अधीरतेनें विचारलें त्यावर ते हसून म्हणाले, “ पडिता-बाई, तुमच्यापेक्षा मी कमी कडवा सुधारक आहे अस वाटत का तुम्हाला ? आम्हीं म्हातारी माणस तुम्हा तरुणाच्या खिजगणतीत नसतो अगदी नाहीं ग ? पण बिकट प्रसगाना तुमच्या त्या उसळत्या अननुभवी रक्तापेक्षा आमच अनेक आपदाचे आघात सोसून निबर बनलेल धिम रक्तच अधिक यशस्वितेन तोंड देऊ शकत. नुसता जातीचाच प्रश्न असता, तर मी समजूत घातली असती कशी तरी तुझ्या आईची पण जातीपेक्षा श्रेष्ठ—ज्याच्यामुळ मनुष्याला माणु-सकी येते ते—शील, शील!—तो जितका बुद्धिमान् तितकाच बेछूट आहे ताई विलायतेत असतांना त्यान कसे गुण उधळले!—तुझ्या त्या कालिंदीला माहित असल पाहिजे हें सार तिनच तर नाही ना या मोहपाशात गुतवल तुला ? ” त्याचा आवाज शेवटीं शेवटी जास्त जास्त कठोर होत गेला मला असह्य होत चाललें होते त्याचे ते बोलणें, व त्या शेवटच्या वाक्यानें तर माझें भान नाहींसे होऊन मी एकदम उठून त्याना म्हणालें, “ नको, नको, आप्पा! अस नका बोलू तिच्याविषयीं तुम्हाला जें काय बोलायच असेल, ते सारं मला बोला मीं काय लहान का आहे आतां दुसऱ्यान एकाद्या पाशात गुतवून मला फसवा-यला!” त्याना अशा रीतीनें उलटून बोलण्याचा माझ्या आयुष्यात तो पहि-लाच प्रसग होता त्यामुळें ते शब्द तोंडातून निघून गेल्याबरोबर माझें मलाच शरमल्यासारखें होऊन अत्यत दु ख झालें, व मी मटकन खालीं बसलें त्याबरो-बर ते माझ्याजवळ आले व उभ्या उभ्याच माझ्या खांद्यावर हात ठेवून उद्गारले,

" बेटा, शात हो. थोड्या विचारान घे साऱ्या गोष्टी मी तुला बोललों, ते तुझ्या मनाला लागावे, दुखवावे म्हणून नव्हे. तुझ्या मनाला दुखवण म्हणजे माझ्या स्वत च्याच मनाला मी दुखवण आहे तुझ्याशिवाय दुसर कोण आहे मला या जगात अनू तुझ्या सुखाशिवाय दुसऱ्या कोणत्या गोष्टीत सुख आहे मला ! पण तुझ्या सुखाची चाड मला आहे, म्हणूनच मला वाटत की, हे लग्न होऊ नये तो उमदा आहे, होतकरू आहे, देखणा आहे पण, ज्या त्याच्या प्रेमान आज तुला इतकी भुरळ घातली आहे, त्याचा भरवसा धरावा, अस शील नाही त्याच ! जो मनुष्य एकदा मोहाला बळी पडला, त्याला पुन्हा मोह पडायला वेळ नाही लागत मुळीच —अनू, तू वचन तर नाही ना दिलस त्याला काही ?" त्यानी मला अगदी मृदु, अगदी खालच्या आवाजात विचारला तो प्रश्न माझ्या डोळ्यातून सारख्या अश्रूच्या धारा चालल्या होत्या. कोणत्या आशेने मी आप्पाना पत्र लिहिले आणि काय ऐकावे लागले मला आज हे ! काल रात्री महालक्ष्मीहून परत येताना ते माझे दोन्ही हात आपल्या हातात घेऊन मला म्हणाले होते, " अनू, मी तुझ्या योग्यतेचा नाही तुझ्यासारख माझ आयुष्य निष्कलक, निरागस नाही !" त्या वेळी प्रेमोन्मादाच्या नशेने बेहोष झालेल्या माझ्या मनाला ते शब्द जाणवले नाहीत, त्या बोलण्याचा उमज पडला नाही पण केवढा इतिहास होता त्या शब्दाच्या मागे ! माझी सारी सुखस्वप्ने, माझीं सारी मनोराज्ये उध्वस्त झाली आपाच्या त्या बोलण्यानें अगोदर का नाही मला हे सागितले सारे कुणी ? देवा, फसवणुकीसाठीच का स्त्रीजन्म असतो ?

— ❦ —

कालिंदीच्या तोंडून ती सारी हकिकत ऐकल्यापासून मला सुचेनासे झालें काहीं अगदी. त्याचें जवळ जवळ ठरलेले लग्न मोठ्या मुष्किलीने मोडून त्याच्या वडिलानीं त्याना विलायतेहून परत्त आणले !—" मी तुझ्यासारखा निष्कलक, निरागस नाहीं,"—त्याचे हे शब्द पुन पुन्हा आठवत होते मला सारखे. पण मी स्वत. तरी निष्कलक, निरागस होते का ? शरीरानें नसलें, तरी मनानें मीही नव्हते का दुसऱ्याला वरले ? मग त्याना दोष देण्याचा मला काय हक्क ? मुलामुलींचीं ज्या वेळीं अगदीं कोंवळ्या वयात, मन कोणत्याही विकाराने विचलित होण्यापूर्वी,

लग्नें होत असत, त्या वेळी निरागसतेची अपेक्षा करण्यात कांहीं अर्थ होता. पण शिक्षणामुळें बुद्धि विकसित झालेल्या आणि यौवनामुळे कामना कुसुमित झालेल्या तरुणतरुणींच्या बाबतीत ऋष्यशृग न् मिराडा याच्या अव्याजतेची अपेक्षा करणे चुकीचेच नाही का होणार ? शकुतला एवढी मृगशावकाच्या सह-वासात तपोवनामध्ये वाढलेली ! पण तिलासुद्धा तारुण्याला सहज असलेल्या भावनाना बळी पडावे लागले अखेर त्या भावनाचे शिक्षण कुणी कुणाला द्यावे लागत नाहीं आम्रमजरी दृष्टीस पडो न पडो किंवा कोकिळाचे कूजित कानावर येवो न येवो, त्या भावनाच्या बहराने शरीर अकारण रोमाञ्चित व्हावयाचेंच आणि त्याचे उन्मादक सगीत शरीरात आपोआप थैमान घालावयाचेंच ! अशा स्थितीत तारुण्याच्या भरात आलेल्या मुलामुलीची मने अविकृत रहावी, त्याच्या-कडून कोणत्याही प्रकारचा अविचार कधीं घडू नये, अशी अपेक्षा करणे योग्य होईल का ? माझी मीना म्हणते त्याप्रमाणे—खरोखरीच जीविताातल्या वसताची हाक असते ती त्या हाकेला जी व्यक्ति ओ देणार नाही, तिच्यात जीवनाचा जोम कमी आहे, तिचे शरीर आणि तिच्या भावना खुरट-लेल्या आहेत, असेच खरोखरी म्हटले पाहिजे —कारण, ती हाक कानावर पड-ताच वृत्ति उचबळून याव्या आणि रक्त सळसळून जावे, असे आकर्षण असते तिच्यात कालिदास आणि शेक्स्पियर याच्यासारख्या महाकवींनी निस-र्गाच्या सहवासात वन्य स्थितीत वाढलेल्या मुलीच्या ठिकाणी तारुण्यात त्या विकाराचा उद्भव अगदी सहजासहजी झाल्याचे जें दाखविलें आहे, तें काही उगाच नव्हे शिक्षणाचा प्रसार जसजसा होत जाईल आणि लग्नाचे वय जसजसे वाढत जाईल, तसतशी अविवाहित मुलामुलींच्या ठिकाणीं ही निरागसता कमी कमीच आढळणार म्हणून प्रौढ प्रेमिकांनीं एकमेकांच्या पूर्वायुष्याची चिकित्सा फारशी खोलात शिरून करू नये हेंच बरें नव्हे का ? शाळेंत, कॉले-जात, सभातून शेंकडों ठिकाणी मुलामुलीचा नाही म्हटले तरी परस्पराशी सबध येणार तिथें पाऱ्यासारखें चचल, प्रमाथी मन शिस्तीच्या काचेच्या नळींत घालून कोंडलेले असले, तरी त्याची चलबिचल, जागच्या जागीं कां होईना, झाल्याशिवाय राहील का ? अनाघ्रात पुष्पाची अपेक्षा करण्याचें ते युग सपलें आता एकमेकाच्या पूर्वायुष्याची फाजील माहिती काढण्याच्या फदात न पडता,

परस्पराशी प्रामाणिकपणानें वागण्याच्या निश्चयानें भावी आयुष्याला प्रारंभ करणें, हेंच समजसपणाचें ठरणार आहे यापुढे — ते इग्लडात असताना कसेही वागलेले असले, तरी आज त्याचे माझ्यावर उत्कट प्रेम आहे ना ? कालिंदीनें तर मला स्पष्टच सागितलें की, “ तू जर त्याच्याशीं लग्न करायच नाकारलस, तर त्याचे काय होईल सागवत नाही मला !—अशी अवस्था करून टाकली आहे तुझ्याविषयींच्या प्रेमान त्याची ! ” मग पूर्वी त्यानी कुणावर तरी प्रेम केलेले होते, हे कळल्यामुळें आजचे त्याचे माझ्यावरले प्रेम मी का लाथाडू ? मीही नाही का पूर्वी दुसऱ्यावर प्रेम केलेले ? आप्पा म्हणतात, शील—शील नाही त्याच्याजवळ ! पण मजजवळ तरी कुठे ते शील आहे ? तारुण्यात विकाराच्या प्रबळ ऊर्मींत सापडलेला मनुष्य थोडा फार वाहवतो —पण म्हणून काय तो जन्माचा दु शील होतो का ? आपल्या पतीशिवाय आणि पत्नीशिवाय इतर कुणावरही कधी प्रेम केलेले नसणे यातच जर शीलाचे सारें पावित्र्य साठविलेलें असेल, तर अशा प्रकारचे शील जगातल्या किती सुशिक्षित स्त्री-पुरुषाच्या ठिकाणीं असलेलें आज आढळेल ? बदललेल्या परिस्थिती-प्रमाणे शीलाच्या न् नीतीच्याही कल्पना थोड्या बदलावयाला नकोत का ? आप्पा, तुमच्या तरुणपणी स्त्रीसहवास हा दुर्मिळ—अशक्यच होता. त्या वेळच्या तुमचा शीलाच्या कल्पनेच्या कसोटीवर अनिरुद्धासारख्या आजच्या तरुणाचें पावित्र्य घासून पाहून त्याना हिणकस ठरविण्याचा अन्याय तुम्ही का हो करिता ? त्याना अशा रीतीने दु शील ठरविताना माझ्या आई-इतकेच माझेंही शील उज्ज्वल आहे असेच तुम्हाला वाटत असेल नव्हे का ? पण अरूचीं मला आलेली पत्रे जर तुम्ही पाहिलीत ! !—नको, नको, कशाला पाहिजे ही शीलाची वाटाघाट आम्हाला ? ते शीलभ्रष्ट असल्यामुळे तुम्हाला नसेल वाटत त्याचा विश्वास,—पण मला वाटतो प्रेमभगाचें दु ख ज्या अर्थी माझ्याप्रमाणेंच त्यानींही अनुभवलेलें आहे, त्या अर्थी त्या समान दु खाच्या अनुलेपनानें आमचीं हृदयें साधलीं जातील, समीलित होतील पूर्वी काही का घडलेलें असेना, आज आमचे एकमेकावर आत्यतिक प्रेम आहे ना ? मग आम्हाला लग्न करावयाला मुभा द्या तुम्ही,—आमच्या समीलनाला आशीर्वाद द्या स्मित मुखानें शकुतलेनें ज्या वेळी दुष्यताशीं गाधर्वविवाह

केला, त्या वेळी त्याच्या अत पुरात किती राण्या होत्या याची चौकशी तिने केली होती का ? कचाने झिडकारिलेल्या देवयानीने जेव्हा ययातीचे पाणिग्रहण केलें, तेव्हा तो पुढें आपल्या बालमैत्रिणीवर लुब्ध होईल ही शका तिच्या मनाला शिवली होती का ?—आप्पा, आप्पा, माझ्या जिवाची जी होरपळ गेले चार महिने चालली आहे, तिची जर तुम्हाला कल्पना असती, तर तुम्ही इतक्या निष्ठुरपणाने नकार दिला नसतात आयुष्यातल्या इतर सगळ्या दु खाची कल्पना असेल तुम्हाला पण प्रेमवचनेचे दु ख !–ते जितके नाजूक, तितकेच तीक्ष्ण असते त्याच्या यातनाची कल्पना तुम्हांला कुठून असणार ? आपल्या एकुलत्या एका मुलीच्या जिवाची तडफड थाबावी, तिला अहोरात्र होणाऱ्या वेदनाचा विसर पडावा, असें तुम्हाला वाटते ना ? मग स्वयमेव उचबळून अगावर आलेल्या प्रेमाच्या या लाटेत मला वाहून जाऊ द्या, विलीन होऊ द्या.

– ❦ –

मला धास्ती होती आई आमच्या लग्नाला समति देईल कीं नाही याबद्दल पण केवढा स्वार्थत्याग केला तिने माझ्यासाठीं ! आप्पाशीं मी पुष्कळ बुद्धिवाद घातला,—त्या दिवशीच्या माझ्या अश्रूनी त्याचे मन अर्धें अधिक विरघळलेंच होतें—त्यानी समति दिली अखेर माझ्या हट्टाला मात्र साऱ्या गोष्टी निश्चित होण्यापूर्वी एकवार अनिरुद्धाना भेटण्याची इच्छा दर्शविली त्यानीं त्याप्रमाणे त्याच्या कचेरीत त्या दोघाची भेट झालीही त्या वेळीं काय बोलणें झाले याबद्दल आप्पा एक शब्दही बोलले नाहींत माझ्याजवळ आणि, अनिरुद्धाना जेव्हा मी खोदखोदून विचारलें, तेव्हा ते खिन्नपणाने हसून इग्रजींत एवढेंच म्हणाले, “ तुझे वडील इजिनियरच्या ऐवजी सॉलिसिटर व्हायला हवे होते माझ्या वडिलाप्रमाणें ! माझी उलट तपासणी केली त्यानीं कसून अन् अगदी करार करून घेतला माझ्याकडून तुझ्याशीं प्रामाणिकपणान वागण्याबद्दल माझ्या हातून जरी काहीं अक्षम्य चुका घडल्या असल्या, तरी माझ्याविषयीं इतका अविश्वास दाखवायला नको होता त्यांनी. माझ्या परिस्थितींत ते असते, तर कदाचित् त्यांच्याही हातून असल्या चुका घडल्या असत्या स्वत ला करारी समजणाऱ्या या जुन्या माणसाना कल्पनाशक्ति अगदींच नसते का ग ? ” मी बोललें नाहीं कांहीं यावर.

पण पुन्हा दोन दिवसानीं याहीपेक्षा कडू बोलणे ऐकावे लागलें मला नेहमींप्रमाणें आम्ही फिरावयाला गेलो असता ते मला म्हणाले, "मला विकत घेतला बरं का तुझ्या वडिलानीं आज माझ्या वडिलापासून!" नतर ते फारसे काही बोलले नाहीत आम्ही खडकावरून उठून परत येत असता ते माझा हात आपल्या हातात घेऊन म्हणाले, "आपल्या या लग्नातल सार काव्य नाहीस होणार अस वाटायला लागल आहे मला भरतीच हें उधाण ओसरून गेल्यावर जसा किनारा उघडा पडून भयाण शून्यता तेवढी शिल्लक रहाते, तस लग्नानतर होणार आहे की काय आपल्या जीवनाच कोण जाणे!" त्याचे ते शब्द कानावर पडताच हुदका आला मला एकदम त्याबरोबर ते मला जवळ घेऊन उद्गारले, "तुला किंवा तुझ्या वडिलाना दोष देण्याच्या बुद्धीन नाही बोललों मी हें अनू! दोषी मनुष्याच्या गतकाळाची छाया त्याच्या भवितव्यावर पडून ते काळवडून जाव, तस झाल आहे माझ" नतर आप्पाच्या बोलण्यावरून मला असे कळलें की, त्याच्या विलायतेतल्या रहाण्यापायीं जें कर्ज मामजीना झालें होते, तें सारें, हुड्याचे म्हणून एक लाख रुपये त्याना आग्रहपूर्वक घ्यावयाला लावून, आप्पानीं फेडले, व आमची सारी इस्टेट गहाणातून सोडवली मला अगदी कसेंसेच वाटले तो सारा व्यवहार समजल्यावर पण, आप्पानीं हें जें केलें, ते त्याना किंवा मामजीना लाजविण्यासाठीं का केले होते? आमचा ससार सुखाचा व्हावा म्हणूनच त्याची ही सारी धडपड होती ना? मी त्यांची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण ते मला पुन पुन्हा म्हणावयाचे, "तुझा आता अगदीं हक्काचा विकत घेतलेला गुलाम आहे मी बरं का अनू!" "तुम्ही माझे विकत घेतलेले गुलाम असाल, पण मी तुमची वाहून घेतलेली दासी आहें ना! पैशान गुलाम झालेला मनुष्य केव्हा ना केव्हा तरी स्वतत्र होऊ शकतो. पण स्वेच्छेन वाहून घेतलेल्या माणसाची प्रेमाची गुलामगिरी मात्र जन्माची असते हो!" मी त्याना हसून म्हणालें एकदा त्यावर ते एवढेंच म्हणाले, "ती गुलामगिरी उभयपक्षी न् परस्परावलबी असते पण ही गुलामगिरी तुझ्या न् माझ्या वडलानीं सगनमतान लादली आहे माझ्यावर!" हुड्याच्या त्या भानगडीमुळें आहाळल्यासारखें झालें आमचें प्रेम, व कोमेजलेल्या फुलातला सुगध जसा हळुहळू उडून जावा, तसा त्यातल्या आनंदाचा उन्माद ओसरत चाल-

त्यासारखा वाटला मला मनाच्या या सत्रस्त स्थितींतच आईला ती बातमी कळविण्याची जबाबदारी आप्पांनी टाकली माझ्यावर वास्तविक त्यानाच तिचे मन अधिक लवकर वळवता आलें नसतें का ? पण मला ते असें म्हणाले, "पोरी, तुझ्या आईच न् माझ कोणत्याच बाबतींत जमल नाहीं कधीं पण तिच्या मनाला प्रत्यक्ष दुखवण्याचे प्रसग टाळून माझ्या इच्छेप्रमाणें तुझ शिक्षण वगैरे केले मी पण मला कल्पना करवत नाहीं, तिच्यावर काय परिणाम होईल या गोष्टीचा ! तुझ्यावर तिच अत्यत अत्यत प्रेम आहे त्या प्रेमामुळच कदाचित् तिन या लग्नाला आशीर्वाद दिला तर दिला नाही तर मला कठीण दिसत आहे पुढच सार "—बोलता बोलता त्याचा आवाज घोगरा झाला एकदम आई-विषयीं त्याच्या मनात इतका आदर, इतकें प्रेम असेल असें वाटलें नव्हते पूर्वी कधी मला पण लग्नाच्या बाबतींतल्या माझ्या त्या हट्टानें त्याच्या मनोवृत्ति इतक्या हादरून गेल्या होत्या कीं, भूकपाच्या धक्क्याने खडकाळ जमिनीच्या पोटात खोल वहाणाऱ्या झऱ्याचे पाणी जसें उचबळून वर यावे, तसा त्याचा तिच्या-विषयींचा प्रेमा प्रकट झाला त्या वेळीं त्या दिवशीं रात्री जेवणें आटोपल्यावर आई नेहमींप्रमाणें देवापुढे बसली असता मी हळूच समोर जाऊन बसलें तिच्या त्याबरोबर ती घाबरल्यासारखी होऊन मला म्हणाली, "का ग, कांहीं होत आहे का ताई तुला आज ?" तेव्हा मी तिला म्हणालें, "तुला काहीं सागायच आहे आई मला —पण तू रागावणार नाहींस ना ?" "मी रागावण्यासारख एवढ घडल आहे तरी काय तुझ्या हातून ते तर मला कळू दे आधीं ! आताशा काय सारख बोलत असतात ते तुझ्याजवळ ? तुझ्या लग्नाच का घाटत आहे काहीं ?" तिनें मला किंचित् गभीर होऊन विचारलें "होय, ठरल्यासारखच झालय बहुतेक," मी चाचरतच म्हणाले "कधी ? न् माझ्याशीं कस काहीच बोलण झाल नाहीं तिकडून ? आणि कुणाशीं ठरलें ?"—प्रत्येक शब्दागणिक तिचा आवाज चढत गेला भीतीनें माझ्या तोंडून शब्द बाहेर पडेना त्यामुळें ती जास्तच रागावून उद्गारली, "बोल, बोल, मला न सांगता सवरता घडल्या कशा साऱ्या गोष्टी ? आजपर्यंत अस वागण नव्हतें झाल कधीं माझ्याशीं !" "आप्पाचा काहीं दोष नाहीं त्यात माझ मीच ठरवून टाकल सगळ !" मी हळूच म्हटलें "तुझ तूच ठरवलस ? अन् कुणाशीं ? त्या बॅरिस्टराशीं तर नव्हे ?

एवढ्याचसाठीं का त्यानी तुला इतकी शिकवली? काय केलस तू हें ताई? मी जगातून उठाव अस का मनात आहे तुझ्या?" बोलता बोलता तिच्या डोळ्यातून अश्रु वाहू लागले तिचा तो दु खावेग पाहून क्षणमात्र स्तभित झालें मी अगदीं पण नतर हळूच आपलें डोके तिच्या खाद्यावर टेकून म्हणालें, "आई, आई, अस बोलू नकोस तू? तुझा आशीर्वाद ज्या लग्नाला मिळणार नाही, त्याच्यापासून कधी सुख नाहीं व्हायच मला तुला जर पसत नसेल, तर मी आताच आप्पाना सागून रद्द करते हा बेत पण मग मात्र तू पुन्हा कधी लग्नाची गोष्ट काढू नकोस माझ्या!" आणि गेल्या सबध महिन्यातला सारा मनस्ताप आठवून रडें कोसळलें मला तिनें मला अगदी जवळ घेतली, व किती वेळ तरी तिचे अश्रु माझ्या अगावर पडत होते सारखे त्या स्थितीत बराच वेळ गेल्यावर शेवटीं ती म्हणाली, "तुझ्या जन्माच मातेरं मी कस करू माझ्या हातानीं? मला दिसलच होत हे सार भविष्य त्याना पसत असेल तर होऊ देत साऱ्या गोष्टी तुझ्या मनाप्रमाण!" आणि तिने आपले डोळे पुसले वादळानतर ज्या प्रकारची निश्चेष्टता सृष्टीवर पसरते, तशा तऱ्हेच्या शाततेची कळा आली होती तिच्या चर्येवर!



'मनोरंजना'तून आलेला तो आमचा फोटो म्हणजे जसें काही आव्हान होते साऱ्या समाजाला रजिस्ट्रारच्या कचेरींतून बाहेर पडल्यावर आम्ही लगेच तारापूरवाल्याकडे गेलों व फोटो काढवला आमचा त्यानतर दोन दिवसानी आमच्या लग्नाविषयींची कुणकुण ऐकून मित्र मुद्दाम आप्पाना भेटावयाला आले आमचे नुकतेच तयार होऊन आलेले फोटो पडले होते टेबलावर त्यातली एक प्रत ते जाताना घेऊन गेले, व आमचे लग्न लवकरच वैदिक पद्धतीनें होणार असल्याची बातमी न् आमची थोडीथोडी माहिती देऊन त्यानी प्रसिद्ध केला तो फोटो त्याबरोबर एकदम टीकेचे काहूर उठलें साऱ्या बाजूनी ब्राह्मण–पाठारे जातीतला तो पहिलाच विवाह होता शिवाय दोनीही घराणी आपआपल्या परीने नामाकित त्यामुळें एक महिनाभर वर्तमानपत्रातून काथ्याकूट चालला होता आमच्या लग्नाचा. इदुप्रकाश, ज्ञानप्रकाश वगैरे काही पत्रांनीं अभिनदन केलें आमचें; व केसरीनें जरी आमचा विवाह हा प्रतिलोम असल्यामुळें गौण असल्याचा

अभिप्राय दिला, तरी तो नोंदणीनंतर वैदिक पद्धतीनें होत असल्याबद्दल त्यातल्या त्यात समाधान व्यक्त केलें होते बाकीच्या दुर्धारक वर्तमानपत्रानीं मात्र टीका करिताना काही ताळ म्हणून ठेवला नाही मला दिवस गेले असल्यामुळे लग्न करणे भाग पडल्याबद्दलची सुद्धा भुमका उठवली त्यानी अप्रत्यक्ष रीतीने ! आप्पाना त्या टीकेचे फारसे काही वाटलें नाही पण ते मात्र अगदी चिडून जाऊन फिर्याद करण्याच्या गोष्टी बोलावयाला लागले पण कालिंदीने समजूत घातली त्याची स्वत च्या लग्नाच्या वेळच्या हकिकती सागून परतु वर्तमानपत्रातल्या त्या टीकेपेक्षा सुद्धा खासगी पत्राचा न् भेटीचा त्रास फार झाला आप्पाना स्वत ला सुधारक म्हणविणारे त्याचे अनेक शिष्ट स्नेही भेटले त्याना, व ब्राह्मण मुलीनें इतर जातींतल्या तरुणाशीं लग्न करणे कमीपणाचे असल्यामुळें आमचे लग्न रद्द करण्याबद्दल त्यानीं परोपरीनें गळ घातली आप्पाना त्याच्या त्या विसगत सल्लयाबद्दल त्याना फजीत करण्यात न् निनावी पत्रें अर्धवट वाचून फाडून टाकण्यात आपाचा विश्रातीचा वेळ खर्च होत असे बहुतेक आम्ही लोणावळ्याला जाईपर्यत हा उपद्रव सारखा चालू होता आमच्या तिथे जाण्याची बातमी सुद्धा मुबईच्या एका जहाल दैनिकाने विकृत करून छापली. त्यानें असें धडाकून प्रसिद्ध केले की, वधूच्या आईबापाचा लग्नाला विरोध असल्यामुळें वराने तिला गुपचूप घरातून काढून लोणावळ्याला पळवून नेली ! वर्तमानपत्रें ही कण्ड्या पिकविण्याच्या बाबतीत किती पटाईत असतात, याचा चागला अनुभव आला आम्हाला त्या वेळीं त्या साऱ्या टीकेला उद्देशून बोलताना लग्नाच्या वेळी अण्णासाहेब कर्वे आम्हाला एवढेच म्हणाले, “ अशा प्रकारच्या विवाहाचा परिणाम काय होतो, याकडे बारीक लक्ष असते नेहमी समाजाचे. म्हणून मिश्रविवाहाची सुधारणा जर लोकप्रिय करावयाची असेल, तर तुमच्यासारख्या मडळीनी आपली जबाबदारी ओळखून ती यशस्वी करून दाखविली पाहिजे आपल्या वर्तनान ! ” लग्नविधीतला जरूर तेवढा धार्मिक भाग सारा यथासाग झाला, व दुपारीं अकराच्या आतच मोकळे झालों आम्हीं सप्तपदीनतर जेव्हां आम्ही आत जाऊन आईला नमस्कार केला, तेव्हा ती म्हणाली, “ एवढ सगळ झाल्यासारख तुम्ही दोघानीं एकमेकाना साभाळून घेऊन सुखान नादा एवढच मागण आहे माझ जगदबेपाशी ! ” तिच्या त्या उद्गारातली

आर्तता त्यांच्या मनाला जाणवली, व ते चटकन् म्हणाले, "मी आपल्या मुलीला अंतर देणार नाहीं कधीही,—आपलेच पाय साक्ष!" मेजवानी आटोपून निमंत्रित मंडळी गेल्यावर आंपानी आमच्यासाठी मुद्दाम घेऊन ठेवलेल्या टुमदार बंगल्यात पाठवणी झाली आमची फक्त कालिंदीच काय ती आमच्याबरोबर तिथे आली होती. पण तीही दिवे लागल्याबरोबर परत जावयाला निघाली मी तिला न जाण्याचा आग्रह केला असता, ती त्यांच्याकडे बघत हसून म्हणाली, "अलमावेगेन, नन्वयमाराधयिता जनस्तव समीपे वर्तते!" ती गेल्यावर मला अकारण अवघडल्यासारखे झाले, तो अभिलषित एकांत नकोसा वाटू लागला त्या पूर्वी आम्ही कधी एकातांत बसलों नव्हतों, असें नाही. लग्न ठरल्यापासून अलीकडे बहुतेक आम्ही दोघे एकटींच फिरावयाला जात असू पण पंचमहाभूतांच्या सान्निध्यातला यदृच्छेने लाभणारा तो एकांत निराळा आणि हा घरातला बुद्धिपुरस्सर निर्माण केलेला एकांत निराळा! त्यामुळे माझे मन बावरल्यासारखे होऊन माझ्याकडे सोत्कंठ नेत्रांनी बघत असलेल्या अनिरुद्धांना मी म्हटले, "आपण जरा बागेत जाऊं या थोडा वेळ" माझ्या तोंडून ते शब्द निघताच ते उठले व आम्ही बाहेर बागेत येऊन उभे राहिलो चंद्राच्या रम्य प्रकाशात वाऱ्याच्या मंद झुळकेनें डोलणारीं तीं झाडें! —त्यांच्या पानांची ती गोड सळसळ ऐकून माझ्या हृदयात अननुभूत भावनांची किलबिल सुरू झाली जणु काही कळ्यांना फुलवीत असलेल्या त्या वसंतवातानें, माझा पदर किंचित् अस्ताव्यस्त करून, माझ्याही हृदयातल्या कसल्या तरी मुकुलित भावना हळूच चाळविल्या. आणि त्या प्रकाशात माझ्याकडे अतृप्त नेत्रांनी पहात असलेल्या अनिरुद्धांना मी विचारले, "पूर्वीइतकंच प्रेम आहे ना माझ्यावर आपलं?" "कां बरं? तुला असा प्रश्न मला विचारण्याचं काय कारण अनू? मीच उलट विचारला पाहिजे हा प्रश्न तुला" ते मला जवळ घेऊन म्हणाले "तुझ्यावरलं माझं प्रेम कां बरं कमी होईल? मी मात्र तुला विचारतों,—माझ्या आयुष्याचा सारा ग्रंथ कळलेला आहे तुला आता—माझ्याविषयीं पूर्वीइतकंच उत्कट प्रेम वाटतं ना तुला? वास्तविक मला हक्क नाही तुझ्यासारख्या देवतेकडून प्रेमाची अपेक्षा करण्याचा मुळींच!" त्यांच्या त्या प्रश्नानें माझ्या हृदयातल्या सुप्त स्मृति डिवचून जागृत केल्या साऱ्या एकदा वाटलें,

सागून टाकावी त्याना सारी आपली हकिकत पण तितक्यात त्यानीं माझी हनुवटी वर उचलून माझ्या दृष्टींत आपली दृष्टी मिसळीत मला इग्रजीत विचारलें, " बोलत का नाहीस तू ? पूर्वीइतकाच प्रिय आहें का मी तुला अजून ? " मी त्याच्या छातीवर मस्तक टेकून " होय " म्हटले त्या वेळीं माझ्या हृदयाला होत असलेल्या वेदना जर त्याना कळल्या असत्या तर !—" आपण आत जाऊ या आता, " ते मला म्हणाले आत आल्यावर मी माझ्या मनोवेदनाचा विचार करीत कोचावर बसलें किती अभागी आहें मी ! आपलें पूर्वचरित्र सारें त्यानी सागून टाकलेले असल्यामुळें त्याचे मन किती प्रसन्न आहे आज ! आणि माझ्या मनाला मात्र सुखाच्या या क्षणीसुद्धा जुन्या आठवणी डागण्या देत आहेत सारख्या सागून टाकू का मी त्याना स्पष्ट ?—तोंच ते माझ्याजवळ येऊन बसले, व माझ्या खाद्यावर दोन्ही हात ठेऊन त्यानी अगदीं हलक्या, किंचित् घोगरट आवाजात मला इग्रजींत विचारले, " अनू , तू सुखी आहेस ना माझ्या सहवासात ? " त्याचा श्वास जोरानें चालला होता त्या श्वासाबरोबर कसलासा मादक, उग्र गध आला मला, व मी साशक होऊन त्याना विचारलें, " वास कसला येतो आहे बरं ? " " काही नाही मी थोड मद्य घेतल आहे का बर ? तोंड का फिरवलस ? तुला आवडत नसेल तर मी घेणार नाहीं पुन्हा मग तर झाल ना ? " ते मला जवळ घेत उद्गारले आणि माझें मस्तक, कोणत्या भावनेनें कुणाला ठाऊक, मी मुकाट्यानें त्याच्या वक्षस्थलावर टेकलें !



डॉक्टरानीं तसें सागितल्यापासून त्याची स्थिति वेड्यासारखी झाली आप्पाचाही धीर सुटला होता पण त्यानीं तसे काहीं भासू न देता त्याना न् आईला धीरच दिला उलट त्याचें तिघाचेही म्हणणें एक की, मुलाचे काहीही झालें तरी चालेल, पण माझ्या जिवाला अपाय होतां कामा नये पण मी मात्र डॉक्टराना स्पष्ट सागितलें की, मी नाहीं जगलें तरी चालेल, पण मूल मात्र सुरक्षित जन्माला आलें पाहिजे तेव्हा आई म्हणाली, " आम्हाला दोन्हीही सुरक्षित राहिली तर हवींच आहेत पण तुझ्या जिवाची काळजी आधीं घेतली पाहिजे " गेले तीन दिवस त्या असह्य वेदना मी भोगीत होतें लग्न झाल्यापासून या नऊ दहा महिन्यात दु ख म्हणून ज्याला म्हणतात, त्याचा

एक क्षणही अनुभवला नव्हता मी त्या साऱ्या सुखाचा वचपा निघाला जसा काहीं त्या तीन दिवसात माझ्या सगतीत ते इतके रंगून गेले होते की, निकडीच्या कामाशिवाय सहसा कोर्टात जाणे होत नसे दिवसा वाचावयाचे किंवा गप्पा मारावयाच्या, सध्याकाळीं कालिंदी न् अरविंद आल्यावर बिझिक खेळावयाचे आणि रात्री बहुधा सिनेमाला जावयाचे, असा कार्यक्रम असे आमचा डोहाळे लागल्यावर आईच्या आग्रहावरून मी आठ दिवस माहेरी रहावयाला गेले होतें, तेवढाच काय तो आमचा वियोग पण तेवढ्या त्या आठ दिवसात सुद्धा आमचे एकत्र फिरावयाला जाणें चुकले नाही कधी लग्नाच्या पहिल्या दिवशी रात्रीं त्याच्या तोंडाला तो उग्र वास आला होता पण त्यानतर केव्हाही मी बघितले नाही त्याना तसें काही घेताना किंवा सिगारेट ओढतानाही मी माहेरी असताना मात्र एक दिवस शका आली मला त्यानी ते घेतल्याची पण, "आज कसला वास येतो आहे चमत्कारिक तोंडाला?" असें मी विचारताच, त्यानी मला हसून म्हटले, "तू जवळ नसलीस म्हणजे बेछूटपणान वागण्याची बुद्धि होते मला, अनू!" मी दुसऱ्याच दिवशीं सकाळी बगल्यावर रहावयाला गेलें माझी मोटार बागेंत शिरली, त्या वेळीं स्वारी हॅमॉकवर पडून नाकातून बाहेर निघणारी धूम्रवलये पहाण्यात गुग झाली होती अगदी मला बघितल्याक्षणी हातातला तो चिरूट फेकून देऊन आनदानें इग्रजींत उद्गारले, "आली माझी देवता! ध्यानच करीत होतो मी इतका वेळ तुझ!" "ध्यानाला काय धुनीची गरज असते वाटत?" मी हसून विचारलें त्याबरोबर ते म्हणाले, "तू मला सोडून गेलीस, म्हणून धुनी पेटवून बसाव लागल नाइलाजास्तव! आपल माणूस बिघडू नये अस वाटत असल, तर त्याला सोडून जाऊ नये कधी कुठ!" "छान, छान! लहानच आहे आता आपल माणूस त्याची अष्टौप्रहर काळजी वहायला!" मी म्हणालें "उत्कट मनोवृत्तीचीं माणस हीं जन्मभर लहानच असतात अनू!" ते अगदी गभीर होऊन उद्गारले त्यानतर मी पुन्हा कधी गेलें नाही माहेरी मला केवळ आईसाठीं म्हणून रहावयाला जावेंसें वाटत असे केव्हां केव्हा तिथें. आमचा स्वतत्र ससार थाटल्यावर मी परोपरीनें विनवण्या केल्या तिच्या. पण तिनें कधी पाऊल ठेवलें नाहीं आमच्या घरीं. परंतु, त्या दिवशीं माझें पोट दुखत असल्याचा निरोप कळल्यावर, ती जी

आप्पाबरोबर आमच्याकडे आली, ती पुन्हा गेली नाहीं परत घरी पहिल्या दिवशी त्रास नाही झाला फारसा पण दुसऱ्या दिवशीं वेदना अगदीं असह्य झाल्यामुळें अखेर भाजेकराना आणले आप्पानी त्यानी मला तपासल्याबरोबर आप्पाना सागितले की, “ ऑपरेशन शिवाय भागणार नाही, व बाळ किंवा बाळतीण यापैकीं कोणी तरी दगावण्याचा फार सभव आहे या केसमध्यें ! ” डॉक्टराचे तें मत ऐकून घाबरून गेली सारी अगदीं, व “ डॉक्टरानीं काय सांगितलें ?” असे जेव्हा मी विचारले, तेव्हा मला मुद्दाम हसून म्हणावयाचें झालें, “ या डॉक्टराना काहीं कळतय का खरोखरी ? सर्जन असला की त्याला रोग्याला चिरून काढण्याशिवाय दुसरा उपाय दिसत नाहीं काही ! ” आणि खरोखरीच डॉक्टराना असें स्पष्ट सागावयाचे झाले की, “ किती वाटेल तितका पैसा लागला तरी चालेल पण शस्त्रक्रियेशिवाय सुटका होण्याचे सारे उपाय करून पहा आधीं ” ती सारी रात्र त्या उपायाचे प्रयोग माझ्यावर करण्यात गेली, व त्यानी दर पधरा मिनिटानी नाहीं नाही ते प्रश्न विचारून भडावून सोडले अगदी परिचारिकाना शेवटी मी त्याना म्हटलें, “ अस सारख जागत न् प्रश्न विचारीत राहिल्यान का सुटका होणार आहे माझी ?—आपण घटकाभर जाऊन निजला तर तेवढच बरं वाटेल माझ्या जिवाला ” त्यावर लगेच असें बोलावयाचें झाले की, “ तू अशी तळमळत असता झोप येईल का मला ? माझ हृदय काय दगडाच का केल आहे ?” आणि बोलता बोलता डोळ्यात अश्रु आले त्याच्या पहाटे त्या वेदना इतक्या वाढल्या की, सकाळ काही उजाडत नाही असे वाटावयाला लागलें मला; व मी आप्पाना बोलावून असें सागितलें कीं, “ आता तुम्ही अत पाहू नका आणखी माझा यापेक्षा तुमच्या त्या ऑपरेशनन मरण आलेल पुरवल मला !” लगेच शस्त्रक्रियेची तयारी करण्यात येऊन मला टेबलावर नेऊन निजविण्यात आलें तेव्हा मी डॉक्टराना म्हटलें, “माझ काहींही झाल तरी चालेल पण मूल मात्र सुरक्षित जन्माला आल पाहिजे ” त्याबरोबर स्वतः एकदम इग्रजीत मोठ्यानें म्हणावयाचे झाले, “ तें काहीं नाही, तुम्ही प्रथम हिच्या सुरक्षिततेची काळजी घ्या डॉक्टर !” “ आम्हाला दोन्हीही पाहिजेत मूल हव न् आईही हवी, ” डॉक्टर शस्त्राची माडामाड करीत असता हसून म्हणाले मुबईतले अर्धा डझन नामांकित डॉक्टर जमले होते माझ्या भोंवतीं गुगी देण्याची वेळ होताच परिचारिकांनीं

आईला तिथून उठवून बाहेर नेली पण डॉक्टरानीं एक दोनदा अप्रत्यक्ष सूचना देऊनही ते मात्र तिथून हलेनात माझा हात आपल्या हातात घेऊन सारखी माझ्याकडे टक लावून पहात होती स्वारी त्याची ती वेड्यासारखी अवस्था बघून मला क्षणोक्षणी उमाळे येत होते आतून पण मला जाणीव होती की, माझ्या डोळ्यातून जर एक थेंब बाहेर पडला, तर त्याच्या डोळ्यातल्या आवरलेल्या अश्रूना पूर येईल अगदी शेवटी मी कालिंदीला बोलावून तिला सांगितले त्याना तिथून उठवून न्यावयाला तेव्हा ते म्हणाले, " मी बसलो इथे तर काय हरकत आहे तुमची ?" "हरकत नाही काही पण तुमच्यान पहावणार नाही आता पुढला प्रकार," डॉक्टरानी सांगितले "खरच, बाहेर जाव आता आपण मी डोळे उघडल्याबरोबर पहिल्यादा आपल्याला हाक मारीन उगाच भीति वाटते आपल्याला ऑपरेशनची !" मी बळेंच हसून म्हणालें त्याबरोबर माझ्या तोंडावरून हात फिरवून ते उठले, व कालिंदी त्याना बाहेर घेऊन गेली ते गेल्याबरोबर माझ्या डोळ्यातून अश्रूचा लोट येऊन दिसेनासे झालें मला एकदम त्यानतर तीन तासानीं डोळे उघडले मी. माझा हात आपल्या हातात घेऊन जवळच बसले होते ते शुद्धीवर आल्याबरोबर आठवल्यासारखे होऊन बोलण्याचा प्रयत्न केला मी पण, माझे ओठ हलले मात्र, लगेच त्यानी आईला म्हटले, " हिने डोळे उघडले बर का !—मीनाला आणा इकडे लवकर !" आई पुढे आली न् तिने पाढऱ्या शुभ्र चिरगुटात गुडाळलेला तो चिमुकला जीव हळूच माझ्याजवळ धरला त्याला पहाण्यासाठी मी उत्कठेने मान वळवली त्याबरोबर त्याच्या उबदार गालाचा स्पर्श माझ्या गालाला होऊन माझ्या अगावर रोमाच उभे राहिले, मला डोळ्यावर झापड आल्यासारखी वाटली क्षणभराने मी पुन्हा डोळे उघडले त्याबरोबर खाली वाकून मला म्हणावयाचे झालें, " अगदी हुबेहूब तुझ्यासारखे सुदर डोळे आहेत तिचे अनू !—मी नावसुद्धा ठेवून टाकल तिच—मीना, मीनाक्षी !"



त्या सहा महिन्यात किती फरक पडला त्याच्या वृत्तीमध्यें ! मला केव्हां केव्हां असें वाटतें कीं, आमच्या आयुष्याला पुढें जें अनिष्ट वळण लागलें, त्याची सुरवात या पहिल्या बाळतपणातच झाली. पहिले दहा दिवस स्वारी

घरातच बसून होती माझ्याजवळ सारखी माझ्याशी गप्पा मारावयाच्या, मला कांहीं तरी वाचून दाखवावयाचे आणि कालिंदी आल्यावर पडल्यापडल्याच पत्ते खेळावयाचे आईला अतिशय सकोच न् त्रास होत असे त्याच्या या वर्तनामुळें ती एक दिवस रागानें मला म्हणाली शेवटी, "हें काय प्रेम म्हणायच की वेड? जुन्या माणसाना काय कमी माया असते का एकमेका-विषयी? पण तुम्हा नव्या माणसाचे मुळीं सारेच प्रकार विचित्र वाहवतील तिकडे वाहवतील कुठल्याही गोष्टीला धरबध म्हणून नाही याच्या या असल्या वागण्यामुळें साऱ्या घरादाराला शिवाशिव!" मला सुद्धा पसत नव्हते त्याचें ते वर्तन कधी न येणारी आई केवळ माझ्यासाठी म्हणून घरी रहाव-याला आलेली तिच्या भावनाना जपावयाला नको होते का थोडे तरी? पण, एकादी गोष्ट त्याच्या मनाने एकदा घेतल्यावर, मग तिथे काही उपयोग होत नसे युक्तिवादाचा परतु बारशानतर त्याचे ते घरी रहाणें निराळ्याच कारणामुळें कमी झालें सर जीवनलालाच्या हाताखाली काम करण्याची सधि त्याना मिळावी, म्हणून आप्पाची पुष्कळ दिवस खटपट चालली होती त्या त्याच्या प्रयत्नाला यश येऊन सरसाहेबाचे मदतनीस म्हणून स्वारी काम करावयाला लागली पण, त्या निमित्तानें त्याचे मन जें एकदा पागल्यासारखे झालें, ते कायमचेंच पहिले काहीं दिवस त्याच्या वृत्तीत न् वर्तनात पडत चाललेला फरक लक्षात नाही आला माझ्या फारसा कारण मी स्वत च्या प्रकृतीच्या विवचनेंतच चूर होते जवळ जवळ महिनाभर. मीनाचा जन्म झाल्यावर आठ दिवसानी माझा उजवा पाय अधू झाल्याचे ध्यानात आले माझ्या पहिल्या प्रथम भिऊनच गेलें मी त्याची ती बधिरता पाहून पण बाळतपणात पुष्कळदा असा तात्पुरता पगुपणा येत असल्याचे सागून आईने धीर दिला मला परंतु, सतत तीन आठवडे तशा त्या पगु स्थितींत गेल्यामुळें, मला राहून राहून वाटे, हे कायमचें तर व्यग होऊन बसणार नाहीं ना? पायाची सारी शुश्रूषा सध्याकाळीं सुईण आल्यावर होत असे त्यामुळे कोर्टांतून घरी यावयाला रोज होणारा उशीर लक्षात नाहीं आला माझ्या प्रथम. पण ती काळजी थोडी कमी होताच त्याच्या वृत्तीतला फरक हळुहळू ध्यानात येत चालला, व त्या शारीरिक व्याधीपेक्षांही मला जास्त काळजी वाटू लागली त्याच्या त्या मनोवृत्तीची एक दिवस रात्रीं

घरीं यावयाला दहा वाजून गेल्यामुळें मी साहजिकच विचारले, "आताशा उशीर का होतो रात्री घरी यायला इतका?" "करायच आहे काय घरी येऊन लवकर? तुमच दार लावून काही तरी चोळण, शेकण चाललेल असत, न् मीना पाळण्यात झोंपलेली असते —म्हणून कोर्टातल काम आटपल्यावर क्लबात जातों मी अलिकडे," असे उत्तर मिळाले मला पण माझे समाधान नाही झाले त्या उत्तरानें मला सारखे वाटे, माझ्या सहवासाच्या लालचीनें जी व्यसनें इतक्या दिवस आटोक्यात होतीं, ती आता वाढली तर नसतील? नाहीं तर क्लबात याचे मन एवढे रमण्याचे काय कारण? सध्याकाळी सहा वाजल्यापासून सारखे डोळे लागून रहावयाचे माझे त्याच्या वाटेकडे आई मला केव्हा केव्हा हसून म्हणत असे, "इतक का नवल वाटत तुला त्याच्या क्लबात जाण्याच?—याना तर घरी परत यायला केव्हा केव्हा अकरा सुद्धा वाजून जायचे पण तुमच्या नव्या माणसाच्या की नाही साऱ्याच गोष्टी जगावेगळ्या!" आप्पावरून जगातल्या साऱ्या पुरुषाविषयी मत बनविणाऱ्या तिच्या भाबड्या मनाला काय कल्पना माझ्या काळज्याची! शिवाय रोज रात्री जेवण झाल्यावर विडा खाण्याच्या निमित्ताने पधरा वीस मिनिटे तरी येऊन बसावयाचे असे माझ्या खोलीत, व मीना जागी असली, म्हणजे तिला घ्यावयाचाही प्रयत्न होत असे कौतुकाने त्यामुळे आईला साहजिकच अनाठायी वाटत असे माझी ती काळजी पण माझी शका खरी ठरली लवकरच. एक दिवस रात्री यावयाला फारच उशीर झाल्यामुळे बाहेरून जी स्वारी आली, ती कपडे वगैरे न उतरता तशीच शिरली माझ्या खोलीत मीना माझ्या माडीवर निजलेली होती, व मी इतकी विचारात गढलेली होते कीं, ते केव्हा खोलीत आले हें कळलें नाही मला मुळीच माझ्या शेजारी येऊन बसल्यावर खाटेच्या हलण्याने दचकून भानावर आले मी त्याबरोबर हसून विचारावयाचें झाले, "कसला विचार चालला होता एवढा?" ते शब्द माझ्या कानावर पडत असतानाच जोरानें चाललेल्या त्याच्या श्वासातला मादक गध मला जाणवला, व मी अगदीं सथपणाने त्याच्याकडे बघत म्हटले, "आपल्याला रोज घरी यायला उशीर का होतो इतका याचा विचार करीत होतें मी खरच, आणखी किती दिवस चालणार आहे हे अस?" त्याबरोबर माझा हात

आपल्या हातात घेऊन मला म्हणावयाचे झालें, " तू या खाटेवरून उठेपर्यंत ! —तू एकटी असलीस, तरी तुझ्या मनाला ही करमणूक आहे अन् सदोदित अंगाला बिलगलेली पण मला कसली करमणूक आहे ? घरी आल तरी पुस्तकात डोकें खुपसून बसायच की नाहीं वर जाऊन ? तीन महिने होतील आता —मीच तुला विचारतो आणखी किती दिवस चालायच अस ! " मी बोलले नाहीं काही यावर त्या दिवशी रात्री बारा वाजेपर्यंत माझ्या खोलीत बसून गप्पा मारल्या स्वारीने माझ्याशी निजलेल्या मीनाला मुद्दाम उठवले झोंपेतून, व तिचे रडें जेव्हा थांबेना, तेव्हा वरती आणखी मला म्हणावयाचे झाले, " तुम्ही बायका मुलाच सार प्रेम स्वत बळकावून बसता,—नवऱ्याच्या वाट्याला येऊ देत नाही त्यातल काही ! " ' कस येईल ? मूल जन्मण्यापूर्वी आईच्या शरीरात रहात असत व जन्मल्यानतरही तिच्या शरीरावरच पोसत असत तुम्हा पुरुषाना काय ? बाहेरून आल्यावर उचलून एकाद दुसरा मुका घेतला मुलाचा की झाले मोकळे ! कुणाचही झाल तरी प्रेम काही झिजल्यावाचून मिळत नसत ! " मी म्हणालें माझ्या समाधानाकरिता या साऱ्या गोष्टी चालल्या होत्या, हे लक्षात आले माझ्या दुसऱ्या दिवशी दुपारी कालिदी आल्यावर तिला मी आपल्या मनातले हें दु ख सागितले सारे तेव्हा ती सुस्कारा टाकून मला म्हणाली, " तो पहिल्यापासून impetuous आहे अगदी जिकडे झुकेल तिकडे झुकेल त्याच मन लहान मुलाच्या मनाला जस आपण जपतो ना, तस जपल पाहिजे त्याच्या मनाला त्यान सागितल तेच खरं —त्याच मन इतर कशात रमू नये अशी जर तुला इच्छा असेल, तर तू लवकर बरी होऊन या खोलींतून बाहेर पड एकदा !—" ती गेल्यावर किती वेळ तरी मी विचार करीत पडलें होते अथरुणावर बाळतपणामुळें मी तीन महिने दुरावले, तर इतका फरक पडला त्याच्या वृत्तीत ! किती दिवस ठेवता येईल त्याचे ते अवखळ मन मला आपल्या मुठीत ? माझ्याविषयीची त्याची ही आसक्ति जोपर्यंत कायम आहे, तोपर्यंत ठीक आहेत साऱ्या गोष्टी पण ती आसक्ति जर उद्या कोणत्याही कारणामुळें कमी झाली तर ? मला कल्पना करवेना माझ्या भवितव्याची !

— ❦ —

मला कधीं कधीं हेवा वाटत असे मीनाचा. तिला त्याचा इतका विलक्षण

ळला होता की, कोर्टातून आल्यापासून तो पुन्हा कोर्टात जाईपर्यंत सारा वेळ त्याच्या मागे मागे असावयाची ती ज्या त्याच्या टेबलावर पूर्वी दुसरें कसले चिठोरेंही पडलेले त्याना खपत नसे, त्यावर आता मीनाची खेळणी नेहमी अस्ताव्यस्त पडलेली असावयाची आणि, मी कधी नोकराला ती उचलावयाला सागितली, तर मलाच उलट म्हणावयाचे, " राहू देत ती तिथच तिचा हक्क आहे एव्हापासून माझ्या टेबलावर सत्ता गाजवायचा ! तीच चालवणार आहे पुढ प्रॅक्टिस माझी —काय मिनू खर का नाही !" अशा वेळी तिच्या तोडून कोणत्याही प्रकारचा शब्द जरी सहज निघाला, तरी त्यातून नाना प्रकारची भविष्ये काढणें होत असे स्वत कडून " व्यर्थी अधिकचि अर्थ वसे," या केशवसुताच्या उद्गाराची आठवण व्हावयाची मला त्याचे ते कौतुक पाहून ते कोर्टात गेले, म्हणजे दिवसभर तिची काही तरी किरकिर चाललेली असावयाची कोर्टातून आल्याबरोबर आधी उचलून घ्यावयाची असे तिला, व तेव्हापासून ती जी एकदा त्याना बिलगावयाची ती रात्री झोप येईपर्यंत त्या अवधीत तिला दूध जरी घालावयाचे झाले, तरी ते स्वत च घालणे होत असे त्याना तिला दूध घालताना बघून मी एकादे वेळी थट्टेनें म्हणत असे, " आपल्याला मुल इतकी चागली साभाळता येतात हे जर मला माहित असत, तर मीनासाठी दाई ठेवली नसती मी मुळीच !" त्यावर ते हसून मला म्हणाले, " तू अशी पगु होऊन बसल्यावर मीच नको का साभाळायला तिला आता !" सहा महिने सतत केलेल्या शुश्रूषेने माझा पाय सुधारला खरा, पण त्याच्यात पूर्वी इतके श्रम करण्याची शक्ति मात्र आली नाही मुळीच त्यामुळें घरातल्या घरात सुद्धा मला हिडवत नसे फारसे डॉक्टरानी असे सागितलें होते की, दुसऱ्या बाळतपणानतर कदाचित् सुधारला तर एकदम सुधारेल तो आणि, मीनाला पुरते दीड वर्ष होते न होते, तोंच दुसऱ्या बाळतपणाची तयारी झाली मला आशा होती कीं, बाळतपणात जशी सहा महिने मला विश्राति मिळाली, तशीच पुढे आणखीही सहा महिने मिळून पाय पूर्वीसारखा नीट होईल पुन्हा माझा. पण, या खेपेस डोहाळे लागल्यापासूनच तो इतका दुखावयाला लागला की, मी जन्माची पागळी होतें की काय अशी धास्ती घेतली माझ्या मनाने आता मला पुष्कळदा असें वाटतें की, सततिनियमनाचे उपाय जर त्या वेळी आजच्या इतके सुलभ

असते, तर माझ्या संसाराचा जो विचका झाला या बाळंतपणामुळे तो खचित टळला असता पुरुषाचे प्रेम कितीही उत्कट असलें, तरी निदान तारुण्यात तरी अनेक अपेक्षा असतात त्या प्रेमाला स्त्रीचे मन हे संसारात गुरफटून जाते तेव्हाच पण पुरुषाच्या बुद्धीच्या विकासाला म्हणा किंवा विलासाला म्हणा संसाराचे परसू कधीच पुरेसे पडत नाही मला केव्हा केव्हा असे वाटते की, अनेक वर्षांच्या संस्कारामुळे स्त्रीपुरुषाच्या मनोधर्मांत हा फरक पडला असावा स्त्रीचा मूळचा स्वभाव पुरुषासारखाच असेल कदाचित् पण निसर्गाने गर्भधारणेची जबाबदारी तिच्यावर लादल्यामुळें व त्याहीपेक्षा तिच्या त्या अडचणीचा फायदा घेऊन पुरुषाने तिच्या जीवनाला मर्यादा घातल्यामुळे पंख कातरलेल्या पाखरासारखी झाली तिच्या मनाची अवस्था पण पुरुष मात्र होता तसाच कायम राहिला मानवी संस्कृति आणि सुधारणा यांची इतकी प्रगति झाली, परंतु तो मात्र भटक्या आणि शिकारीच राहिला आहे मनाने पूर्वीसारखा बदलत्या परिस्थिती-प्रमाणें त्या शिकारीचे स्वरूप न् त्या भटकेपणाची क्षेत्रे बदलली, एवढेच काय तें तारुण्याची रग जोंपर्यंत त्याच्या रक्तात कायम असते, तोंपर्यंत त्याला तृप्ति म्हणून कशी ती माहित नसते मुळीच जगातली सारी संपत्ति जरी त्याच्या पायावर आणून ओतली, आणि जगातले सारे सौंदर्य जरी त्याच्या सेवेत अहो-रात्र राबलें, तरी त्याच्या शिकारी मनाचे समाधान नाही व्हावयाचें कधी त्याच्या आवडत्या स्त्रीवर त्याचे कितीही प्रेम असले, तरी अखेर ती निवळ उपभोगाचीच वस्तु होऊन बसते त्याच्या या स्वभावामुळे तिचा सहवास थोडा जरी अंतरला, तिचे यौवन थोडे जरी डागळले व त्याच्या वासनांचे कोड पुर-विण्यात तिच्याकडून थोडी जरी कसूर झाली, तरी लगेच मनातून उतरते ती त्याच्या, माती होते तिच्या वैवाहिक जीवनाची पुरुषाचे आराधन म्हणजे शिवव्रत आहे जसे काही! हजार बिल्वदळात एक जरी पान वेडें वाकडे निघालें, तरी वाया जावयाची साऱ्या व्रताची तपस्या मी पहात होते, बाळंत-पणातून माझी प्रकृति थोडी सावरल्यावर पुन्हा पूर्वीसारखे वागावयाचें झाले माझ्याशीं काहीं दिवस एकदा तर बोलूनही दाखवलें मला प्रेमाच्या भरात, " मला आशा नव्हती तुझी प्रकृति इतकी सुधारेल म्हणून मीनाच्या जन्मापासून तुझा पाय अधू झाला म्हणून तू दोष देतेस तिला अनू!—पण किती

उजळ न् मोहक दिसतेस तू आताशा ! " परंतु, डोहाळे लागून माझा पाय पुन्हा अधू झाल्यापासून, माझ्या उपयोगाबरोबरच माझ्याविषयीची आसक्तीही हळुहळू कमी होत गेली प्रेमात तसे फारसे अतर पडलें नव्हते, ही गोष्ट खरी, पण त्यातली उत्कटता मात्र उडून गेली सारी आणि उत्कटता एकदा नाहीशी झाल्यावर मग प्रेमात गोडी ती काय उरते ? ज्या लहान सहान गोष्टीमुळे जीविताला रम्यता येते, त्याची माधुरी प्रेमाच्या उत्कटतेवरच नसते का अव-लबून ? वर वर पहाणाराला त्याच्या वृत्तींतला तो फरक जाणवला नसता मुळीच पण, इतर कोणतीही गोष्ट जरी नव्हे, तरी आठवड्यातून निदान दोन तीनदा तरी त्याच्या तोंडाला येणारा तो मादक वास !—तो वाफाराच वाटत असे मला अगदीं माझ्या जिवाची होरपळ करणारा त्या वासाच्या भीतीने मी कितीदा तरी, इच्छा न् शक्ति ही दोन्हीही नसताना, रात्री घालविल्या आहेत त्याच्या सहवासात मला कितीही त्रास झाला तरी पुरवला. पण, सकाळीं उठल्याबरोबर ते अतृप्ततेने माझ्याकडे बघणारे त्रस्त न् तारवटलेले डोळे नकोत पहा-वयाला, असे वाटत असे मला फूल हातात खेळवून मनसोक्त हुगणाऱ्या माणसानें जसे ते इतक्या लवकर कोमेजल्याबद्दल मागाहून हळहळावे, तसें होत असे त्याचे त्याना सुद्धा अतृप्ततेचा राग येत असे केव्हा केव्हा आपल्या, व अशा वेळीं मला जवळ घेऊन म्हणावयाचे असे, " मी फार छळतो नाही ग तुला ! पण काय करू ? माझा ताबा नाही स्वत च्या मनावर मुळीच ! " त्याच्या त्या उद्गारानीं माझ्या मनाला विसर पडत असे आपल्या साऱ्या वेदनाचा त्यांना सुख देण्याच्या, मोहापासून दूर ठेवण्याच्या त्या धडपडीमुळें बेसुमार ताण पडला माझ्या प्रकृतीवर आणि त्या धडपडीतच एकाएकी जन्माला आला विजय दिवस पुरते भरण्यापूर्वी !



त्या बाळतपणातून मी उठलें, त्या वेळीं किती फरक पडला होता माझ्या परिस्थितींत ! डॉक्टरानी केलेल्या भाकिताप्रमाणें माझा पाय बरा झाला खरा, पण अवेळीं घडलेल्या त्या प्रसूतीमुळें माझें तारुण्य नाहींसें झालें जवळ जवळ रडण्याचें सुद्धा पुरतें त्राण नसलेला तो अपग जीव आणि त्याला जन्म देऊन यौवनाला पारखी झालेली मी त्याची आई !—आम्हाला पहावयाला रोज

संध्याकाळी ते खोलीत आले, म्हणजे मरणप्राय वेदना होत असत माझ्या जिवाला काय वाटत असेल आम्हाला बघून त्याच्या मनाला? त्याची ती शोधक, ती सौंदर्यप्रेमी दृष्टि त्या दुबळ्या जिवाला पाहून विषादाने मागें फिरली की, भडभडून येत असे मला अगदी! मीनाचें केवढे कौतुक होते त्याना पहिल्या दिवसापासून! पण या मुलाला बघण्याचीसुद्धा उत्सुकता दाखविली नाही त्यानीं फारशी तो अपुऱ्या दिवसाचा जन्माला आला, यात त्याचा काय अपराध होता? पण सौंदर्यलोलुप माणसाना कधी तरी विवेक असतो का? मला केव्हा केव्हा वाटतें की, जगात जर अत्यत निर्घृण, अत्यत हृदयशून्य असें काहीं असेल, तर ती सौंदर्याविषयीची आसक्ति त्या आसक्तीनें पछाडलेला मनुष्य माणुसकीला मुकतो, सहृदयतेला पारखा होतो मुलाला बघताक्षणीच त्याच्या दृष्टींत न् चर्येत पडणारा फरक पाहिला, म्हणजे माझ्या मनाला चरका बसत असे अगदी मला पुन पुन्हा वाटे, आज जो विषाद त्याना याच्याकडे बघून वाटतो, तोच उद्या माझ्याकडे पाहून कशावरून वाटणार नाही? त्या बाळतपणाचा माझ्या शरीरावर झालेला विदारक परिणाम त्याच्या लक्षात नाही आला एकदम पण त्याने माझे सारें शरीर खिळखिळें करून टाकल्याची मला मात्र जाणीव होती पुरती लग्नाला उणी पुरी चार वर्षें झाली नाहीत, तोंच मी तारुण्य अर्धेमुर्धें गमावून बसलें आणि ते मात्र चार वर्षांपूर्वी होते तितकेच आजही तरुण!—कशी आवडणार मी त्याना यापुढे? आज जो निष्प्रेम दृष्टिक्षेप माझ्या मुलाच्या वाट्याला आला आहे, तोच उद्या माझ्याही वाट्याला येणार! मातृपद, मातृपद! कवीनीं खुशाल गावी त्याची महती पण, त्याच्या प्राप्तीमुळें स्त्रीवर ससारातल्या साऱ्या आनदाला आचवण्याचा प्रसग पुष्कळदा येतो, याची कल्पना तरी असते का त्याना? लग्नाच्या वेळीं प्रत्येक तरुणाला अप्सरा वाटत असते आपली बायको मूल झालें कीं, तिच्याविषयींच्या त्याच्या त्या साऱ्या कल्पना कोलमडून पडतात आणि तिच्या स्त्रीत्वाची रुक्ष जाणीव तेवढी शिल्लक उरते त्याच्या मनात प्रत्येक मुलागणिक तिचें तारुण्य लोपत जातें आणि त्याबरोबरच त्याच्या प्रेमालाही ओहटी लागते झपाट्यानें अशा स्थितींत मातृपद हा शाप म्हणावा कीं वर? ज्याच्यामुळें स्त्री पुरुषापेक्षा लहान असून सुद्धां त्याच्या आधीं वयस्क व म्हणून त्याला अप्रिय होते, त्या

मातृपदाला वर कसे म्हणावयाचे? संस्कृत कवीनीं जेव्हा स्त्रीला केळीची उपमा दिली, तेव्हा त्याच्या स्वप्नातही आलें नसेल की, स्त्रीचें जीवन हें थोडें बहुत केळीसारखेंच असते फुलारण्याच्या वेळी रसरशीत दिसणारी नाजूक, डौलदार केळ!—पण एकदा लगर लागल्यानतर तिचे ते शरीर जसे जगावयाला नालायक ठरते, तशीच मूल झाल्यावर स्त्रीची अवस्था होत नाही का? ती मनुष्य असल्यामुळेंच केवळ केळीप्रमाणें तिला कापून तोडून टाकीत नाहीत, एवढेच! पण त्यानतर तिचे सुख, तिचे अस्तित्व पुरुषाच्या दयाबुद्धीवरच नसतें का अवलबून? स्त्रीचे भगुर तारुण्य आणि पुरुषाच्या दुरत वासना! काय नवल पुरुष अशा स्थितीत बहुस्त्रीक झाला तर?—पण प्रेमाला जर काहीं अर्थ असेल, साहचर्याला जर प्रामाणिकपणाची काही गरज असेल, तर पुरुषानें थोडे तरी नको का स्वार्थत्यागी, सयमी व्हावयाला? आई व्हावे लागल्यामुळें स्त्रीच्या शरीराचे सौष्ठव नाहीसे होते, याबद्दल तिच्या जोडीदाराने तिच्याविषयीं कृतज्ञता बाळगावयाची की तिचा कटाळा करावयाचा? पण स्त्रीच्या तारुण्याचा बळी घेऊन स्वत तरुण राहिलेल्या पुरुषाजवळ इतकी कृतज्ञता, इतकी सहृदयता असते कुठे? तिच्या यौवनाचे आकर्षण नाहींसें होताच त्याचें ते अतृप्त, शिकारी मन लगेच दुसरें आकर्षण हुडकण्याच्या मागे लागते — बाजेवर पडल्या पडल्या अशा तऱ्हेचे किती तरी विचार मनात येऊन तापून जात असे माझें डोकें अगदी वास्तविक कोर्टातून आल्याबरोबर माझ्या खोलींत येऊन बसण्याचा नियम चुकला नाही कधीं पण त्या बसण्यात पूर्वीची गोडी मात्र उरली नव्हती मुळीच गेल्या चार वर्षांत ज्या गोष्टी माझ्याविषयींच्या आसक्तीमुळे कधीं फारशा केल्या नव्हत्या, त्या साऱ्या आता नित्याच्या होऊन बसल्या होत्या, हें काय दिसत नव्हते का मला? माझ्या डोळ्यासमोर काही होत नसे, ही गोष्ट खरी पण, शनिवारी क्लबातून अपरात्री यावयाचे न् जेवल्याशिवाय व क्वचित् मला भेटल्याशिवायही परस्पर वर जाऊन निजावयाचें,—मला कळत नव्हता का या वागण्याचा अर्थ? गेल्या खेपेस मला बरें वाटत नसलें तर हट्टाने जवळ येऊन बसावयाचे असे पण आता मी स्वत· होऊन जवळ गेलें, म्हणजे केव्हा केव्हा मला म्हणावयाचे, "कशाला तू त्रास करून घेतेस माझ्यासाठीं स्वत.ला? तुझी प्रकृति सुधारली नाहीं अजून नीट!" पण

त्या उद्गारात अनुकंपेपेक्षा उबगच जास्त ध्वनित होतो, असें वाटत असे मला आणि विजयला घेऊन मी जवळ गेलें म्हणजे तर बघावयालाच नको एकदा स्वारी खुषींत आहे असें पाहून मी कौतुकानें त्याला पुढें केला असता म्हणावयाचें झालें, " किती लिवलिवीत आहे ग याच अंग ?—हात लावायची सुद्धा भीति वाटते मला नाहीं तर मीना किती खुटखुटीत न् चपळ आहे पहिल्यापासून ! कस दिवसभर घेऊन बसवत याला कुणाला ठाऊक तुला !" " हाच फरक आहे स्त्रियात न् पुरुषात !—मूल न् बायको हीं जोंपर्यंत चागलीं दिसत असतील, तोपर्यंतच हवींत पुरुषाना, नाही तर दोहोंचाही अगदी कंटाळा !" मी म्हणालें " खर आहे तुझ म्हणण थोडस पण तू कशीही दिसलीस तरी मला कटाळा नाही यायचा तुझा कधी अनू !" ते हसत हसत म्हणाले आणि तें काही अगदीच खोटे नव्हते माझी प्रकृति जसजशी सुधारत गेली, तसतसे थाऱ्यावर आले त्याचें मन पण मला नेहमी वाटे, किती दिवस अशा रीतीनें निभाव लागेल माझा ? मी चागली आहें तोपर्यंत त्याचे मन राहील माझ्या मुठीत पण पुन्हा !—ती कल्पनासुद्धा दु सह होत असे मला मुलाच्या आगमनानें ज्याच्या ससारात आनद उत्पन्न होत असेल, ज्याच्या प्रेमाला स्थैर्य येत असेल, त्याची गोष्ट निराळी पण मी कुठे दैववान् होते तितकी ? त्यांची ती माझ्याविषयीची आसक्ति जितकी लोभनीय तितकीच भीतिप्रद वाटत असे मला विजयला मांडीवर घेऊन मी थोपटीत असले, म्हणजे त्याचें ते दुबळें शरीर बघून आपोआप अश्रु येत असत डोळ्यात माझ्या आईबापाना एकमेकाविषयी वाटणाऱ्या आसक्तीचे प्रायश्चित्त मुलाना अशा रीतीनें भोगावे लागावें, हा कुठला न्याय ? मीना म्हणते तेच खरें,—स्त्रीपुरुषाना वाटतें आपण परस्परावर मोठे प्रेम करतों म्हणून पण सृष्टीची परपरा चालू ठेवण्याच्या हव्यासानें प्रेरित झालेला निर्दय निसर्ग त्याना एकत्र आणून आपला कार्यभाग उरकून घेतो, इतकेंच ! यापेक्षा जास्त खोल न् व्यापक अर्थ जर त्या आसक्तीला, त्या प्रेमाला असता, तर मला त्याची इतकी भीति का वाटली असती ?



कुसुमच्या वेळी मी बाळतपणात असतानाच मनूचें पत्र आलें अचानक माझें

लग्न झाल्यापासून आमचे व त्याचे सबध बहुतेक तुटल्यासारखेच झाले होते पण आमच्या दोघीच्या प्रेमात मात्र अतर नाही पडले कधी ती पुण्याला असेपर्यंत तिची पत्रे नियमानें येत असत मला, व मीही तिला मधून मधून पैसे पाठवीत असें जरूरीप्रमाणें पण मॅट्रिकची परीक्षा आटोपून मुबईस आल्यावर मला येऊन भेटण्याची सुद्धा चोरी झाली तिला परतु, आप्पा वारले, त्या दिवशीं मात्र मनाचा हिय्या करून ती दिवसभर आमच्याकडे राहिली किंबहुना, तिचें साह्य मला मिळाले, म्हणूनच मी पार पडले त्या प्रसगातून सकाळी चहा पिता पिता छातीत कळ आल्याचे निमित्त होऊन आप्पा बेशुद्ध पडले एकदम आम्हाला निरोप पोचून आम्ही येईपर्यंत तीच होती आईच्याजवळ, व नतर आमच्या घरी रहावयाला येण्याच्या बाबतीत आईचे मन वळविण्याच्या कामींही तिची मला फार मदत झाली आप्पानीं आईला कुठेही क्षेत्राच्या जागी सुखानें रहाता यावे अशी व्यवस्था करून ठेवली होती मृत्युपत्रात पण, तिने मला सोडून एकटीने दु खात आयुष्य घालवावे, ही कल्पना सहन होईना मला मी तिला परोपरीने विनवून सागितले, " आमच्या बगल्यावर तुझी सारी स्वतत्र वेगळी सोय करून देऊ पण तू सोडून नको जाऊ मला " परतु ती काहीं कबूल होईना आमच्याजवळ रहावयाला शेवटी मनूने जेव्हा फार गळ घातली, तेव्हा आप्पाच्या वर्षश्राद्धापर्यंत आमच्यापाशी रहावयाला तयार झाली ती पण आप्पाच्या मागें फार दिवस काढले नाहीत तिनें. आम्हा अलिकडल्या माणसाना पुष्कळदा असे वाटते की, जुन्या काळच्या नवराबायकोना प्रेम ही काय चीज असते, हे माहीत नव्हते मुळीच पण माझ्या एकदाच निदर्शनाला आलेला आप्पाचा तो आईविषयीचा आदर आणि त्याच्या मृत्यूमुळें हाय खाऊन तिने स्वत वर ओढवून घेतलेले मरण !—त्याच्या इतके उदात्त, इतके हृदयस्पर्शी मी पाहिले नाही माझ्या आयुष्यात दुसरें काही त्याना परस्पराविषयी वाटणारा जिव्हाळा फसफसून व्यक्त झालेला कुणाला दिसला नसेल कधी हे खरें, पण, जमिनीच्या अतरगातून वहाणारे झिरपे जसे वरल्या वनस्पतीना हिरवेगार ठेवतात, तसे त्या कुणाच्या दृष्टीला कधी न पडणाऱ्या जिव्हाळ्यामुळे सुखमय झाले होते त्याचे जीवन आपल्या मनातला हा एकमेकाविषयीचा जिव्हाळा त्यानी उभ्या आयुष्यात एका शब्दाने तरी

बोलून दाखविला होता की नाही कोण जाणे ! पण आप्पा वारल्यावर त्याची उत्कटता तीव्रतेने प्रत्ययाला आली माझ्या त्याना आवडणाऱ्या साऱ्या वस्तु तर वर्ज केल्याच तिने त्या दिवसापासून पण, जें एक वेळचे अन्न ती रात्री घेत असे, तेही कधी घेतलें नाही तिने ठराविक घासापेक्षा जास्त आणि त्या प्रत्येक घासागणिक अश्रु गळावयाचे तिच्या डोळ्यातून ! तिची ती अवस्था बघून मला केव्हा केव्हा वाटे, ही जर आप्पाच्या आधी गेली असती, तर त्याना झालें असते का इतके दु:ख तिच्याबद्दल ? पण एक दिवस जेवताना तिने सागितलेल्या गोष्टीमुळें माझी खात्री झाली त्या बाबतीत अगदी —आप्पा कॉलेजात असताना वडिलाच्या आग्रहामुळे स्वत:च्या इच्छेविरुद्ध त्याना लग्न करावे लागले तिच्याशी त्यातून तिला र ट फ सुद्धा करता येत नव्हते त्या वेळी ! ती गोष्ट लक्षात आल्यावर तर फारच वाईट वाटले त्याना पुढे माझ्या आजीने आईवरील रागाच्या भरात एकदा त्याना म्हटले, “असल्या या अशुद्धाळ बायकोबरोबर ससार करण्याऐवजी तू दुसर लग्न कर आपल ! ” आप्पा उलटून बोलले नाहीत त्यावर काही पण रात्री त्याची भेट झाल्यावर आईला रडताना पाहून त्यानी तिच्या पाठीवरून हात फिरवून म्हटले, “आईच बोलणें मनावर घेऊ नकोस तू अगदी !—मी जसा तुला एकटा एक आहे, तशीच तूही एकटी एक रहाशील मला जन्मभर ! ” परस्पराविषयीची अशा प्रकारची निष्ठा शिकलेल्या किती नवराबायकोत आढळेल आज ? आप्पा-विषयींच्या त्या दु:खाने चार महिन्याच्या आतच बळी घेतला तिचा अखेर ती वारल्याचे कळल्यावर मनू भेटावयाला येईल अशी अपेक्षा होती मला पण त्यानतर चार महिन्यानी पाठविलेल्या या पत्रात तिनें आपली करुण कहाणी लिहिली होती सारी वास्तविक ती आता मॅट्रिक झालेली असल्यामुळें तिला शिक्षकिणीची नोकरी मिळणे काही कठीण नव्हते पण कुलीनपणाच्या नसत्या कल्पने दिनू तिला नोकरी करू देईना, व भावजईच्या घालून पाडून बोलण्यामुळे तर तिला ते मेलेले अन्न खाणे दु सह झाले होते अगदी बिचारीने आपल्या पत्राचे उत्तर मागितले होते, तेसुद्धा एका मैत्रिणीच्या पत्त्यावर. तिच्या पत्रातली ती सारी हकिकत वाचून मला असे वाटले की, तिला इथेंच रहावयाला बोलावून तिच्या पुढील शिक्षणाची व्यवस्था करावी

काही तरी तिथे राहिल्यानें तिचा जन्म फुकट जाणार हे दिसतच होतें स्पष्ट माहेरी कौतुक फक्त नादत्या मुलीचे होत असते वृक्षाचा आसरा सुटून भुईवर पडलेली वेल जशी पाने कुजून झडून वठून जाते, तशी स्थिति होते माहेरी परत आलेल्या गतधवेची म्हणून माझ्या मनात आले की, तिला जर इथे रहावयाला बोलाविली, तर माझ्या दु खी मनाला विरगुळा होईल थोडासा व तिच्याही शिक्षणाची सोय करता येईल काही तरी पण, त्याना माझा हा विचार कितपत पसत पडेल, याची शका आली मला कारण आई रहावयाला आल्यावर नेहमीप्रमाणे अनिर्बंध वागता येत नाहीं म्हणून स्वारी मनातून नाराज असे थोडीशी अशा स्थितीत मनूसारखी अगदीच तिऱ्हाईत स्त्री घरी राहावयाला आलेली कशी आवडणार ? आणि रात्री मी तो प्रश्न काढताच माझी शका खरी असल्याचा अनुभव आला लगेच मला हसून म्हणावयाचे झालें, “ मुलबाळ होऊन ससार अर्धाअधिक झाला, तरी बायकाचा माहेराकडचा ओढा काही कमी नाही होत कधी स्वत ला जरी माहेरी जाऊन रहाण शक्य नसल, तरी माहेरच कोणी तरी माणूस आपल्याजवळ येऊन रहाव अस वाटत असत त्याना सारख ” त्यावर मी म्हटलें, “ पुरुषावर जर सासुरवाडीला जाऊन रहाण्याची पाळी आली असती, तर कळल असत त्याना बायकाना इतकी माहेरची माया का वाटते तें ! स्वत च्या घरी राहून दुसऱ्याच्या मुली अहोरात्र सेवेत राबवून घ्यायला मिळत असल्यावर कशाला येईल त्याना स्त्रियाच्या मनाची कल्पना ! हें पहा, आपली जर इच्छा नसेल, तर माझा काही आग्रह नाही तिला बोलवायचा बिचारीची कुठ सोय होण्यासारखी नाही म्हणून वाटत मला इथ तिला बोलवावस ” त्यावर एकदम किंचित् गभीर होऊन मला म्हणाले, “ तुझी इच्छा मोडण्यात आनद आहे का मला अनू ? पण तुझा तूच विचार कर — घरात आणखी कुणी येऊन राहिल्यान आपली हल्लीची स्वतत्रता राहिल का कायम साऱ्या बाबतीतली ? येणाऱ्या माणसाला आपला सकोच व्हायचा, आपल्याला त्याचा व्हायचा !” “ पण उद्या मुल मोठीं झाल्यावर आपली हल्लींची स्वतत्रता रहाणार आहे का अशीच कायम ?” मी विचारले त्यावर उद्वेगानें म्हणावयाचे झाले, “ मुले मोठी झालीं तरी तीं स्वत चीं असल्यामुळ त्याची अडचण नाही वाटायची कधीं.—पण मला वाद घालायचा नाहीं तुझ्याशी तुला बोलवायच

असल तर बोलाव तू आपल्या मैत्रिणीला पण मग मात्र तक्रार करू नको कधीं या गोष्टीबद्दल!"

- ❦ -

मनू रहावयाला आल्यावर खरोखरीच संकोच उत्पन्न झाला आमच्या वागण्या-मध्यें ती आली त्या दिवशी मी रीतसर ओळख करून दिली दोघांची पण, ती माझ्या खोलीत असली, म्हणजे फिरकणें होत नसे त्या बाजूला, व जेवताना सुद्धा पूर्वीसारख्या गप्पागोष्टी चालत नसत आता संध्याकाळीं घरी आल्यावर मीनाला घेऊन फिरावयाला जावयाचे व रात्रीं जेवण झाल्यावर माडीचा जिना गाठावयाचा,—असा अगदीं आई होती त्या वेळचा कार्यक्रम झाला सुरू पुन्हा. आई असताना मी जेवल्याबरोबर वर जात असे त्यांच्या मागोमाग. पण, मनूच्या बाबतीत तसे वागणें वाईट दिसेल, या भीतीने मी रात्रीं दहा वाजेपर्यंत तिच्याशी बोलत बसत असे, व कुसुम रडत असली, म्हणजे तर त्याहीपेक्षा उशिर व्हावयाचा मला वर जाण्याला. अशा वेळीं केव्हा केव्हा त्रासून म्हणावयाचे असे, "झाली कीं नाही माहेरच्या साऱ्या आठ-वणींची उजळणी यथासांग!—इतक्या उशिरानें वर येण्यापेक्षा खालीच का नाहीं निजत तू? म्हणजे विजय न् कुसुम उठून रडायला लागल्याबरोबर तुला रात्री धावपळ करावी लागते ती तरी टळेल!" मी सहसा उत्तर देत नसे या बोलण्यावर पण मला असे मात्र वाटे, आमच्या गप्पांत मधून मधून सामील का होऊ नये यांनी? मनूच्या बाबतीत इतक्या जुन्या पद्धतीची मर्यादा बाळगण्याचे काय कारण आहे? शेवटी मी एक दिवस विचारले तसें स्पष्ट तेव्हा मला म्हणावयाचे झाले, "मला काहीच संकोच वाटायचं कारण नाही कोणत्याही स्त्रीचा पण त्यांना काय वाटेल, याचा नको का विचार करायला? आपल्याकडे पद्धत नाही शिकलेल्या मंडळींत सुद्धा पुरुषांनी परकी बायकांबरोबर बोलत बसायची अशा स्थितीत मी मोकळेपणानं बोललों न् त्यांचा भलताच समज झाला तर? आपण बोलून चालून जातीबाहेर पडलेलीं माणसें आपल्याला स्वतःच्या जरी नसल, तरी आपल्याजवळ येऊन राहिलेल्या माणसाच्या लौकिकाला जपलं पाहिजे फार." तेव्हा मी म्हटलें, "माझी जर धाकटी बहीण असती, तर आपण नसता का मोकळेपणानं वागला

तिच्याशी ? तसच मनूशीही वागायला हरकत नाही खरोखरी काहीं आपल्या या असल्या वागण्यान तिला बिचारीला किती अवघड वाटत !" माझ्या त्या बोलण्याचा परिणाम झाला मनावर कारण त्या दिवसापासून रोज रात्री जेवल्यावर गप्पा मारावयाला बसू लागली स्वारी आमच्यात, व मनू जी पूर्वी ते असले म्हणजे वर डोळा करून बघत नसे अगदीं, ती आता एकाद दुसरा शब्द त्याच्याशी बोलू लागली माझी इच्छा तिनें वैद्यकाचा कोर्स घेण्यासाठीं कॉलेजात जावे अशी होती पण ते शिक्षण फार खर्चिक पडेल असें म्हणून तिनें माझ्या इच्छेला मोडता घातला, व ती सेवासदनात जावयाला लागली परिचर्येचे शिक्षण घेण्यासाठी त्या दिवशी रात्री ती विजयला माडीवर थोपटून निजवीत असता मला म्हणाली, "आज त्या बनूताई विचारीत होत्या मला, तू अगदीच कशी कुठ जात येत नाहीस, म्हणून !—तुझ्यासारख्या बायकानीं एकाद दुसरा तास रोज फुकट शिकवल, तर तेवढीच मदत होईल स्त्री-शिक्षणाला असं म्हणत होत्या त्या —खरच अनू, तुझ मन ससारात इतकं रमेल अस वाटल नव्हत मला. आप्पाच्या केवढ्या आशा होत्या तुझ्यावर !" "खर आहे तुझ म्हणण मला सुद्धा आश्चर्य वाटत या गोष्टीच शास्त्रीबुवा लहानपणी मला नेहमी म्हणायचे, तू बायकाच्या चळवळीत पुढाकार घेतला पाहिजेस, म्हणून अन् त्या उमेदीन तर आप्पानी मला शिक्षण दिल इतक. अलीकडे मात्र मनात येत माझ्या फार आपण काही तरी कराव म्हणून पण त्याना कितपत आवडेल याची शका वाटते मनाला" मी म्हटलें "का, न आवडायला काय झाल ? वास्तविक त्याच्यासारख्यानी तर उत्तेजन दिल पाहिजे आपल्या बायकाना असल्या गोष्टीत," ती म्हणाली "तुला माहित नाही त्याचा स्वभाव मनू ! लग्नाच्या पूर्वी मी महिला समाजात जात असें पुष्कळदा न् बी ए झाल्यावर लक्ष्मीबाईनी आग्रहान सेक्रेटरी केल मला त्याच पण लग्न झाल्याबरोबर मला राजीनामा द्यायला लावला स्वारीन त्याच आपल सदोदित एकच म्हणण असत—'मला तू सर्वस्वी हवीस इकडे तिकडे कुठ तुझ लक्ष गेल म्हणजे, माझ्याकडच तितकच लक्ष कमी होईल तुझ मन पागल म्हणजे प्रेमही पागत !'" मी तिला सागितलें. "पण हें पुरुषानाही नाहीं का लागू ? ते नाही का स्वत रोज पाच तास कोर्टात जात ? अन्

सदा कसल्या ना कसल्या तरी सभाना न् कमिट्यांना हजर रहात ? त्यानी स्वतः हजार काम करीत रहायची बाहेरची न् बायकाना मात्र आपल्या आवडीच समाजसेवेच एकादही काम करायला उजर नसायचा ! पण पुरुषाच नेहमीचच आहे हे,—त्याच्या स्वत साठी वेगळ नीतिशास्त्र न् स्त्रियासाठी वेगळ नीतिशास्त्र !" मी बोलले नाही यावर काही पण, तेव्हापासून आपल्या आयुष्याचे ध्येय आपण अजिबात विसरून गेलो, असे सारखे वाटावयाला लागले माझ्या मनाला आप्पा आणि शास्त्रीबुवा—केवढ्या अपेक्षा होत्या त्याच्या माझ्याविषयीं ! परतु ससाराच्या मोहाला बळी पडून मी विसरून गेले माझे कर्तव्य, माझें वैशिष्ट्य ! पण, ज्या मोहात मी गुरफटले होते, तो मोह खरोखरीच ससाराचा होता का ? घरच्या कामाचा राडा उपसावयाला नोकरमाणसे होती; न् मुलाना माझ्यापेक्षा दाईचाच लळा होता जास्त ; त्याचे नेहमी टुमणें असे माझ्यामागे, मूल अगावर असलें म्हणजे प्रकृति सुधारत नाही लवकर, म्हणून त्यामुळें सहा महिने होतात न होतात, तोच मूल माझ्या अगावेगळें होत असे मग ससारातल्या अशा कोणत्या गोष्टीपाशीं धागे गुतले होते माझ्या जिवाचे ? केवळ त्याच्याविषयीच्या आसक्तीमुळेंच मी विसरलें नाहीं का स्वत ला, स्वत च्या साऱ्या ध्येयाना ? आणि ते ?—मनू म्हणाली ते काही खोटे नव्हते —त्याची सारी कामे यथास्थित चालली होती बाहेरचीं मी पहात होते, सर जीवनलालाच्या हाताखाली काम करावयाला लागल्यापासून राजकारणात जास्त जास्त मन गुतत चालले होते त्याचें, व आताशा तर कार्पोरेशनसाठीही उभे राहण्याची तयारी जोराने चालली होती —त्याना माझ्याविषयीं इतकी आसक्ति आहे, पण ती कधी आड आली आहे का त्याच्या महत्त्वाकाक्षाच्या, बौद्धिक व्यवसायाच्या ? मग माझ्या त्याच्याविषयींच्या आसक्तीमुळें माझे जीवन निरुद्देश, निष्फळ का व्हावे ? स्त्री ही काय नदीसारखी कुणाशी तरी सर्वस्वाने समरस होण्याकारेता, कुणाच्या तरी जीवनात स्वत च्या जीवनाचा विलय करून घेण्याकरिता का जन्माला येत असते ? वेल वृक्षाचा आसरा घेते न् त्याच्या आश्रयाने फोफावते पण तिचे स्वतत्र अस्तित्व लोपत नाहीं त्यामुळे,—त्याच्या फाद्याचा विस्तार तो तिच्या फाद्याचा विस्तार, त्याची फळे ती तिची फळे असें होत नाही तिचे कधी तिला स्वतत्र फुले, स्वतत्र फळे

येतात,—त्याच्या आश्रयानेच पण तिचा सारा विकास स्वतंत्र रीतीने होतो. आम्हा स्त्रियांचे जीवन हे नदीसारखे आहे की वेलीसारखें ? आयुष्यात एकमेकाच्या सुखासाठी एकमेकानी झटणे, एकमेकाचा आधार एकमेकाना वाटणे हे निराळे, आणि एकाने दुसऱ्याच्या सुखासाठी झटणे, एकाच्या आधारावर दुसऱ्याने अवलबून राहणे, हे निराळे पहिल्यात अद्वैत असले, तरी व्यक्तित्वाच्या विकासाला वाव आहे पण दुसऱ्यात मात्र गुलामगिरीशिवाय दुसरे काही नाही ससार म्हणजे दोन व्यक्तीनी एकमेकाच्या उन्नतीसाठी स्वेच्छेने अगिकारलेले सहजीवन की एका व्यक्तीने दुसऱ्या व्यक्तीच्या सुखासाठी आयुष्य वेचण्याचा केलेला गुलामी करार ? ते जेव्हा म्हणतात की, मला तू सर्वस्वी पाहिजेस, तेव्हा त्याचा अर्थ, माझे जिणे केवळ त्याच्याचसाठी आहे, असा समजावयाचा का ? मी जशी त्याना सर्वस्वी हवी आहे, तसेच तेही मला सर्वस्वी हवे आहेत पण ते आपले सारे उद्योग, साऱ्या आकाक्षा माझ्यासाठी सोडून द्यावयाला तयार होतील का ? मग मी त्याच्यासाठी हे निष्क्रिय, निरुद्देश जीवन का कठावे ?

–  –

ते वादळ मी जन्मात विसरणार नाही कधी मला सभेहून घरी परत यावयाला नऊ वाजून गेले होते त्या दिवशी आल्याबरोबर मनू मला म्हणाली, "आज भाईसाहेब फार रागावलेले दिसताहेत बर का ! तू एरवी दिवसभर बाहेर राहिलीस तरी चालेल, अनू पण सध्याकाळी त्याच्या यायच्या वेळेला घरी परत यावस तू अस वाटत मला " "का ग ? काही बोलले का आज विशेष ?" मी तिला हसून विचारले पण मनातून मात्र मी घाबरून गेलें होतें अगदी गेल्या पधरा दिवसात तिसऱ्यादा उशिर झाला होता हा मला, व त्या रागानें वटारलेल्या डोळ्याना आता तोड द्यावे लागणार आपल्याला, अशी कल्पना आली माझ्या मनात मनूने मला म्हटले, "आल्याबरोबर पहिल्यादा चौकशी झाली तुझी न् तू घरी नाहीस अस कळताच चेहरा उतरून गेला अगदी मी चहा न् फराळाचे टेबलावर आणून ठेवल, तेव्हा मला इतकच विचारल, "केव्हा घरी येणार आहेत काही कल्पना आहे का तुम्हाला ?" आणि चहा कसाबसा सपवून वर गेले एकदम थोडा वेळ वाट पाहिली तुझी आणि मीना न् विजय याना घेऊन बाहेर गेले नतर फिरून आल्यावर पुन्हा चौकशी केली तुझी न्

विजयला म्हणाले, " आई हरवली बर का तुझी विजू !—आज काही येत नाही घरी परत ! " त्याबरोबर त्याने आकात केला अगदी मी त्याला उचलायला जाताच मला म्हणाले, " तिची तिला आपल्या मुलाची काळजी नाही न् तुम्ही कशाला त्रास करून घेता स्वत ला ? " आणि जेवल्याबरोबर मुलाना घेऊन वर गेले लगेच " तिच्या तोंडून ती हकिकत ऐकत असताना डोळे भरून आले माझे, व जेवण आटोपल्यावर वर जाण्याचा धीर होईना मला अकरा वाजल्यावर मी वर गेले मला बघितल्यावर हातातल्या सिगारेटची राख झटकली, मजकडे पहात एक जोराचा झुरका घेतला सावकाश न् विझवून फेकून दिली ती बाहेर माझ्यासमोर सहसा कधी करीत नसत धूम्रपान त्यामुळे मला मुद्दामच केल्या-सारखा वाटला तो प्रकार, न् मी मुकाट्याने कोचावर निजलेल्या मुलाना उचलून आत नेण्याच्या उद्योगाला लागले थोडा वेळ वाट पाहून नतर मला विचारा-वयाचे झाले, " आज कसली होती सभा एवढी ? " " चपारण्यातल्या कामाच्या बाबतीत वाटाघाट करायला गाधींनी वनिता समाजातल्या काही प्रमुख बायकाना बोलावल होत त्या भानगडीमुळ वेळ लागला मला इतका आज, " मी विजयला उचलता उचलता अगदी सयपणाने उत्तर दिले त्याला आत निजवून मी परत आले, न् टेबलावरल्या सध्याकाळच्या वर्तमानपत्रापैकी एकादे पत्र उचलणार, तोच मला एकदम रागाने विचारले, " तुला वेळ नाही का माझ्याशी बोलायला आज ? " " का बर ? " मी इव्हनिंग न्यूजचा अक उघडीत विचारले " आल्यापासून पहातो आहे,—मी जणु इथ बसलेलाच नाही अशा रीतीनें वागते आहेस तू एका शब्दान तरी चौकशी केलीस का तू माझी ? किती दिवस चालणार आहे ही तुझी समाजसेवा ? मला वाटत, माझ्याऐवजी तूच कार्पोरेशनला उभ राहिलेल बरं ! " त्याच्या त्या उपरोधिक बोलण्याचा राग आला मला, न् मी एकदम तुटक-पणानें उद्गारले, " तसाही दिवस उगवेल पुढमाग ! " त्याबरोबर सतापाच्या भरात खुर्चीवरून ताडदिशी उठून इग्रजीत म्हणावयाचे झालें, " कोणत्या धुदीत आहेस तू आज ? तुला अस वाटत, की तू माझ्याशीं कितीही उर्मटपणान वागलीस, तरी ते मी सहन करीन म्हणून ? तुझ्यासाठीं मी माझ्या साऱ्या सुखावर पाणी सोडल,—मला आवडणारी प्रत्येक वस्तु, माझ्या साऱ्या सवई

सोडून दिल्या मी तुझ्या प्रेमाखातर आणि तू माझ्याशी अशा कृतघ्नपणानं वागतेस ! ” मला राग आला त्याच्या त्या बोलण्याचा, न् मी विचारले, “ काय कृतघ्नपणा केला मी आपल्याशी ? एकाद दिवस सभेहून यायला उशीर झाला, म्हणून काय इतकं टाकून बोलायचं का लगेच ? आपल्याला नाही का घरी यायला उशीर होत कधी ? ” “ माझा न् तुझा उशीर सारखाच समजतेस का तू ? ” ते चिडून मला म्हणाले “ का बरं ? सारखा नाही तर काय निराळा का समजायचा ? आपल्याला जसा कामकाजाच्या ओढीनं उशीर होतो, तसाच मलाही होतो मी जर कधी त्याबद्दल आपल्याला दोष देत नाही, तर आपण का मला द्यावा ? आपल्याला त्या प्रेसिडेन्सी असोसिएशनच्या सभेहून परत यायला अकरा वाजले होते त्या दिवशी रात्री पण मी एका शब्दानं तरी म्हणाले का काही त्याबद्दल ?—घरी आल्याबरोबर सदोदित अगदी दारात हात जोडून उभी असली पाहिजे बायको अशी का कल्पना आहे आपली ? ” मी डोळ्यात उभे राहिलेले अश्रु आवरीत विचारले “ होय, अशीच आहे कल्पना माझी मी लग्न केलं ते प्रेमासाठी केलं,—माझ्या जिवाला विरंगुळा हवा म्हणून केलं माझी बायको सर्वस्वी माझ्यासाठी आहे—मी म्हणेन त्या क्षणाला जवळ हवी ती मला तुला कळायला हवं होतं हे अन् गेल्या आठ वर्षांच्या अनुभवानं मी माझ्या साऱ्या लहानसहान सुखावर, तुला न आवडणाऱ्या प्रत्येक गोष्टीवर पाणी सोडलं तुझ्या सहवासाचा प्रत्येक क्षण मला लाभावा म्हणून, ” ते सतापाने उद्गारले “ आपण जसं प्रेमासाठी लग्न केलं, तसं मीही पण प्रेमासाठीच लग्न केलं आहे परंतु म्हणून जर मी आपल्याला म्हटलं की, कोर्टांत न जाता सारा दिवस घरीच माझ्याशी गप्पा मारीत बसा, तर ते रुचेल का आपल्याला ? पुरुषासाठीं एक न्याय आणि बायकासाठी एक न्याय असं म्हणणं आहे का आपलं ? ” मी विचारले “ माझं नाहीं, निसर्गाचच म्हणणं आहे ते मुलांना जन्म देणारी आई जर सहा सहा तास बाहेर रहायला लागली रोज, तर त्यांचं संगोपन करायचं कुणी ?—पण मला वाद नाहीं घालायचा तुझ्याशी मी तुला नेहमीच म्हणत असतों,—मला तू सर्वस्वी हवीस तुझ्या सार्वजनिक कामाच्या हौसेमुळं जर विचका झाला आपल्या संसाराचा, तर त्याबद्दल जबाबदार तू आहेस तुला जर स्त्रियांच्या चळवळींत पुढाकार

घ्यायचा होता, तर त्या काशीताईप्रमाण अविवाहित का नाही राहिलीस तू ?
लग्न हव, ससार हवा, मुलबाळ हवीत, नवरा जरा अतरलेला खपायचा नाही !
—अशा बायकानी सार्वजनिक कामाच्या गप्पा मारण्यात काय अर्थ ? ” त्यानी
अत्यत उपरोधिकपणाने हसून ती शेवटची वाक्ये उच्चारली मी जन्मात कधी
विसरणार नाही त्याचे ते हसणे माझ्या हृदयातल्या साऱ्या मृदु भावना करपून
गेल्या त्याने —स्त्रीपुरुषानी एरवी काय वाटेल ती दूषणे द्यावीत एकमेकाना
पण परस्पराना एकमेकाविषयी वाटणाऱ्या आसक्तीचा कधी उपहास करू नये
चुकूनसुद्धा त्या आसक्तीचा उपहास करणे, म्हणजे ज्या नाजूक भावनानी
त्याची जीविते एकजीव झालेली असतात, त्या भावनाचीच पायमल्ली करणे
नव्हे का ?

- ६ -

किती धावपळ करून घाईने परत आले मी ! पण, पट्टेवाल्याने मोटारीचे दार
उघडताना सागितले मला की, पाचच मिनिटापूर्वी साहेब मुलाना घेऊन बाहेर
गेले फिरावयाला त्यासरशी एकदा मला वाटले की, तशीच गाडी वळवून महा-
लक्ष्मीच्या बाजूला जाऊन पहावे भेट झाली तर पण मी आधीच इतकी गळून
गेलें होते की, त्याच्या त्या बोलण्यामुळे मला व्हराड्यापर्यंत पोचण्याचे सुद्धा
त्राण उरलें नाही मी कशीबशी गाडीतून खाली उतरून तिथे ठेवलेल्या कोचावर
जाऊन पडलें एकदा, व मनूला बोलावून आणावयाला सागितले त्याला
तेव्हा तीही त्याच्याबरोबर बाहेर गेल्याचे सागितले त्याने मला अलिकडे
केव्हा केव्हा मी नसले, म्हणजे मुलाच्या हट्टाखातर ती जात असे बरोबर
फिरावयाला मी त्याला पाणी आणावयाला सागितलें, व ते प्याल्यावर हुशारी
वाटली मला थोडीशी पण कोचावरून उठून आत जावे असे मात्र वाटेना
माझ्या मनाला डोहाळे लागल्यापासून डॉक्टरानी बजावून सागितले होते
मला की, तुमचे सारे बाहेरचे उद्योग आता बद करा तुम्ही पण नववा महिना
लागेपर्यंत स्वस्थ बसावयाचें नाही असे ठरवलें होते मीं मनाशी त्या
दिवशीचा तो प्रकार घडल्यापासून एका गोष्टीला मात्र मी जपत असें फार —बाहेर
एरवीं कितीही काम पडलें, तरी त्याच्या कोर्टातून परत येण्याच्या वेळेला मात्र
घरीं हजर व्हावयाचे पण महिन्यातून तीन चार वेळेला तरी चुकामूक होत असे

आजच्यासारखी, न् मग माझ्या मनाला अतिशय वाईट वाटत असे मागाहून. कारण, त्या प्रसगापासून स्वत जरी गेल्या सहा सात महिन्यात पुन्हा कधीं म्हटलें नाही मला बाहेरचीं कामे करण्याबद्दल, तरी मनातला सारा राग मात्र व्यक्त होत असे कोणत्या ना कोणत्या तरी रीतीनें शिवाय मीना मला लाडिकपणाने म्हणावयाची, " नेहमी नेहमी का ग उशीर करतेस असा तू आई ? भाईसाहेब फार रागावतात ना मग सगळ्याच्यावर ! " मुलापैकी तिलाच काय तो लळा होता आमचा दोघाचा विजय न् कुसुम याचे मावशीशिवाय पान हलत नसे अगदी, व त्यामुळें या गर्भारपणात पूर्वीइतका त्रास नाही झाला मला मुलाचा मीनाचा माझ्यापेक्षा सुद्धा त्याच्याकडे जास्त ओढा होता तिच्या लहानपणी आम्ही किती तरी वेळा वाद घातला होता आपसात ती पुढें कुणासारखी दिसेल म्हणून ते नेहमी म्हणावयाचे, " तुझ्यासारखे डोळे आहेत तिचे न् तुझ्यासारखीच दिसेल ती पुढे " पण लहान मुलाचे चेहरे हे प्रथमदर्शनी मनात उत्पन्न होणाऱ्या प्रेमासारखेच फसवे असतात अगदीं त्या प्रेमात जसा पुढे त्याचें मूळचे स्वरूप ओळखू न येण्याइतका बदल होतो, तसे मुलाचे चेहरेही अपेक्षेपलीकडे बदलून जातात कालातराने मीना आता इतकी हुबेहूब दिसत असे त्याच्यासारखी की, डोळ्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही बाबतीत साम्य नव्हते उरलें आम्हा दोघीमध्ये त्याना मोठा अभिमान वाटत असें तिच्या प्रत्येक गोष्टीचा, व त्या भरात पुष्कळदा विजय न् कुसुम याना अन्याय होत असे त्याच्या हातून मी केव्हा केव्हा म्हणतही असे त्याना गमतीनें, " मीना तुमच्यासारखी असल्यामुळें आवडते तुम्हाला इतकी एरवी सागायच असत मला नेहमी तुझ्यावर माझ फार प्रेम आहे म्हणून. पण विजय माझ्यासारखा आहे दिसायला, तर त्याला कधीं उचलून नाहीं घेण होत एक दिवससुद्धा ! " त्यावर मला हसून म्हणावयाचे असे, " तुझी बुद्धिमत्ता न् तडफ कुठ आहे त्याच्यामध्ये ? " " तो अशक्त असल्यामुळ दिसतो सध्या असा पण म्हणून कांहीं लगेच नकोसा नको वाटायला तो ! " मी म्हणालें. " त्याच दिसत नाहीं लक्षण तस. नाहीं तर त्याचे डोळे एव्हापासूनच मोहक दिसले असते तुझ्यासारखे बेट्यान बाकी

सगळ घेतलय तुझ्यापासून पण डोळे न् बुद्धिमत्ता घ्यायला मात्र विसरला अजिबात ! ”—असे काही तरी बोलून वेळ मारून न्यावयाची असे नेहमी मीनाविषयी मात्र त्याना वेड होते अगदी एक प्रकारचे कुणावर कितीही रागावलेले असले, तरी मीनाला कधी झळ नाही लागावयाची त्या रागाची अलीकडे केव्हा केव्हा आमचा खटका उडून स्वारी भलते सलतें बोलावयाला लागली, म्हणजे मीना हळूच जवळ जाऊन गळ्यात हात घालावयाची त्याच्या, व गोष्ट सागण्याच्या निमित्ताने त्याना बागेंत घेऊन जावयाची मनूने किती प्रयत्न केला तिला आपला लळा लागावा म्हणून ! पण ती कधी जेवली नाही तिच्यावरोबर किवा निजली नाहीं तिच्याजवळ मी जवळ बसल्याशिवाय जेवण होत नसे तिचे कधीं, न् त्याच्या तोडून एक तरी गोष्ट ऐकल्याशिवाय झोंप येत नसे तिला कधीं मला नवल वाटत असे तिच्या वस्तादपणाचे आपले लाड करण्याच्या भरात विजय न् कुसुम याची आबाळ होऊ नये, म्हणून मोठ्या हिकमतीने वागावयाची ती त्याच्याशीं घरी आल्यावर ती जर दृष्टीस पडली नाही, तर माझा निम्मा आनद मावळून जात असे लगेच स्वत नेहमी म्हणावयाचे असे, “मीना म्हणजे ‘इव्हनिंग न्यूज’ आहे आपल्या घरातली दिवसभर जें काय घडलं असेल त्याची खडा न् खडा बातमी मिळते आल्याबरोबर !” वास्तविक मीनाच्या जन्मापासून माझी प्रकृति न् ससार ही दोन्ही ढासळतच चाललीं नव्हतीं का ? पण, केव्हा केव्हा जरी या गोष्टीची जाणीव माझ्या मनाला तीव्रतेनें होई, तरी तिचा मला राग नाही आला कधी त्याबद्दल उलट, मला असें वाटे कीं, आमच्या सहजीवनाला गोडी आणणाऱ्या इतर साऱ्या भावना जरी माझ्या दुर्दैवाने नाहीशा झाल्या, तरी मीनावरले प्रेम हें पुरेंसें होईल आम्हा दोघाना एकत्र ठेवावयाला महिन्यापूर्वी तिचा सातवा वाढदिवस केला होता आम्ही त्या दिवशी सकाळपासून केलेल्या दगदगीमुळें सध्याकाळीं एकाएकीं माझें पोट दुखावयाला लागलें, व विजूच्या वेळची आठवण होऊन घाबरून गेले मी अगदी मी बिछान्यावर जाऊन पडल्याक्षणापासून मीनाने तळ दिला तिथें आपला. त्यामुळें मला कण्हावयाचा सुद्धा सकोच वाटू लागून त्रास व्हावयाला लागला फार मनूनें तिला परोपरीने समजाऊन सागितलें बाहेर जाण्याबद्दल पण ती

काही केल्या कबूल होईना मला सोडून जाण्याला शेवटीं स्वत जेव्हा माझ्याजवळून उठून बाहेर जावयाचे झाले, तेव्हा गोष्ट ऐकावयाला मिळण्याच्या लालचीनें ती गेली त्याच्याबरोबर मला थोडें बरें वाटल्यावर तिला आपल्याबरोबर आत घेऊन यावयाचे झाले तेव्हा तिला जवळ घेऊन मी सहज गमतीने म्हटलें, “ मी जर कधी पोट दुखायला लागून देवाकडे गेले, तर मावशीजवळ रहाशील ना तू ?” “ मी नाही रहायची मावशीजवळ विजय न् कुसुम मावशीची आहेत मी तुझी न् भाईसाहेबाची आहे, ” तिनें मला म्हटले तिच्या त्या बोलण्याने विसर पडला मला माझ्या साऱ्या वेदनाचा



बाळतपणात असतानाच लक्षात आला माझ्या त्याच्या वागण्यातला तो फरक पहिले दहा बारा दिवस रोज आल्याबरोबर सध्याकाळी माझ्या खोलींत नियमानें बसणें होत असे पण नतर सुरवात झाली मुलाना घेऊन फिरावयाला जाण्याला पहिले दोन चार दिवस वाटले नाही मला त्याचे काहीं कारण दाई किंवा पट्टे-वाला याच्याबरोबर फिरावयाला जाण्याला मुले कटाळत असत, हे बघतच होतें मी पण, तिसऱ्या आठवड्यापासून मुले हट्ट करतात म्हणून मनू सुद्धा जावयाला लागली त्याच्याबरोबर, याचे मात्र मला वाईट वाटले फार मुले खरोखरीच अतिशय हट्ट करावयाची —विशेषत कुसुम एवढ्या तेवढ्या गोष्टीत सुद्धां अडून बसावयाची तिच्यासाठी पहिल्या दहा दिवसात मनू मला शिवलेली असली, म्हणजे एकादे वेळीं दाई तिचा भात कालवून देत असे. पण मग काही अन्नाला बोट म्हणून नाही लावावयाची ती भात मावशीनें कालवला पाहिजे, आघोळ मावशीने घातली पाहिजे, गोष्ट मावशीने सागितली पाहिजे, असा पावलो-पावली तिचा हट्ट चालावयाचा मी कोनात असेपर्यत माझ्याप्रमाणें मावशी सोंवळ्यात आहे अशा समजुतीने ती फिरावयाला गेली मुकाट्याने मनूशिवाय पण मी अग धुवून घरात आल्यापासून रोज सध्याकाळी बाहेर जाताना अडून बसावयाची ती मनूसाठी. शेवटीं मीच मनूला म्हटले, “ असला हा गोंधळ रोज पहाण्यापेक्षा जा बाई तू फिरायला तिच्याबरोबर ! ” पहिले दोन तीन दिवस ती समुद्रापर्यंत त्याना पोंचवून त्याच पावलीं घरीं परत आली पण मग बरोबरच परत यावयाला लागली ती त्याच्या. मला कल्पना होती,—विजू न्

कुसुम यानीं सोडली नसेल तिला पण, मला वाटे, सध्याकाळच्या या उदास वेळी मला एकटीला घरी टाकून रहावतें कसे हिला बाहेर ? परंतु मी एकटी थोडीच असे घरी ? सुईण नसे का दिमतीला त्या वेळीं माझ्या ? पण तिच्या त्या सहवासापेक्षा निर्मनुष्य एकात पुरवला असता मला मनूच्या त्या त्याच्याबरोबर फिरावयाला जाण्याबद्दल इतक्या चमत्कारिक तऱ्हेनें चौकशा करावयाची ती कीं, माझें डोके अगदी उठून जात असे तिच्या त्या टकळीने ! माझ्या जन्मापासून तिचा घरोबा होता आमच्याशी, व माझी तिन्ही बाळतपणें केली होतीं तिनें त्यामुळें तिच्या त्या फटकळ तोडाला हात लावावयाची सोय नव्हती मला शिवाय, माझे मलाच मागाहून वाटे की, त्या म्हातारीच्या जुन्या डोळ्याना आमची नवी रहाणी गैर दिसली, तरी मला, मनूविषयी काय किंवा त्याच्याविषयी काय, शका घ्यावयाला तिळमात्र तरी जागा होती का ? माझे हें बाळतपण इतके सुखाने व्हावयाला मनूचेच कष्ट न् कुशलता कारण नव्हती का झालेली ? महिला परिषदेंत तीन दिवस सारखे पाच पाच तास एका जागी बसल्याचे निमित्त होऊन माझे खालचे सारें अग जेव्हा सुजून आले, तेव्हा तिनेच नाही का ती सूज उतरण्यासाठी परोपरीनें शुश्रूषा केली माझी ? आणि पहिल्या दहा दिवसात सुईणीला हात नाही लावू दिला तिनें माझ्या अगाला—त्या रागाने सुद्धा ती म्हातारी बडबडत असेल असे वेडेंवाकडें !—मी नुसते एका शब्दाने दर्शविण्याची खोटी होती की, लगेच फिरावयाला जाणें बद केलें असते तिने त्याच्याबरोबर आणि त्याच्या तरी वागण्यात असा विशेष नवीन फरक काय पडला होता आज ? पहिल्या बाळतपणापासूनच त्याची माझ्याविषयीची आसक्ति कमी कमी होत चालली नव्हती का ? आणि गेल्या वर्ष दीड वर्षांत तर आम्ही मनानेंही एकमेकाना दुरावलों होतों पण त्याला तरी माझी मीच जबाबादार नव्हते का ? त्या दिवशीं घडलेल्या त्या प्रसगानतर त्यानी पुन्हा अवाक्षर काढलें नाही माझ्या बाहेरच्या उद्योगाविषयीं मी पहात असें, माझ्याबरोबर काम करणाऱ्या इतर बायकाना त्याच्या घरच्या पुरुषांकडून कसें प्रोत्साहन मिळे तें परंतु, महिला परिषद आटोपल्यानंतर वर्तमानपत्रांतून माझ्या कामगिरीची इतकी तारीफ झाली,(पण त्यानीं जाणीव नाहीं दिली कधीं मला आपल्या तें काहीं पहाण्यात आल्याची

क्वचित् काळीं एकाद दुसऱ्या सभेला शिष्टाचाराखातर एका मोटारीतून जाण्याचा योग येई, तेवढेच काय तें आमचे सार्वजनिक कामातलें सहकार्य ! मला अत्यंत चीड येत असे त्याच्या त्या मौनाची. त्यात भरलेला तिरस्कार मला असह्य झाला होता अगदी एरवी कदाचित् त्याच्या वरल्या प्रेमासाठी मी साऱ्या गोष्टी सोडूनही दिल्या असत्या बाहेरच्या पण मी बाहेर जाण्यासाठीं कपडे बदलताच त्याच्या कपाळावर पडणाऱ्या त्या आठ्या आणि आकुञ्चित होणारे ते डोळे !—मला एक प्रकारचा आनंद होत असे त्याच्या समोरून बाहेर जाताना गेल्या सात वर्षांत मला पुरेपूर कळून चुकलें होतें,— त्याची अपेक्षा एवढीच होती की, मी सदा न् कदा खेळणें होऊन बसावें त्याच्या वासनेचे, जन्मभर भोगदासी होऊन रहावे त्याची ! होय, भोगदासीच ! मी जाणून बुजून वापरते आहे तो शब्द त्याचें माझ्यावर जर वासनाविहीन प्रेम असते, बरोबरीची सहकारी म्हणून जर आपल्या जीवनात त्यानी मला स्थान दिलें असते, तर त्याच्या प्रेमाला अशी भरती ओहोटी येती ना,—मला काहीं दिवस त्याच्या प्रेमाच्या चांदण्यात न् काही दिवस उपेक्षेच्या अंधारात काढावे लागते ना ! पण स्त्रीला स्वतंत्र अस्तित्व, स्वतंत्र आकांक्षा असतात, हे मुळी त्याच्या गावीही नव्हतें साखरेचे काम फक्त एवढेंच कीं, ज्या पदार्थाशी तिचा संबंध येईल, त्याच्याशी एकजीव होऊन त्याला माधुर्य आणावयाचे त्याप्रमाणे स्त्री ही पुरुषाच्या जीवनाला माधुरी आणण्यासाठीं जन्माला आली आहे, अशी भावना होती त्याची,—पुरुषाचे तें सर्वांत श्रेष्ठ करमणुकीचें साधन आहे, असा समज होता त्याचा ! त्याच्या इच्छेप्रमाणें भोगदासी म्हणून मुकाट्यानें नांदावयाला मीं तयार झालें असते, म्हणजे ही तेढ उद्भवली नसती आमच्यात पण स्वाभिमानाच्या ईर्ष्येने मी त्याच्या मानी मनाला बुद्धिपुरस्सरच दुखवलें !—मला कल्पना होती मी काय केलें, काय करित आहें याची केव्हां केव्हा मला वाटे, आम्ही दोघेंही अशीं हट्टी, आप-आपल्या मताची अभिमानी,—कोणी तरी स्वतःचा हट्ट सोडल्याशिवाय, अभिमान आवरता घेतल्याशिवाय सुखावह होणार कसें आमचें जीवन ? पण सकाळीं उठल्यावर त्याची ती त्रासलेली मुद्रा, तें तिरस्काराचें मौन आणि आणि—नको, नको त्या गोष्टीचा उच्चार ! तें सारें बघितल्यावर घट्ट होत असे

माझें मन दगडासारखे तथपि मनाची रुखरुख मात्र थाबली नाही कधींही वास्तविक फिरून परत आल्यावर रात्री दहा वाजेपर्यंत गप्पा मारीत बसावयाचे असे माझ्या खोलीत पण सध्याकाळी पोर्चमध्ये येऊन उभ्या राहिलेल्या मोटारीचा तो आवाज झाला, कुसुमच्या तोडचे ते " माछी, माछी, " शब्द ऐकू आले की, कपाळाची तिडीक उठत असे माझ्या अगदी मी अशी पगु, पराधीन होऊन खोलीत पडलेली आणि मनूने माझ्या मुलाच्या न् त्याच्या सहवासात मजेने सध्याकाळ घालवावयाची !—सुन्न होऊन जात असे सतापाने माझे मन !

- ॥ -

" आई, आई, आज मावशी रडत होती किती तरी वेळ न् भाईसाहेबानीं तिचे हात आपल्या हातात घेऊन काही तरी सागितल तिला शेवटी ! " मीना मला म्हणाली मी नुकतीच बाहेरून येऊन व्हराड्यातल्या कोचावर बसले होतें मला पहाताच मीना धावत धावत आली न् हळूच सागितली ती बातमी तिनें मोठ्या उत्कठेनें मी स्तिमित झाले अगदी तिच्या तोडचे ते उद्गार ऐकून ! मला गप्प बसलेली बघून ती फणकाऱ्याने म्हणाली, " तू का नाही ग येत आमच्याबरोबर फिरायला आई ? मी की नाहीं आता फिरायला जाण्याच सोडून देणार आहे भाईसाहेबाच्या बरोबर ! तू नसलीस म्हणजे ते न् मावशी अगदी दूर जाऊन खडकावर बसतात कुठ तरी आणि मग विजू न् कुसुम यना सभाळाव लागत मला एकटीला ! " तिला काय उत्तर द्यावे हें समजेना मला पण, आपण जर काही म्हटले नाही, तर ती आणखी काही तरी बोलेल अशाच प्रकारचे, अशी भीति वाटली मला म्हणून मी तिला म्हटलें, " बर, बर, उद्यापासून मी नेमाने येत जाईन तुमच्याबरोबर फिरायला मग तर झाले ना ! " आणि तिच्या कपाळावर आलेले केस मागें सारून मी आत जावयाला उठले गेले सहा महिने पहात होते मी, त्या दोघाची सलगी सारखी हळुहळू वाढत चालली होती पण, मला आशा वाटे, मी उद्यां बाळतपणातून उठून घरात वावरावयाला लागलें नेहमीसारखी, म्हणजे आळा पडेल या गोष्टीना आपोआप, व म्हणून तीन महिने पुरे होण्यापूर्वींच मी सुरवात केली त्यांची एक एक कामे करावयाला पण, लवकरच

माझ्या लक्षात आलें की, प्रवाहाच्या उलटे पोहण्याची धडपड करतें आहे मी ! मला आठवण आहे चागली,—मीनाच्या वेळीं बाळतपणातून उठल्यावर मी जेव्हा पहिल्यादा चहा नेऊन दिला, तेव्हा मला आनदाने म्हणावयाचे झाले, “ सपलेला दिसतोय आजपासून आमचा वनवास एकदरीत खरच, आपल आवडत माणूस घरात असाव पण त्याचा सहवास मात्र घडू नये आपल्याला, याच्यासारखी कुचबणा नाही मनाची दुसरी, अनू !—त्यापेक्षा सात समुद्र आडवे आलेले पुरवले एकमेकात ! ” पण, आता ज्या वेळी मनूच्या ऐवजी चहा न् फराळाचे मी टेबलावर नेऊन ठेवले, तेव्हा माझ्याकडे नुसते वर मान करून देखील बघितले नाही,—मीना न् विजू याच्याशी काही तरी बोलत सपवला चहा एकदाचा पूर्वी कोर्टातून परत आल्यावर मी स्वागत करावयाला घरी हजर असलेली दिसले, म्हणजे जे सोत्कठ नेत्र आनदाने विस्फारित होत असत, ते आता कपाळाला आठ्या पडून सकोचित होत असत मला पाहिल्या-बरोबर आणि फिरावयाला जाताना सुद्धा मला टाळण्याचा प्रयत्न तरी किती उघड उघड होत असे ! मी निघण्याची तयारी केली न् तितक्यात विलास रडावयाला लागला, म्हणजे अगदी वस्कन अगावर येऊन म्हणावयाचे, “ अग, घे घे त्याला थोडा वेळ तरी ! तुला स्वत पुढे आपल्या मुलाची सुद्धा पर्वा नाही अनू,)! ” आणि, मी त्याला घेतलेला दिसताच, पट्टेवाल्याला दुसरी मोटार तयार करण्याचा हुकूम सोडून, गाडी चालू करीत असत घाईघाईने त्या दुसऱ्या मोटारीतून मागाहून एकटीने जाऊन त्याना गाठण्याइतके माझें मन अद्याप निलाजरें झाले नव्हते पण, ते कसेही वागत असले, तरी मला खात्री होती एका गोष्टीची,—माझी मनू नाहीं कधी दगा देणार आपल्या बहिणीला ! होय, खरोखरीच बहीण, बहिणीपेक्षा, आईपेक्षा सुद्धा जास्त केले होते मी तिचें. वैधव्याच्या खाईंत जन्मभर पिचत पडण्याचा, भावाच्या घरी तुकडे मोडीत आयुष्य काढण्याचा प्रसग आला असता,(माझ्यामुळें झाला होता तिचा पुनर्जन्म त्या स्थितीतून,) नवरा मेल्यावर आईबाप जिवत असूनही अनाथ झालेली ती विधवा,—(माझ्यामुळें लाभली होती पुन्हा सुखाची सावली तिला तिचें शिक्षण, तिची उन्नति, तिची स्वतत्रता—सारें सारें माझ्यामुळें मिळालें होतें तिला आज ! म्हणून म्हणतें, आईपेक्षा सुद्धा जास्त होतें मी तिला त्या

मला,—तिच्या माडीवर विश्वासानें मस्तक ठेवून निजलेली मी तिची बहीण,—कसा होईल दगा देण्याचा धीर तिला!? स्त्रियाच्या भावना पुरुषाना समजोत न समजोत, पण, स्त्रीहृदयाला जर स्त्रीहृदयाच्या भावना न् वेदना समजल्या नाहींत तर स्त्रीहृदय कसले ते ?—छे, छे, त्यानी कितीही ताळ सोडला, तरी माझी मनू नाही घात करणार माझा !—त्यामुळें मीनाने सागितलेली ती हकीकत ऐकताच स्तभित झाले मी अगदी, पायाखालची जमीन सुटल्यासारखी वाटली मला एकदम मी कशीबशी आत आलें मनू विलासाला दूध पाजीत होती मला पहाताच ती दचकली,—निदान मला तरी भास झाला तसा; न् बोंडल्यातलें दूध विलासाच्या अगावर साडून तो रडावयाला लागला मोठ्याने मी हळूच त्याला उचलून जवळ घेतला माझ्या त्याच्या त्या मऊ, ऊबदार अगाचा स्पर्श होताच मला वाटले, ससारातल्या इतर साऱ्या सुखाना जरी मी आचवलें, तरी माझ्या सुखाचा हा ठेवा—माझी ही मुले, ही नाही कुणी हिरावून घेऊ शकणार माझ्यापासून ! मी त्याला घेतल्याबरोबर मनू उठून जेवणाच्या तयारीला लागली मुकाट्याने जेवताना कोणीच काहीं बोललें नाही नेहमींप्रमाणें मनू स्तब्ध होती अगदी, व मीनाला एकाद दुसरा प्रश्न विचारण्यापलीकडे तेही बोलले नाहीत फारसे त्या कृत्रिम स्तब्धतेने, त्या अर्थपूर्ण मौनानें जीव गुदमरून गेला माझा अगदी शेवटी ते उठून गेल्यावर मीच आपण होऊन मनूला विचारले, "का ग, आज बोलत का नाहींस तू ? काही होतय का तुला मनू ?" माझ्या त्या प्रश्नामुळें ती वरमल्या-सारखी होऊन म्हणाली, "तस विशेष काही होत नाही पण डोक चढल्या-सारख झाल आहे माझ थोडस !" माझ्या मनात चटकन् येऊन गेलें की, तिला सरळच विचारून टाकाव्यात साऱ्या गोष्टी (पण मीना न् विजू जवळच बसलीं होतीं माझ्या वर येण्याची वाट पहात) त्याच्या देखत इष्ट नव्हतें तसें काहीं बोलणें म्हणून मी लगेच त्याना घेऊन वर आलें निजण्यासाठीं त्या दिवसभर खेळून थकलेल्या निष्पाप जीवाना निद्रेने आपल्या पदराखालीं घेतलें तेव्हाच पण माझ्या मात्र मनाची तळमळ काही केल्या कमी होईना लग्न झाल्यापासून एक शब्दही एकमेकाशीं बोलल्याशिवाय गेलेली आमची पहिलीच सध्याकाळ होती ती मला सारखे वाटे, आज अशा अवलक्षणानें सुरू

झालेली ही रात्र,—हिच्या या गडद अधारातच काढावयाचे का आयुष्य आपल्याला यापुढे ! पलीकडच्या खोलीतील काचपात्राचा आवाज माझ्या कानावर आला, (न् मनाचा सारा धीर सुटल्यासारखा होऊन डोळ्यातून पूर लोटला एकदम इतका वेळ आवरून धरलेल्या अश्रूचा !) त्या स्थितींतच डोळा लागला माझा थोडा वेळ, न् मी पुन्हा मध्यरात्रीच्या सुमारास जागी झालें पलीकडे निजलेल्या मुलाचे सथ श्वसन कानावर पडले माझ्या पण तो नित्याच्या परिचयाचा घोरण्याचा मद आवाज मात्र ऐकू आला नाहीं मला त्याबरोबर एकदम चमत्कारिक शका मनात येऊन अथरुणावरून धडपडत उठलें मी खिडकीतून आत आलेल्या चद्राच्या प्रकाशात मी बघितलं,— त्याच्या गादीवर घातलेल्या चादरीला एकही सुरकुती पडलेली नव्हती मी धावतच बाहेर गॅलरीत आले तोंच माझ्या कानावर कसला तरी करुणपूर्ण आवाज, कुणाचा तरी दाबून धरलेला हुदका आला मी खालीं पाहिलें — काय पाहिले मी ?—ते बागेतल्या बाकावर बसले होते न् त्याच्या छातीवर डोके ठेवून ती स्फुदत होती ! —



मीनाने हाक मारल्याबरोबर जागी झाले मी पण अथरुणावरून उठून खालीं जाण्याची इच्छा मात्र होईना मला झोंपेमुळे विसर पडला होता मला रात्री बघितलेल्या त्या प्रकाराचा पण उठल्याबरोबर तो प्रसग डोळ्यापुढें उभा राहिला आणि वाटले,—मी या झोपेंतून अजिबात उठले नसते तर ? धाय मोकलून रडल्यावर अखेर थकव्यामुळे आलेल्या निद्रेने या भयाण जगातून उचलून विस्मृतीच्या ज्या नीरव प्रदेशात मला नेले होते, तिथून परत आले मी पुन्हा डोळे उघडताक्षणीच पण या जगात आता काय उरलें होतें माझें ? काल रात्री तो प्रकार दृष्टीस पडेपर्यंत मला स्वत चे घर होते, स्वत चा ससार होता, स्वत चें भावनामय जग होतें पण, अर्धांगाचा झटका आल्यावर जसा निमिषार्धात शरीराच्या साऱ्या शक्तीचा चक्काचूर होऊन जावा, भूकपाचा धक्का बसल्यावर जसे क्षणार्धात सारें वस्तुजात जमीनदोस्त होऊन जावे, तशी अवस्था झाली होती आज त्या जगाची जिकडे पहावे तिकडे विनाश, विनाश ! मरणापेक्षांही मारक, दहनापेक्षाही दाहक असें जर जगात कांहीं असेल, तर तो

ज्या भावनावर आपले जीवित अवलबून असतें, त्या भावनाचा विध्वस शरीराला येणारा मृत्यु एक वेळ पुरवला पण हें भावनाचे मरण, हा आत्मिक मृत्यु फार भयकर त्यानतर मनुष्य जिवत रहाते, ते केवळ त्या भावनाच्या प्रेतावर अश्रु ढाळण्यासाठी मेलेले शरीर काही वेळाने भस्म होऊन जाते, मातीला मिळून जातें पण या मेलेल्या, मारलेल्या भावना मात्र जळत न् जाळीत रहातात माणसाला शेवटपर्यंत ! — मी डोळे उघडले आणि गेल्या बारा वर्षांत आम्ही उभयतानी सहकारितेनें उभारिलेलें प्रेमभावनाचे सारे जग, आमचा सारा ससार, आमचे प्रेममय सहजीवन कोलमडून, उध्वस्त होऊन पडलेले दिसलें मला त्या सरशी मी पुन्हा डोळे मिटले, त्या जागृतीने ग्लानि येऊन निपचित पडले मी माझी ती स्थिति पाहून मीना घाबरली, व माझ्या अगावर हात टाकून तिने करुण वाणीने मला विचारले, “ आई, आई, काय होतय ग तुला ? अस का करतेस तू ? ” तिच्या त्या शब्दानी भानावर आणले मला, जाणीव करून दिली मला माझ्या जबाबदारीची, आशेचा किरण दाखवला माझ्या हताश मनाला मी डोळे उघडताच ती म्हणाली, “भाईसाहेबाना आणू का बोलावून ? बरं नाही का वाटत तुला ? ” तिचे ते उद्गार ऐकताच मी ताबडतोब उठून बसलें, न् तिला घाईघाईने म्हणाले, “ नको, नको, त्याना बोलावण्याची काही गरज नाही बाळ मला की नाही थकवा वाटतो आहे फार पण बर वाटेल थोड्या वेळान ” आणि, मला काय वाटले कुणाला ठाऊक, माझ्याकडे शोधक, साशक डोळ्यानीं पहात असलेल्या त्या मुलीला मी जवळ ओढून घेतली, घट्ट हृदयाशी धरली माझ्या मी किती किती प्रयत्न केला मन आवरण्याचा ! पण माझ्या डोळ्यातले अश्रु तिच्या मस्तकावर पडले,— अगदी न कळत, अगदी अचानक पडले त्याबरोबर माझ्याकडे भयचकित दृष्टीनें बघून ती म्हणाली, “ अस का ग करतेस तू आज आई ? ” मला कळून चुकलें, आणखी काही वेळ जर मी त्या स्थितींत तिच्या बरोबर तिथे बसलें, तर माझा आवरून धरलेला सारा दु खावेग प्रकट होईल एकदम, म्हणून अथरुणावरून उठून मी उभी राहिलें, व डोळे पुसून तिला म्हणाले, “ जागरणामुळ माझ डोक कीं नाही फार दुखतय बेटा ! ” त्याबरोबर ती उद्गारली, “ बाम आणून लावू का

मी तुझ्या कपाळाला ?—तू पडून रहा मी मावशीला वरच आणायला सागते कोको ” “ नको, नको, चल खालीच जाऊ आपण तू पहा, किती लवकर मला बरं वाटत ते ! ” मी डोळ्यात आलेले अश्रु मागे परतवीत हसून म्हणालें मी खाली आल्यावर पाहिलें,—मला उठावयाला उशीर झाल्यामुळे चहा होऊन गेला होता त्याचा मुले मात्र स्वयपाकघरात बसली होती “ मावशी, मावशी” करित मनूपाशी मला पहाताच मनू कोकोच्या तयारीला लागली, व मी पाटावर येऊन बसताच तो ओतून माझ्यापुढे ठेवला तिने मी त्याचा एक घोट घेतला, पण मला पिववेना तो म्हणून मी सहज विजयला म्हणालें, “ विजू, तू घेतोस कोको थोडासा ? ” त्याबरोबर माझ्या समोर बसलेल्या मनूकडे बघून त्याने फुरगटून म्हटले, “ मला नको जा तुझ्या कपातला कोको —मावशी देईल मला आपल्यातला थोडासा ! ” त्याचे ते उद्गार ऐकून भडभडून आले मला अपुऱ्या दिवसाचा हा मुलगा !—किती कष्टानें उरी पोटी बाळगून वाढवला होता मी त्याला !—त्याचा तो नावडता असल्यामुळें माझा फार जीव होता त्याच्यावर —आणि त्याने असे उत्तर द्यावे मला ! मनू आल्यापासून माझ्याकडचा त्याचा न् कुसुमचा ओढा कमी कमी होत जाऊन अलिकडे त्याना परब्रह्म होऊन बसली होती ती अगदी पण इतके दिवस वाटले नाही मला त्याचे काही मी त्याना घ्यावयाला गेलें असता त्यानी जरी मला हिडीस फिडीस केले, तरी, मला वाटे, माझ्या हातून नाही का आबाळ होत त्याची ?—परतु किती झाले तरी माझी मुले आहेत तीं; आज ना उद्या माझ्याकडेच येतील पुन्हा पण आज ?— आज मात्र तसे वाटलें नाही मला मनूच्या उष्ट्या बशींतून त्या दोघाना कोको पिताना पाहून सताप झाला माझ्या जिवाचा मला वाटले, माझी मुलें सुद्धा नाही का लाभू देणार ही मला ? तिच्यावर विश्वास टाकून त्याच्याकडे मी दुर्लक्ष केलें, त्याचें असे प्रायश्चित्त मिळणार आहे का मला ? मी जन्म देणारी, खस्ता खाणारी आई. आणि माझ्याशी विजूने अशा रीतीनें वागावे ! तिथे बसून ते दृश्य पहात कोको पिववेना मला. मनू बघत होती माझी ती स्थिति पण एका शब्दानें विचारलें नाही तिने मला “ तुला काय होतय ? ” म्हणून तिला कल्पना नव्हती,—मी काहीं पाहिलें किंवा ऐकलें असेल अशी. पण, माझ्या लक्षांत न

सागता सवरता साऱ्या गोष्टी आल्या आहेत, हे मात्र कळून चुकलें होतें तिला स्त्रियाना मुळीं एक प्रकारचें अतर्ज्ञानच असतें अशा बाबतीत सर्वसाक्षी तारकाना जी कृत्ये दिसत नाहीत आणि सर्वसचारी वायूला ज्याचा सुगावा लागत नाही, त्या कृत्याची रेषा न् रेषा—त्याचे पूर्वीचे धागेदोरे आणि पुढचे परिणाम स्पष्ट दिसून पडतात त्याना एका क्षणात मी तो कोको तसाच टाकून उठले, व बाहेर येऊन पट्टेवाल्याला मोटार तयार करावयाला सागितली ती पोर्चमध्ये येऊन उभी राहीपर्यत जो वेळ मिळाला, तेवढ्यात मी नीटनेटके केले केस माझे आणि उठल्यापासून माझ्या भोंवती घुटमळत असलेल्या मीनाला म्हटलें, "बाहेर चलतेस का तू माझ्याबरोबर थोडा वेळ ?" आम्ही दोघी मोटारीत येऊन बसतो न् बसतो, तोंच गॅलरीतून मोठ्याने विचारणें झाले, " कुठ निघालीस मीना या वेळी ? " " आईबरोबर डॉक्टरकडे जाते आहे मी, " तिने चटदिशी उत्तर दिले न् मोटार सुरू झाली लगेच क्वीन्सरोडला मोटार लागताच तिने मला विचारले, "कुठ जायचय आपल्याला ?"—"कुठ नाही मला बर वाटत नसल्यामुळ थोड फिरून येऊ समुद्रावरून, " मी तिला म्हणालें भरती ओसरून गेल्यामुळें सारे वाळवट उघडें पडलें होते थोडा वेळ फिरून आम्ही त्या उन्हाने किंचित् तापलेल्या दमट वाळूवर बसलो त्याबरोबर तिनें मला विचारले, " आई, अस काय करते आहेस तू आज ? भाईसाहेब बोलले का तुला काहीं ? साग ना मला ? " तिचा तो प्रश्न ऐकताच माझें हृदय भरून आलें, व मी तिला जवळ घेऊन म्हणालें, " मीना तू नाहीं ना ग सोडून जाणार मला कधी ?—"



मी मोटारीतून खाली उतरलें, न् व्हराड्यात वाचीत बसलेली मीना दृष्टीस पडली माझ्या मला पहाताच ती हातातले पुस्तक खाली ठेवून हसत हसत पुढें आली तिच्या त्या हसण्याचे मर्म ओळखून मी तिला विचारले, " का ग, तू फिरायला का नाहीं गेलीस आज ? " " मी सागितल होत ना तुला काल मी फिरायला जाणार नाही यापुढ त्याच्या बरोबर म्हणून ! " तिने उत्तर दिलें मला " बर नाही केलस तू हें मीना ! त्याना काय वाटल असेल तुझ्या या वागण्यान ? " मी म्हणालें " काय वाटायचय ? सतापले खूप मी नाहीं म्हटल्या-

वर पण जायच कशाला त्याच्याबरोबर? मावशीपुढ एक शब्द तरी बोलायला सुचतोय का त्याना माझ्याशी?" ती बेपर्वाईनें हसून म्हणाली मला भीति वाटली तिच्या त्या बोलण्याची —घरीं आल्यावर या साऱ्या प्रकाराचा राग माझ्यावर निघणार आता! मुलाना काही कळत नाहीं अशा समजुतीने आपण वाटेल त्या गोष्टी करितों त्याच्यासमोर पण, त्याच्या भावना जिथे दुखावल्या जातात, तिथें बरोबर कळते त्याना आपल्याभोंवतीं काय चाललें आहे, मोठ्या माणसाचें कुठे चुकते आहे ते मीनाला अतिशय लळा होता त्याचा, व तिच्या पाठीवर तीन मुलें झाली, तरी त्याच्या हृदयातलें तिचें स्थान पहिलेच राहिले होते नेहमी दुसऱ्या कोणावरल्या तरी प्रेमामुळें आपल्यावरलें त्याचें लक्ष कमी व्हावे, हे सहन नाहीं झालें तिला त्यातून आपल्या आईची जागा मनूला मुकाट्यानें घेऊ देण्याइतकी ती अजाण किंवा अप्रबुद्ध नव्हती इतर मुलासारखी मनू कोणत्या स्थितीत आपल्या घरी आली आणि कशा रीतीने तिचे प्रस्थ घरात वाढलें, याची तिला जाणीव होती मनूच्या पायी त्यानी चालविलेली माझी पायमल्ली तिला इतकी जाणवली नसती कदाचित् पण आपली स्वत:चीही उपेक्षा व्हावयाला लागली त्या नादानें याची चीड आली तिला आपल्या व त्याच्या प्रेमांत एका तिऱ्हाईत बाईविषयीच्या छंदामुळें आडपडदा उत्पन्न व्हावा, त्याच्या जीवनातलें आपलें पहिलें स्थान त्या बाईनें बळकावावे, याचे वैषम्य वाटलें तिला फार. आपली मुलगी आपल्या सारखीच मानी न् भावनाप्रधान आहे, हें कळावयाला नको होतें का त्याना? पण ती लहान आहे,—तिला काय समजणार आहे यातलें?—या भावनेनें ते वागले तसे आणि आता तिच्या वागण्यांत झालेल्या या फरकाचें खापर मात्र माझ्या कपाळावर फोडतील ते!—ही माझी भीति खरी ठरली अखेर. काल सध्याकाळपासून एक शब्दही बोललों नव्हतों आम्ही एकमेकाशीं (पण रात्रीं मुले निजलेलीं बघितल्यावर त्यानीं हाक मारली मला मोठ्यानें एकदम) मी मुकाट्यानें त्याच्या समोर जाऊन बसलें त्याबरोबर सिगारेटचा धूर माझ्या अगावर सोडून मला एकदम रागानें विचारलें, "तुझ्या मनात काय आहे अनू?" "काय अपराध केला आहे मी असा प्रश्न मला विचारायला?" मी उलट विचारलें अलिकडे ज्यांचा आवाज माझ्या संवईचा

झाला होता, ती काचपात्रे टेबलावर अस्ताव्यस्त पडली होतीं, व त्याच्या त्या तारवटलेल्या डोळ्यात ओतप्रोत तिरस्कार भरलेला होता त्याच्या न् माझ्या ऋणानुबधाचे तुटलेले धागेच जणु पहावयाला मला बोलावली होती त्यानी तिथे ! पण ते उद्वेगजनक दृश्य पहाताच मी अगदीं निश्चय केला मनाशी साऱ्या गोष्टीचा सोक्षमोक्ष करून घेण्याचा माझा तो प्रश्न ऐकताच ते चिडून उद्गारले, "काय अपराध केलास माहित नाही तुला ? आज मीनाला कुठ नेल होतस तू सकाळी आपल्याबरोबर ? तेव्हापासून नीट वागत नाहीं ती आमच्याशी !"—ते थोडे चाचरले, पण लगेच जोरानें म्हणाले, "तिच्याशीं तर एक शब्दही बोलली नाही ती साऱ्या दिवसात—तिच्याविषयीं कसल विष भरवून दिल आहेस तू मीनाच्या मनात ?" "मी कशाला भरवून देऊ मीनाच्या मनात भलत सलत ? जिन माझ्या ससारात विष कालवल, तिचा कैवार घेऊन माझा अपमान करायला का बोलावलीत तुम्ही मला इथ ?" मी म्हणाले "ती कशाला तुझ्या ससारात विष कालवील ? तूच कालवलस आपल्या हातान आपल्या ससारात विष !—तुला माहित होता माझा स्वभाव मी बजावून सागितल होत तुला अनेकदा,—तू मला सर्वस्वी हवीस म्हणून पण तू जाणून बुजून अवज्ञा केलीस माझी न् आता दोष देतेस तिला ! नवरा न् मुल याच्यापेक्षा ज्या स्त्रीला सार्वजनिक कामाच महत्त्व अधिक वाटत, तिचा काडीचाही हक्क नाही त्याच्यावर !—हेच सागितलस का तू मीनाला सकाळी समुद्रावर नेऊन ? बापाच्या विरुद्ध मुलाचीं मन कलुषित करणारी तू !—तुझ तोंड पाहू नये अस वाटायला लागल आहे मला !" बोलता बोलता त्यानी सतापानें टेबलावर जोरानें हात आपटला "एकदा सागितल ना आपल्याला—मीनाच्या मनात मी काहीं भरवल नाही म्हणून ? किती झालं तरी आपलीच मुलगी आहे ती घरात उघड उघड चाललेल्या गोष्टी न दिसण्या-इतकी, न कळण्याइतकी बुद्धिहीन का समजता तुम्ही तिला ? मुलाच्या समोर वाटेल तस वागायच न् त्याची मन विटलेलीं दिसताच भलभलते आरोप करीत सुटायच दुसऱ्यावर ! तुमच्या या साऱ्या बोलण्याचा अर्थ असा सम-जायचा का, कीं मी या उप्पर इथ रहाव अशी तुमची इच्छा नाही म्हणून ?"—बोलता बोलता मी खुर्चीवरून उठलें "कोण म्हणतो तू इथ राहू नयेस

म्हणून ? तुझ्या दृष्टीन जरी मी माणुसकी सोडली असली, तरी मी मनुष्यच आहें अजून रहा, रहा, खुशाल रहा तू इथ !—माझी बायको म्हणून नव्हे, पण माझ्या मुलाची आई म्हणून इथ रहाण्यत्वा हक्कच आहे तुला !" ते हेटाळणीने हसून म्हणाले त्याच्या त्या शब्दानी काळजाला घरे पाडले माझ्या, न् मी तशीच धावत खोलीत येऊन अथरुणावर अग टाकले दु खाने —मला वाटलें, अशा रीतीने माझा उपमर्द करण्यापेक्षा हटराचे तडाके माझ्या पाठीवर ओढून हाकून का नाही दिली त्यानीं मला घराबाहेर ?—त्याची बायको म्हणून नव्हे, तर त्याच्या मुलाची आई म्हणून मी नादावयाचे त्याच्याबरोबर यापुढें !—देवा, यापेक्षा मीनेच्या जन्माच्या वेळीच मरण का नाही आले मला ? त्या वेळी जर मी मेलें असते, तर त्याच्या प्रेमाश्रूचे अभ्यग स्नान तरी घडलें असते माझ्या प्रेताला ! "माझ्या मुलाची आई !—" कसे हो उच्चारवले हे कठोर शब्द तुम्हाला ? ज्या मुलाना मी नऊ महिने माझ्या पोटात वागवलें आणि माझ्या रक्ताच्या दुधावर ज्याचा पिंड पोसला, ती मुले फक्त तुमचीं एकट्याची !—माझा काहीच का हक्क नाही त्या मुलावर ? मुलाला जन्म देणारी माता ही काय केवळ भोगदासी आहे का तिच्याविषयी असली भाषा वापरावयाला ? मुलावर सर्वात जास्त हक्क जर कुणाचा असेल, तर तो आईचा तिच्या रक्तावर, तिच्या दुधावर, तिच्या मायेवर मूल पोसले जाते !—सारी सृष्टि हे सत्य कठरवाने सागत आहे स्वत च्या सुधारणेचा दिमाख मिरविणारी मनुष्यजात सोडून जगातली इतर कोणतीही जीवकोटि पहा —तिथे मूल आईच्या अगाला बिलगलेलें दिसेल तुम्हाला ! अशा स्थितीत त्याच्या केवळ उत्पत्तीला निमित्तमात्र होणाऱ्या पुरुषाने मुलावर हक्क सागावा न् वासनेच्या धुदीत त्याच्या मातेला तुच्छतेनें लाथाडावी, हीच का तुमची सुधारणा न् सस्कृति ? तुम्ही म्हणता त्याप्रमाणें आईचे कर्तव्य मी नीटपणें केलें नसेल कदाचित् पण, हें विसरू नका,—उपजल्याबरोबर शकुतलेला रानात टाकून चालती होणारी मेनका, आपल्या मुलीचा तिच्या प्रियकरानें विश्वासघात केलेला पहाताच, स्वर्गांतले सारे सुखोपभोग सोडून धावत आली तिच्या साह्याला अपरसृष्टि उत्पन्न करणारा तुमचा तो घमेंडखोर विश्वामित्र कुठे दडी देऊन बसला होता त्या वेळीं ? मुलाच्या संगोपनात जरी कदाचित् माझ्या हातून अतर पडलें असलें,

तरी तेवढ्या एका कारणामुळें तुम्ही लगेच हक्क नाकारणार का माझा त्याच्या-वरला ?—नाही, नाही ! संसार तुमचा असला, घरदार तुमचें असले,—फार काय, माझ्या शरीराचे जरी तुम्ही मालक असला, तरी मुलें माझीं आहेत, सर्वस्वी माझी आहेत—!

- ❦ -

मला दिवसेंदिवस दु सह होत चाललें त्या घरात रहाणें दिवसभर काहीं ना कांहीं तरी कामात मन गुतलेलें असल्यामुळें तितका त्रास होत नसे मला पण रात्र !—आपल्या कोट्यवधि नेत्रातील कोमल किरणानीं प्रणयिजनाच्या हृदयात अनत भावना उद्दीपित करणारी रात्र !—काळसर्पिणीच्या अगावरील सतेज शुभ्र ठिपक्यासारखे वाटत असत मला ते तारे ! सुखी माणसाला विसावा देणारी रात्र दु खी माणसाला विषासारखी वाटते अगदीं त्याचा तो रिकामा पडलेला बिछाना रात्रभर डोळ्यापुढे असावयाचा !—मी चौकशी केली नाही कधी ते कुठे निजतात याची —आमच्या वैवाहिक जीवनात झालेला तो बदल नोकराच्या आणि त्याहीपेक्षा मुलाच्या ध्यानात येऊ नये, म्हणून नेहमीच्या जागीच घातला जात असे त्याचा बिछाना पण—पण मीनाच्या मात्र लक्षात आली लवकरच ती गोष्ट शरीराच्या दुखावलेल्या भागाला जशी कोणतीही संवेदना झटकन जाणवते, तसेंच दुखावलेल्या मनाचेही असतें थोडेंसें तीन चार दिवसाच्या आतच मीनाने मला एक दिवस भुवया चढवून विचारलें, "भाई-साहेब आताशा लवकर उठतात का आई ?' तिच्या त्या प्रश्नाचा रोख मी ओळखला, नव्हे, माझ्या अपमानित मनाला डागणी दिल्यासारखी झाली अगदीं आईबापाच्या वैवाहिक जीवनातील व्यगावर मुलानीं बोट ठेवावे,—न कळत का होईना, तें व्यग त्याच्या नजरेला येऊन त्याबद्दल त्यानीं साशक व्हावें !—कोणत्या आईच्या हृदयाला पीळ पडणार नाही या स्थितीनें ! माझ्याकडे निश्चलतेनें पहात असलेल्या मीनाच्या दृष्टीला दृष्टि न देता मी हळूच तिला म्हटलें, "होय, अलिकडे पहाटे फिरायला जायच असत वाटत !" ती बोलली नाहीं त्यावर काहीं पण मुले नेहमींच त्यांच्या आधीं निजून उठत असल्यामुळें, खरा प्रकार तेव्हांच ध्यानांत आला तिच्या मुलांच्या लक्षात या गोष्टी येऊ नयेत, म्हणून जपावयाला नको होतें का त्यानीं ? मुलाचीं मनें हीं

झऱ्याच्या पाण्याइतकी प्रसन्न न् पारदर्शी, पण त्याच्याच सारखीं विकारसुलभ असतात फार पाणी जसे एकादी क्षुल्लकही वस्तु त्यात पडल्यानें विचलित न् दूषित होऊन जाते, तसेच असते मुलाच्या मनाचेही मी एक कस्पटासमान होऊन बसले होतें त्याच्या लेखी पण मीना तर त्याची लाडकी होती ना ? तिनें आपल्याबरोबर फिरावयाला यावे, म्हणून ते रोज तिची मनधरणी करीत असत ना ? मग तिचे मन आपल्याविषयी विटू नये म्हणून तरी काळजी घ्यावयाला नको होती का त्यानी ? पण एक प्रकारच्या बेछूटपणाने ते वागत होते जसे काही मी पहाटे चार चार वाजेपर्यंत तळमळत पडलेली असे अथरुणावर. त्यामुळें पुष्कळदा त्या दोघाचे पलिकडल्या खोलीतलें सभाषण किंवा बागेंत चाललेला हास्यविनोद कानावर पडून लाही लाही होत असे माझ्या जिवाची चादण्या रात्री बागेतल्या ज्या हॅमॉकवर बसून पूर्वी आम्ही दोघानीं !—पण नको, नको; कशाला आता आठवण त्या गोष्टीची ? रात्रीच्या वेळी त्याच्या त्या चोरट्या हालचालींची चाहूल माझ्या कानावर आली, म्हणजे मला असे वाटे कीं, कुठे तरी अगदी दूर दूर निघून जावे,—जिथे त्याच्या हालचालीचीच काय, पण स्मृतीची सुद्धा चाहूल मनाला लागणार नाहीं अशा ठिकाणी जाऊन दडी द्यावी. पण जावयाचे तरी कुठे आणि कसें ? आप्पा वारल्यानतर आम्ही तसेंच ठेवलें होते तें घर, न् अलीकडे केव्हा केव्हा मन फारच वैतागलें म्हणजे तिथे जाऊन अश्रु गाळीत बसत असे मी एकातात पण, त्या घरात जरी कायमचें जाऊन रहाणें शक्य असले, तरी लोकाना काय वाटेल, मुलाना काय वाटेल, माझ्या स्वत च्या मनाला तरी काय वाटेल ? मुलाच्या जीवितावर काय परिणाम होईल माझ्या गृहत्यागाचा ? आपल्या आईबापाविषयी, त्याच्या वैवाहिक जीवनाविषयी काय कल्पना होईल मुलाची ? घरातले नोकर त्याच्या कानावर जाईल अशा रीतीनें कुजबुजतील, कुटुबातली मडळी त्याच्याकडे तुच्छतामिश्र अनुकपेने पहातील; शाळेंतली मुलें त्याना हेटाळणीनें हसून भलतेंसलते विचारतील,—स्वत जरी मला काहींही म्हटले असलें आणि कसेही वागवलें असलें, तरी माझ्या मुलाच्या निरागस जीवनात मी कसें विष कालवू माझ्या हाताने ? आमच्या ससाराचा विचका मी कसा दाखवून देऊ त्याना माझ्या वर्तनानें ? तुमचे वडील व्यभिचारी आहेत असें मी कसें सागू त्यांना माझ्या कृतीनें ? जोंपर्यंत मी या घरांत रहातें आहें,

तोंपर्यंत कोणत्याही गोष्टी घडत असल्या, तरी बाहेर कुणाची छाती नाही होणार मुलाना काही विचारण्याची पण मी एकदा घराबाहेर पडले म्हणजे माझ्याबरोबर हा दुर्लौकिकही सारा घराबाहेर पडेल !—आपल्या वडिलाचे वर्तन वावगे आहे न् म्हणून आपल्या आईने घर मोडले, हे क्षणोक्षणी कानावर पडेल मुलाच्या,—घरातली प्रत्येक वस्तु बजावून सागेल हे त्याना आमच्या चुकाचे, आमच्या पापाचे प्रायश्चित्त मी मुलाना का म्हणून भोगावयाला लावू ? असल्या नादान आईबापाच्या पोटी आम्ही आलों, म्हणून त्यानी जन्मभर म्हणत रहाण्यापेक्षा मी जर दु खात पिचत सारा जन्म या घरामध्ये काढला, तर काय बिघडणार आहे ? वृक्षाला लागलेली कीड फळाना बाधू नये म्हणून जसे उपाय करिता येतात, तसे आईबापाच्या चुकाचे परिणाम मुलाना भोवू नयेत, म्हणून नाही का करिता येणार काहीं ?, नवराबायको म्हणजे जसा ससार, त्याप्रमाणे आईबाप म्हणजेच घर आईबापात जर बेबनाव झाला, तर मुले घराला मुकतात. मी जर त्याच्या रागाने घरातून बाहेर पडले, तर मुलाच्या आयुष्याची नासाडी नाही का होणार ? पण हा विचार माझ्या इतकाच त्याच्याही नको का मनात यावयाला ? त्यानी जर बाहेर कुठे काही ढग केले असते, तर मी लक्ष दिले नसते कदाचित् तिकडे कारण, गेली तेरा वर्षे पहाते आहें मी—मुबईतील बहुतेक प्रतिष्ठित पुरुषाच्या काही ना काही करमणुकीच्या सोई होत्या घराबाहेर माझ्याबरोबर समाजात सपन्न न् सुखी म्हणून मिरविणाऱ्या इतर बायका जशा या बाबतीत अभागी आहेत, मनातून दु खी कष्टी आहेत, तशीच मीही एक,—त्या जशा पुरुष स्वभावत च बहुस्त्रीक आहे असे समजून मुकाट्यानें ससार करतात तसाच मीही केला असता !—पण खुद्द माझ्या घरात, रात्रदिवस माझ्या डोळ्यासमोर ! कसे कसे सहन करू मी हें !

-  -

मी माझा तो बेत सागितल्याबरोबर चवताळून गेली स्वारी अगदीं मुलाच्या कानावर त्यातलें काही जाऊ नये, अशी इच्छा होती माझी, व म्हणून ती निजल्यावर मी हळूच, ते एकटे आहेत असें बघून, त्याच्या खोलीत गेलें आणि सरळ सागितलें त्याना, अशा स्थितीत या घरात रहाण्याची माझी इच्छा नाही, म्हणून त्याबरोबर क्षणार्ध ते स्तब्ध, स्तिमित झाले अगदीं पण नतर

संतापानें माझ्या अंगावर खेकसून इंग्रजीत म्हणाले, "मला धमकी द्यायला आलीस का तू इथं ? त्यापेक्षा सरळ कोर्टात जाऊन घटस्फोट का नाहीं मागत तू ? तुला असं वाटतं तुझ्या असल्या धमकीला भिऊन मी मनोरमेला अंतर देईन म्हणून ? माझा कितीही दुर्लौकिक झाला, सगळ्या जगानं जरी मला व्यभिचारी म्हणून निंदलं, तरी तुझ्या या धमकीला भीक नाही घालणार मी मला माहित आहे, वडिलांच्या पैशाच्या जोरावर उड्या आहेत या तुझ्या ! पण लक्षात ठेव एकदा तू या घरातून गेलीस की, मी तोंड नाही पहाणार पुन्हा तुझं ! तू मला मेलीस न् मी तुला मेलों !" "असली अभद्र भाषा वापरण्याचं कारण नाही आपल्याला मुळीच आपण मला पुन्हा कधी बोलवाल अशी जर आशा मला असती, तर कशाला निघालें असतें मी हा भरला संसार सोडून ? मला कळतें, हें घर, हा संसार मी कायमचा सोडून जात आहे हें माझ्यासुद्धा जिवावर आलं आहे इथून जायचं पण उघड्या डोळ्यांनी प्राण जाईना म्हणून ठरवलं मी जायचं अखेर" मी अगदीं नम्रपणानें उत्तर दिलें "मला माहित आहे तू कां जाते आहेस तें—माझी बेअब्रू व्हावी, मला समाजानें बहिष्कृत करावें, माझ्या सार्वजनिक आयुष्याची नासाडी करून माझा सूड घ्यावा, म्हणून जाते आहेस तू !" बोलतां बोलतां त्यांनी खुर्चीवरून उठून फेऱ्या घालावयाला सुरवात केली "जा, जा, खुशाल जा, अगदी या क्षणीं चालती हो मी आतां मोटार आणायला सांगतों !"—इतकें बोलून ते गॅलरीत पट्टेवाल्याला हाक मारावयाला जाणार, तोंच मी त्यांना म्हणालें, "आतां कशी जाऊं मी अपरात्रीं ? मुलांना झोपेतून उठवावं लागेल—" "कां ? त्यांना कशाला उठवायचं ? त्यांचा काय संबंध आहे यांत ?" ते लगेच मागें वळून माझ्याकडे पहात उद्गारले त्यांच्या त्या दृष्टींत इतकी तुच्छता, इतका द्वेष भरलेला होता की, हृदयांत कांही तरी भोसकल्या-सारख्या वेदना झाल्या मला, व डोळ्यांत उभे राहिलेले अश्रु आवरून मी त्यांना म्हणालें, "कां बरं ? माझी मुलं नाहीं येऊं देणार का तुम्ही माझ्या-बरोबर ?" "तुझी मुलं ? जी बाई घर सोडून जायला निघते, तिची कसलीं मुलें ? तिचा काय हक्क आहे मुलांवर ? आणि तुला वाटतं मुलं तुझ्याबरोबर येतील म्हणून ? भ्रमांत आहेस तू अनू ! कोणी कोणी येणार नाही तुझ्या-

बरोबर !" ते तिरस्काराने हसून म्हणाले. पण, त्याचे ते विदारक, विकट हास्य माझ्या कानावर पडते न पडते, तोच धावत धावत तिथे आलेली मीना एकदम माझ्या कमरेला विळखा घालून म्हणाली, "मी—मी येईन आई तुझ्याबरोबर !" क्षणैक स्तमित झाले ते तो अनपेक्षित प्रकार पाहून, व संतापानें लाल झालेलें त्याचे तोंड एकदम पाढरे पडून खुर्चीचा आधार घेतला त्यानी आमच्याकडे पहाता पाहता त्याच्या चेहऱ्यावरल्या रेषा कठोर, क्रूर भेसूर होत गेल्या अगदीं आणि ते एकदम त्वेषाने उद्गारले, "समजलो, समजलों—या पोरीला खोलीत पढवून बसवून ठेवून माझी अशी नाचक्की करण्यासाठी आलीस तू इथ—खरोखरी बायको नव्हे, वैरीण आहेस तू माझी—बोल, बोल मीना, काय भरवल हिन तुझ्या मनात माझ्याविषयी ?" त्यानी पुढे येऊन माझ्याजवळ उभ्या असलेल्या मीनेचा हात आपल्या हातात घेण्याचा प्रयत्न केला पण त्याच्या हातातून तो सोडवून घेत ती अगदी शातपणाने म्हणाली, "आईन काही सागितल नाही मला तुमच्या आवाजान जागो झाले मी झोपेतून न् इथ आलें तुमच बोलण ऐकून !—आई, खरच का ग जाणार तू इथून ?" "होय, तुझ्या आईची इच्छा नाही यापुढे माझ्याजवळ रहाण्याची बोल, तू सुद्धा जाणार का तिच्याबरोबर ? विचार करून उत्तर दे मीना —मी पुन्हा नाहीं कधी तोंड पहाणार तुझ तू जर हिच्याबरोबर मला सोडून गेलीस तर !" त्यानीं किंचित् दरडावून म्हटलें क्षणमात्र घोटाळल्यासारखी झाली ती तिने एकवार त्याच्याकडे न् एकवार माझ्याकडे दृष्टि फेकली, व नतर ती म्हणाली, "तुम्हाला सोडून जाण्याची माझी इच्छा नाही, भाईसाहेब पण—" "पण काय ? बोल, बोल लवकर," ते अधीरतेने उद्गारले "—पण मावशीला तुम्ही घरात नाही ठेवता कामा !—तरच राहीन मी तुमच्याजवळ !" ती म्हणाली "कुणी, कुणी शिकवल तुला अस बोलायला मीना ?"—आणि एकदम दुःखावेगानें खुर्चीवर अग टाकून त्यानी दोन्ही हातानी आपलें मस्तक घट्ट दाबले त्याची ती अवस्था पाहून मला भीति वाटली अतिशय, व त्याचें डोके आपण हळूच जाऊन दाबावे असा विचार मनात आला माझ्या तोंच ते खुर्चीवरून उठून मला त्वेषानें इग्रजींत म्हणाले, "छान, छान सूड घेतलास तू अनू आज माझा ! माझ्या मुलीन, मला प्राणापेक्षा प्रिय असलेल्या माझ्या मुलीन

मला अशा रीतीन बोलून घरातून निघून जाव !—रोज रात्रीं असल्याच गोष्टी शिकवीत असतेस का तू मुलाना ? तुला अस वाटत, तुझ्याविषयी मला असं काहींच त्याना सागता येणार नाही ?—तुझ पूर्वचरित्र मला काहींच माहित नाहीं म्हणून ?" त्याचे ते उद्गार ऐकून मला मेल्यापेक्षा मेल्यासारखे झालें अगदी, व मी त्याना रडत रडत म्हणाले, " नका, नका मला बोलू अशा रीतीन !—तुमच्या पायाची शपथ, आप्पाची न् आईची शपथ, मी मुलाना काही काहीं सागितल नाही तुमच्याविषयी !—तुमची इच्छा नसेल, तर सारी मुल राहू द्यात तुमच्याजवळ मी जशी तेरा वर्षापूर्वी एकटी या घरात आले, तशीच एकटी जाईन परत इथून !" "नाहीं, नाही आई मी नाही तुला एकटी जाऊ देणार. मी येईन तुझ्याबरोबर" मीनानें माझ्या गळ्याला मिठी मारून म्हटलें त्याबरोबर ते खुर्चीवरून उठून पुढे आले, व मीनाला आपल्याजवळ ओढून घेऊन म्हणाले, " मीना, मीना, तू का जातेस सोडून मला ?—तुला वाटल्यास तू रोज जात जा हिला भेटायला पण मला जाऊ नकोस सोडून!—!" बोलता बोलतां त्याच्या डोळ्यातली टिपें तिच्या अगावर पडली " भाईसाहेब, तुम्हाला विजू आहे, कुसुम आहे, विलास आहे पण आईला मात्र एकट रहाव लागेल मी तिच्याबरोबर गेले नाही तर !" ती म्हणाली ते क्षणमात्र काही बोलले नाहीत नतर त्यानी एकदम तिला उचलली, व आपल्या हृदयाशी एकवार घट्ट धरून तिच्या कपाळाचे चुबन घेतलें नतर एक उसासा टाकून ते उद्गारले, " बरोबर आहे तुझ म्हणण बेटा ज्या गोष्टी तुला कळायला नको होत्या, त्या साऱ्या कळून चुकल्या आज माझ्या दुदवान आता तू इथ राहिलीस तर तुलाही सुख व्हायच नाही, मलाही सुख व्हायच नाही जा, जा तू आपल्या आईबरोबर !—पण दिवसातून एकदा तरी येत जा मला रोज भेटायला इथ नियमान !" आणि लगेच त्यानी गॅलरीत जाऊन पट्टेवाल्याला मोटार तयार करावयाला सागितली त्यानीं मीनाला जवळ घेतली पुन्हा, व मी उठून आपल्या खोलींत आलें तिथें गाढ झोंपेंत असलेल्या त्या मुलाना पाहून भडभडून आले मला,—त्यांना सोडून जाण्याचें जिवावर आलें माझ्या मी खाली बसून एक प्रकारच्या असहायतेनें त्याच्या उशीवर मस्तक टेंकलें तोंच मीनाला घेऊन आत आले ते बरोबर दोन वर्षांनीं खोलींत पाऊल ठेवलें होतें त्यानीं आज माझ्या!—पण

कशासाठी ? मला घरातून बाहेर काढून देण्याकरिता ! त्याना पाहिल्यावर मी धडपडत उठले, पण माझे पाऊल पुढे पडेना तेव्हा ते म्हणाले, " विलास राहिला नाहीं तर सकाळी पोंचवून देईन मी त्याला तुझ्याकडे ! " मी मुकाव्यानें बाहेर आलें त्याच्या मागोमाग उद्या मृत्यूच्या वेळी जग सोडून जाताना होणार नाहींत इतक्या तीव्र वेदना झाल्या त्या वेळी माझ्या जिवाला ! मी एकवार त्या घराकडे डोळे भरून पहाण्याचा प्रयत्न केला, तोंच ते भरून आले एकदम ते पायरीवर उभे राहून निश्चल नजरेने पहात होते आमच्याकडे पण त्यानी एक शब्द उच्चारला नाहीं जगातली सारी निष्ठुरता जणु एकवटून पहात होती त्याच्या त्या डोळ्यातून माझ्याकडे ! मोटार बागेतून बाहेर पडतांच मीनाने एकदम अग टाकलें माझ्या माडीवर, व ती रडत रडत म्हणाली, " आई, आई, खरंच का ग येणार नाहीस तू पुन्हा कधी इथ ? "



खरेंच, का नाही घटस्फोट मागितला मी ?—त्यानी मला मुद्दाम पत्र घालून कळवलें नतर, " तू जर घटस्फोट मागितलास तर मी बचाव देणार नाहीं, " म्हणून —मग का नाही घटस्फोट मागितला मी ? किती तरी लोकानी विचारला असेल हा प्रश्न आजपर्यंत मला त्याच्या दृष्टीनें माझ्या आयुष्यात दोन गूढें होती मनूला एका शब्दानेही जाब न विचारता मी मुकाव्यानें घराबाहेर का पडलें ? आणि घटस्फोटाचा मार्ग मोकळा असता मी त्याचा अवलब कां केला नाही ? स्वत· तर उघड उघड असा आरोप करीत असत माझ्यावर की, मनूशी त्याना पुनर्विवाह करता येऊ नये, त्या दोघाच्या प्रेमसबधावर जगाच्या दृष्टीनें व्यभिचाराचा छाप मारला जावा, म्हणून मुद्दाम खुनशीपणानें मागितला नाही मी घटस्फोट ! पण खरें होते का तें ? खरोखरीच त्याचा सूड घ्यावा, जन्मभर त्या निंद्य स्थितीत त्याना आयुष्य कठावयाला लावावे, असा उद्देश होता का माझा ? नाही, नाही —ज्यांनीं माझ्यावर हा आरोप केला, त्याना मुळी मनोवृत्तीच कळली नाही माझी मला घटस्फोट मागणें कसे शक्य होते ? आम्ही दोघें जरी वेगळीं रहात होतों, तरी मुलाचें दोन्ही घरीं जाणें येणे असे सारखें, व मुलाशीं वागण्याची आमची पद्धत अशी होती कीं, आमच्या वेगळें रहाण्यात विशेष काहीं वावगें असें

वाटले नाही कधी त्याना उलट दोन घरें झाल्यामुळे दोन वाढदिवस, दोन सण, दोन्ही ठिकाणी निरनिराळ्या प्रकारच्या करमणुकी याची गमतच वाटत असे त्याना एका परीने. पहिलें वर्ष सव्वा वर्ष ते आले नाहीत माझ्या घरी पण मग तेही यावयाला लागले मधून मधून मीनाबरोबर ! माझ्या घरात नाही पाऊल ठेवले फक्त काय ते मनूने आणि खरोखरीच तिला तोड होते का यावयाला माझ्याकडे ? तिचा न् माझा सबध दैवाने जणु एवढ्याचसाठी जुळवून आणला होता की, माझ्या सुखावर कळत न कळत बिब्बा घातला जावा तिच्याकडून माझ्या मैत्रिणी केव्हा केव्हा मला म्हणतात, तू जर स्वत घराबाहेर पडण्याऐवजी तिला घराबाहेर काढून दिली असतीस, तर त्याना हिम्मा झाला नसता तुझ्या आड येण्याचा. पण चुकीची आहे त्याची ही समजूत त्याना माहित नाही स्वत चा स्वभाव ते खरेखुरे नादी, जातिवत व्यसनी आहेत त्यानी ज्या गोष्टीचा एकदा ध्यास घेतला, तिची प्राप्ति होईपर्यंत ते पिच्छा पुरवितील तिचा अगदी. माझ्या वेळीं तरी काय केले होते त्यानी ? मी घर सोडल्यामुळें त्याना जरी माझी इतकी शिसारी आली आहे मनातून, तरी मीनासाठी नाहीं येत ते इथे ? मी जर मनूला घराबाहेर काढले असते, तर ते स्वत बाहेर पडले असते तिच्या मागोमाग ! मग काय शोभा राहिली असती माझी ? मी मनूला सुद्धा दोष देत नाही या गोष्टीबद्दल मीनाच्या जन्मापासून मी पहात होते त्याच्या वृत्तीतला फरक केव्हा तरी व्हावयाचाच होता आमच्या ससाराचा असा विचका मनू केवळ निमित्त झाली त्या अनर्थाला ती आली नसती तर दुसरी कोणी तरी आली असती आमच्या सहजीवनाची नासाडी करावयाला त्याच्या रक्तातच आहे ते मुळी ! माझ्याकडे बघून, माझा न् तिचा सबध लक्षात घेऊन तरी तिनें आपलें मन आवरावयाला हवे होते, असें वाटते माझ्या मैत्रिणीना पण, मनूला त्याचा मोह पडला, याबद्दल तिला नावें ठेवावयाला मला जागा आहे का ? अरूविषयीचे प्रेम माझ्या हृदयात जागृत असताना मी नाही बळी पडले त्याच्या अनुनयाला, त्याच्या आकर्षणाला ? त्याचे रूप, त्याचा रुबाबच मुळीं असा आहे कीं, पतगानीं जशी दीपज्योतीवर झडप घालावी, तसें स्त्रियाचे मन त्याच्या वासनेला बळी पडावे म्हणून दोष नाही द्यावासा वाटत मला मनूला ! उलट, माझी जागा मनूनें घेतल्यामुळे,

मुलाना आईच्या जागी मावशी आली, एवढाच फरक वाटला असेल फार तर! पण, तिच्या ऐवजी जर एकादी परकी स्त्री आमच्या घरात शिरली असती, तर—तर मला कल्पना नाहीं करवत किती विदारक परिणाम झाला असता मुलाच्या आयुष्यावर त्या गोष्टीचा ते!—म्हणून मी त्याना दोष देत नाही, तिला दोष देत नाही, दोष फक्त माझ्या नशिबाला देते ती सुदर आणि तेही सुदर —त्या दोघाना एकत्र येण्याची सधि देणाऱ्या मला ससारातून उठावे लागलें, याबद्दल मी त्याना बोल का लावावा? आज मी गृहत्याग केल्याला इतकी वर्षें झाली ना, पण अद्याप माझ्या मनावरलें, माझ्या शरीरावरले त्याचें वर्चस्व कमी नाही झालेले मुळीसुद्धा ते मीनाच्या खोलींत येऊन बसले,—त्याची चाहूल, त्याचा आवाज माझ्या कानावर पडला, म्हणजे कापरे सुटते माझ्या साऱ्या शरीराला, रक्त उलटे वाहू लागतें जसे काहीं! असें का व्हावे मला? वास्तविक आज ज्या स्थितीत ते आहेत, त्या स्थितीत त्यांना बघण्याची सुद्धा कल्पना दु सह वाटते माझ्या मनाला पण मनूशी सबध येण्यापूर्वीचे अनिरुद्ध!—ते अनिरुद्ध अजूनही हवेसे वाटतात मला, त्याच्या विषयींची आसक्ति तितक्याच उत्कटतेनें वसत आहे अद्याप माझ्या मनात जणु काहीं, ज्याच्याबरोबर मी दहा वर्षें आनदात घालविली, ते अनिरुद्ध निराळे आणि आज मनूबरोबर रहात असलेले अनिरुद्ध निराळे! पहिल्या अनिरुद्धाच्या चिंतनात मी रात्रीच्या रात्री तळमळत घालविल्या आहेत अलोचन अथरुणावर. पण दुसरे अनिरुद्ध!—मीनाचासुद्धा त्याच्याकडला ओढा सहन नाहीं होत मला माझ्या या विचित्र मन स्थितीचा विचार केला, म्हणजे केव्हा केव्हा मला असे वाटते की, स्त्रीचा प्रेमाचा सबध प्रथम ज्या पुरुषाशीं घडून येतो, त्याचे एक प्रकारचें गुप्त, गूढ स्वामित्व कायम रहातें तिच्या भावनावर, तिच्या जीवनावर आणि तसें ते रहावे हें साहजिकच नाहीं का एका परीनें? ज्या घटनेमुळें तिच्या भावनाची तिला स्वत लाही अज्ञात असलेलीं दालनें क्षणार्धांत खुलीं होतात, तिच्या शारीरिक आणि मानसिक जीवनात कायमचें परिवर्तन घडून येतें, त्या घटनेला कारण होणाऱ्या व्यक्तीला तिच्या हृदयांत चिरंतन स्थान मिळावे, त्याच्या सहवासात घालविलेल्या त्या सुखक्षणाची स्मृति तिच्या मनांत सतत घोळत रहावी, त्याच्याविषयी एक प्रकारचें गूढ आकर्षण

तिला सदैव वाटत रहावे, हें स्वाभाविक नाही का ?—त्यामुळें, त्याच्याविषयींच्या या दुरत आसक्तीमुळें घटस्फोट मागितला नाही मी, तो मागण्याचा आपल्याला अधिकार नाही असे वाटले मला जनदृष्टीने ते मला दुरावलेले असतील त्याच्याही दृष्टीने कदाचित् मी त्याना मुकलेली, मेलेली असेन पण माझें धडधडणारे हृदय, सळसळणारे रक्त मला सागतें की, त्याचा माझा ऋणानुबध अद्याप तुटलेला नाही मग कसा मागू मी घटस्फोट ? परतु, भगलेल्या भयाण देवळात राहून भग्न मूर्तीवर आसवाचा अभिषेक करीत आयुष्य घालविणाऱ्या उपासिकेचे हृदय जसे पिचून जावे, तशी झाली आहे माझी अवस्था त्याच्याविषयींच्या या आसक्तीमुळें !

— २ —

भगलेलें देऊळ ! मी दिलेली ही उपमा वाचून खात्रीनें हसू येईल मीनाला ती म्हणेल, विवाहसस्थेला तू देऊळ मानलेस म्हणूनच झाली तुझी अशी दुर्दशा ! परवाच तिनें रसेलच्या पुस्तकातली काही प्रकरणें वाचून दाखविली मला.—तिचे म्हणणें असे की, विवाहसस्था एका काळी उपयुक्त असेल पण आज तिची उपयुक्तता सपलेली असल्यामुळें आता ती नष्ट करून टाकणेंच श्रेयस्कर होईल आणि या आपल्या मताची यथार्थता पटवून देण्यासाठीच तिनें मला पुस्तक वाचून दाखविले ते पण विवाहसस्थेचा उच्छेद केल्यानें खरोखरीच कल्याण होईल का मानवजातीचे ? मीना असे म्हणते की, सरकारने मुलाच्या सगोपनाचा मक्ता घेतला, म्हणजे मग आईबापाची, विवाहसस्थेची किंवा कुटुबपद्धतीची गरजच उरणार नाही मुळीं ! रशियात हा प्रयोग साम्यवाद्यानी यशस्वी करून दाखवला आहे म्हणे ! पण मुलाचे सगोपन हें काय केवळ खाण्यापिण्यात, ऊपझ्यालत्यात, खेळण्याफिरण्यात न् लिहिण्यावाचण्यातच आहे का ? मातृप्रेम म्हणून ज्याला म्हणतात, आईची माया म्हणून ज्याला म्हणतात, आतड्याचा पीळ म्हणून ज्याला म्हणतात, त्याला काहीच जागा नाही का त्या सगोपनात ? त्याला काहीच किंमत नाहीं का या साम्यवाद्याच्या दृष्टीनें ? सृष्टीत कुठेही पहा,—आईवाचून मूल कुठेच वाढताना दिसत नाहीं आणि तुम्ही मात्र विवाहसस्था मोडून टाकून यात्रिक पद्धतीने मुलाना वाढवावयाला सागता !—मी आज आठ वर्षे पहातें आहें, मनू माझ्या मुलाचें इतकें जीव

लावून करिते, पण ती आजारी पडल्यावर आईचा ध्यास घेतात, न् मग त्याना मुकाट्याने आणून पोंचवावे लागतें इथे ! आईविना सगोपन म्हणजे सत्त्व काढून घेतलेलें अन्न, लोणी काढून घेतलेले दूध, तेज काढून घेतलेली उष्णता आढीत घालून पिकविलेले फळ आणि झाडावर आपोआप पिकलेले फळ यात जो फरक, तोच आईविना वाढलेल्या आणि आईने वाढविलेल्या मुलात मुलाना कसे वाढवावे हे आईबापाना कळत नाही, असें जर तुम्हाला वाटत असेल, तर शिशुसगोपनाच्या शाळा काढा त्याच्यासाठी, ते शिक्षण सक्तीचें करा सर्व देशात —पण तेवढ्यामुळें विवाहसस्था मोडून टाकण्याची अभद्र भाषा का बोलता ? मी साम्यवादी नाही, मला त्याच्या तत्त्वज्ञानाची माहिती नाही, तुमचे ते वर्गयुद्ध न् ते मनोविश्लेषण यातलेही काही मला समजत नाही पण, मला एवढे मात्र निर्विवाद कळते की, मानवजातीचे कल्याण हे स्वैराचारात नसून सयमात आहे, भोगात नसून त्यागात आहे जगातलें कोणतेही सामर्थ्य मोकाट सुटले की, ते विध्वसाला, विनाशाला कारण होते. आणि मानवी वासना हे तर सर्वांत प्रभावी सामर्थ्य आहे ! विवाहसस्थेचे निर्मूलन करून तुम्ही काय ते सामर्थ्य मोकाट सोडणार ? पुरुषाचा अनेक स्त्रियाशी सबध घडणे आणि स्त्रीचा अनेक पुरुषाशी सबध घडणे,—मी आरोग्यशास्त्रज्ञाना विचारते,—ही गोष्ट उत्तम सतति निर्माण होण्याच्या दृष्टीने इष्ट वाटते का तुम्हाला ! विवाहसस्थेने जर काही केले असेल, तर तिने स्त्री-पुरुषाच्या व्यवहारात सयम आणला, स्त्रीला सरक्षणाची हमी दिली, पुरुषाना शुचितेचे महत्त्व शिकवले आणि मुलाच्या सगोपनाची उत्तम सोय केली ती सस्था मोडून तुम्ही काय मिळविणार ? पुरुष स्वभावत च बहुस्त्रीक आहे जगातल्या कोणत्याही स्त्रीला विचारून पहा —ती तुम्हाला डोळ्यात पाणी आणून सागेल की, पुरुष स्वभावत च बहुस्त्रीक आहे तुम्ही विचाराल, स्त्रीचीही वासना अनेक पुरुषावर जात नाही का ? स्त्रीस्वातत्र्याच्या आणि प्रौढविवाहाच्या या काळात स्त्रियाचाही प्रेमसबध अनेक पुरुषाशी जडत नाही का ? खरें आहे तुमचें म्हणणें पण, गर्भधारणेची आणि शिशुसवर्धनाची जी जबाबदारी निसर्गाने स्त्रीवर घातली आहे, ती जर तिला प्रामाणिकपणानें पार पाडावयाची असेल, माता या दृष्टीनें आपले कर्तव्य जर तिला नीटपणें करावयाचें असेल, तर तिला

स्वैराचारी होणें, काहीं एका मर्यादेपलीकडे अनिर्बंध वागणें सर्वथैव अशक्य आहे तशी जर ती वागेल, तर ती माता व्हावयाला नालायक ठरेल, मातृ पदावरील आपला हक्क गमावून बसेल ! मी विवाहसस्थेला देऊळ म्हणते, ते उगाच नव्हे तिचा आधार लाभल्यामुळे स्त्रीला थोडें तरी सरक्षण मिळालें पुरुषाच्या निरर्गल वासनेविरुद्ध विवाहसस्था तुम्हाला त्याज्य वाटते ना ? दपत्यप्रेम तुम्हाला उपहासास्पद वाटते ना ? मग मार्क्स आणि जेनी व लेनिन आणि क्रुप्सकाया याच्या एकनिष्ठ प्रेमाची वर्णने वाचून तुमच्या अगावर रोमाच का उभे राहतात ? स्त्री-पुरुषाच्या सबधाला जर कोणी उदात्त स्वरूप दिले असेल, तर ते विवाहसस्थेने,— म्हणून देऊळ म्हणते मी तिला त्या देवळाचे चिरे आज निखळले असतील, परिस्थिति बदलल्यामुळे त्याची उपयुक्तता आज कमी भासत असेल पण म्हणून काय ते अजिबात पाडून टाकावयाचे ? ज्या सयमाच्या तत्त्वाच्या पायावर त्याची उभारणी झाली आहे, त्या तत्त्वावरच पुनर्घटना करा त्याची लग्नबधन हे स्नेहबधन न ठरता त्याचे पाश जर विशिष्ट स्थितीत स्त्रीला आणि पुरुषाला दुःसह होत असतील, तर त्यातून मोकळे होण्याची सधि द्या त्याना लग्नबधनामुळें सगळ्यात जास्त कोंडमारा जर आज कुणाचा झाला असेल, तर तो स्त्रीचा पुरुषाच्या उद्दाम वासनानी ते बधन मुळी पाळलेच नाहीं कधी फारसे व्यवहारात पण स्त्रीला मात्र दुर्बलता, जनलज्जा, अपत्यप्रेम आणि कायद्याची दहशत याच्यामुळें, कितीही असह्य झाला तरी झुगारून देता येत नाही तो पाश माझीच गोष्ट घ्या मी जर सुशिक्षित नसते, आपानी जर माझ्यासाठी स्वतत्र पैसा ठेवला नसता, स्वत च्या पायावर उभे रहाण्याची जर मला हिमत नसती, तर त्याचे ते अमानुष वर्तन मुकाट्याने पहात नादावेच लागलें असते की नाही मला त्याच्या घरात ? आज बाहेरख्याली नवऱ्यानीं निष्कारण टाकून दिलेल्या, नालायख पुरुषाशी जन्मगाठ पडल्यामुळें जिणें नकोसें झालेल्या, दुर्व्यसनी पतीच्या लाथा खात दु खात आयुष्य कठीत असलेल्या आणि पाजी नवऱ्याच्या कारवाईमुळें अनीतीच्या गर्तेत खोल रुतलेल्या असख्य स्त्रिया आढळतात आपल्या समाजात त्या स्त्रियाना विवाहित कोणत्या दृष्टीनें म्हणावयाचें ? अहेवपणीं वैधव्यापेक्षाही दारुण यमयातना भोगाव्या लागतात त्याना ! त्याच्या कठातून निघणाऱ्या करुण किंकाळ्यानीं, त्याच्या डोळ्यातून गळणाऱ्या असहाय आंस-

वानीं दूषित होऊन गेलें आहे आमचे सामाजिक जीवन, गुलामगिरीची अवकळा आली आहे आमच्या ससाराला! नवऱ्याने तुडविलेली ती जगाने तुडविलेली न् नवऱ्यानें टाकलेली ती जगानें टाकलेली, अशी अवस्था आहे आज आम्हा स्त्रियाची —दुष्यताने अव्हेरिलेल्या निराधार शकुतलेला, तिच्या निर्दोषित्वाची पुरेपूर जाणीव मनात असूनही, 'कुलटा' या निंद्य शब्दानें ज्या वेळी शाङ्र्गरवानें उलट दटावलें, तेव्हा सर्व जगाचेच मुळी स्त्रीजातीविषयीचे उरफाटे धोरण व्यक्त होऊन गेलें त्याच्या मुखाने !—या दुर्गतीतून बाहेर पडण्याकरिता स्त्रियाना घटस्फोटाचा हक्क पाहिजे पण तेवढ्यासाठी विवाहसस्था मोडून टाकण्याचें मात्र कारण नाहीं ते देऊळ भगलेले असेल, भ्रष्ट झालेलें असेल, तर तुमच्या कल्पनेप्रमाणें त्याचा जीर्णोद्धार करा पण ते अजिबात पाडून टाकून मानवजातीच्या हातीं स्वैराचाराची सनद मात्र देऊ नका!!

२७ मार्च १९३३ ७ ऑगस्ट १९३४